कै. रावबहादूर काशिनाथ नारायण दीक्षित, एम्. ए.
बंगाल एशियाटिक सोसायटीचे फेलो,
हिंदुस्थान सरकारच्या
पुराणवस्तुसंशोधन विभागाचे
मुख्य संचालक,
यांच्या पूज्य स्मृतीस
सादर समर्पण

# अनुक्रमणिका

## प्राचीन भारतीय इतिहास



## परिशिष्ट

# पुरस्कार

मध्यप्रदेश संशोधन मंडळाच्या विद्यमाने म. म. प्रा. वा. वि. मिराशी यांच्या निवडक संशोधनपर लेखाचा संग्रह 'संशोधनमुक्तावलि' या नावाने प्रकाशित होत आहे. प्रा. मिराशी यांचें संशोधनकार्य किती विशाल व गहन आहे हें या 'मुक्तावली'त ग्रथित केलेल्या लेखावरून व तिला जोडलेल्या परिशिष्टांवरून स्पष्ट होईल. प्रा. मिराशी यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यात झाला व त्यांचें शिक्षण आरंभीं कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजमध्ये व नंतर पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये झालें. त्यानंतर ते नागपुरातील मॉरिस कॉलेजमध्ये १९१९ सालीं संस्कृत विषयाचे प्राध्यापक नेमले गेले. तेव्हापासून ते मध्यप्रदेशाचे कायमचे रहिवासी झाले आहेत. विद्यार्थीदशेंत त्यांनी कुशाग्र बुद्धि व उद्योगशीलता यांच्या बळावर मुंबई विश्वविद्यालयाच्या अनेक शिष्यवृत्त्या व पारितोषिकें मिळविलीं होतीं. अशा सुपीक भूमीवर स्फूर्तीचें बीज पडून व त्यावर कै. प्रा. गो. के. गर्दे यांच्यासारख्या अष्टपैलू विद्वानाच्या जवळ केलेल्या पातञ्जल महाभाष्याच्या अध्ययनाचें व प्राचीन ताम्रपट, शिलालेख, नाणीं, पाली व प्राकृत भाषा इत्यादि विषयांच्या अभ्यासाचें खत पडून, त्यांच्या दीर्घोद्योगाच्या वर्षावाने अंगीकृत कार्याचा वृक्ष फोफावून तो फलसंपन्न व्हावा हें स्वाभाविक होतें. या फळाचें स्वारस्य सामान्य माणसास कळणें कठीण आहे. जे मर्मज्ञ आहेत तेच तें जाणूं शकतात डॉ. विंटरनिट्झ, डॉ. बार्नेट, डॉ रमेशचंद्र मुजुमदार प्रभृति प्रसिद्ध युरोपीय व एतद्देशीय प्राच्यविद्याविशारदांनी प्रा. मिराशींच्या संशोधनात्मक लेखासंबधाने गौरवपर उद्गार काढले आहेत. भारत सरकारच्या पुराणवस्तुसंशोधन खात्यातर्फे त्यांचा 'भारतीय कोरीव लेखांचा संग्रह, भाग ४' हा ग्रंथ प्रसिद्ध होणार आहे त्यावरून प्रा. मिराशी यांनी केलेलें संशोधन किती उच्च प्रकारचें आहे हें स्पष्ट होतें. या गोष्टी त्यांनी संपादलेल्या यशाची साक्ष देतात.

प्रा. मिराशी यांच्या लेखांतील सर्व तदन्तर्गत काटकोर व वस्तुनिष्ठ अशा संशोधनपद्धतींत आहे. अर्वाचीन काळीं इतिहासाचा अर्थ

बदलला आहे. प्राचीन व मध्ययुगामध्ये इतिहास म्हणजे सुरस व मनोरंजक कथानक असें समजत असत. इतिहासामध्यें गाजलेल्या एखाद्या थोर पुरुषाचें वर्णन करावयाचें असलें म्हणजे त्याला अद्भुत व अलौकिक अशा घटनांच्या प्रभावळींत बसवून त्याचें चित्र रंगविण्यांत येत असे. परंतु भौतिक शास्त्राचा उदय झाल्यानंतर प्रत्येक विषयाचा अभ्यास शास्त्रीय म्हणजे वस्तुनिष्ठ अशा पद्धतीनें होऊं लागला. त्यांत लेखकाच्या कोणत्याहि सिद्धांताला व पूर्वग्रहाला जागा मिळणें अशक्य झालें. यामुळे इतिहासलेखनाला शास्त्राचें रूप आलें. इतिहासशास्त्राचा आद्य प्रवर्तक लिओपोल्ड् फॉन रँके हा समजला जातो. याच्या काळापर्यंत इतिहास-लेखनाचें कार्य धर्मगुरूंकडेच असे, व ते इतिहासांच्या नावाखाली अद्भुतरम्य कथानकें ऐतिहासिक व्यक्तींसंबंधानें रचून आपल्या धर्म-तत्त्वांच्या प्रसाराकडे त्याचा उपयोग करीत असत. अशा एका तथाकथित इतिहासकारानें रँकेला 'अहो, आमचे इतिहासक्षेत्रांतील सबगडी!' असें म्हटलें. त्याला रँकेनें पुढील शब्दांत उत्तर दिलें, "You are in the first place a Christian; I am in the first place a historian. There is a gulf between us." पूर्वग्रहानें ग्रस्त झालेली दृष्टि व शास्त्रीय वस्तुनिष्ठ दृष्टि यामध्ये असलेली खाडी कित्ती रुंद आहे हें यावरून स्पष्ट होतें.

आपल्या भारतांत अजून अशी आधुनिक शास्त्रीय दृष्टि निर्माण झाली नाहीं. आपल्या इतिहासाचा अभ्यास वस्तुनिष्ठ म्हणजे चिकित्सक पद्धतीनें झाला तर जीवनामध्यें आस्था उत्पन्न होईल व त्यांतूनच जीव-नाच्या विकासाला लागणारी स्फूर्ति मिळेल. आपल्या मनाचा कल साधारणपणे डोळ्यापुढे उभें असणारें जग सोडून कल्पित सृष्टींत विहार करण्याकडे अधिक असतो चंद्रगुप्त मौर्याच्या काळीं मेगॅस्थेनीसनें भारतीयाबद्दल असें विधान केलें होतें—'Their belief is in a great measure based upon fables.' अजून भारतीयाची वृत्ति साधारणपणें अशी आहे.

आधुनिक इतिहासाचीं साधनें ताम्रपट, शिलालेख नाणीं, इमारतींचे किंवा माणसांचे अवशेष अशीं अनेकविध आहेत. त्यांपैकीं कोणत्या

साधनापासून कसा शोध लागतो हें लक्षात आणलें म्हणजे त्या साधनाचें महत्त्व चटकन लक्षात येईल. उदाहरणार्थ, सेनार्टनें बुद्ध हा केवळ कल्पनेचा पुतळा आहे असें विधान केलें होतें. इतरानीहि काही काळपर्यंत त्याचीच री ओढली व बुद्ध म्हणजे सूर्यावर बसविलेलें एक प्रकारचें रूपक आहे असें भासविलें. परतु जेव्हा त्याच्या अस्थि उपलब्ध झाल्या तेव्हा तो खरा चालता बोलता पुरुष होता हें निर्विवाद ठरलें. असो.

या बाबतींत आपल्याला पाश्चात्य विद्वानाचें गुरुत्व पत्करलें पाहिजे. त्यानी घालून दिलेल्या पायंड्यानेच आपल्याला पुढील मार्ग आक्रमण करावयाचा आहे. प्रा. मिराशी यांच्यासारखे आधुनिक शास्त्रीय संशोधन पद्धति अवगत करून त्यात तरबेज झालेले संशोधक प्रत्येक विश्वविद्यालयात तयार केले पाहिजेत. आयुर्वेद, ज्योतिष, भूगोल, खगोल, रसायन, भूगर्भशास्त्र इत्यादि विविध विषयावरचे हजारो सस्कृत ग्रंथ अद्यापि अप्रकाशित आहेत. त्यावरून सशोधनाचें क्षेत्र किती अफाट आहे व त्यात काम करण्यास किती माणसें तयार करणें अवश्य आहे हें सहज दिसेल. अशा विशाल व अवघड क्षेत्रात ज्यानी परिश्रम केले त्यात प्रा. मिराशी यांचें नाव चिरायु होईल यात शका नाही. त्यानी केलेलें कार्य जसें तज्ज्ञास प्रशसनीय वाटलें तसें तें लोकादरास पात्र होईल अशी आशा आहे.

मध्यप्रदेश सशोधन मडळाने प्रकाशनास घेतलेल्या या ग्रथाकरिता मध्यप्रदेशाचे माननीय राज्यपाल डॉ. पट्टाभिसीतारामय्या यानी उदारपणें *खास देणगी दिली त्याबद्दल मंडळ त्यांचें अत्यंत ऋणी आहे.* सरकार व जनता यांचें या प्रकारें साहाय्य होत गेल्यास मंडळास अशा प्रकारचे ग्रंथ प्रकाशित करणें शक्य होईल. तसें साहाय्य प्राप्त होईल अशी आशा प्रकट करून मी या 'संशोधनमुक्तावली'चा पुरस्कार करतों.

नागपूर
१८–२–१९५४

भवानीशंकर नियोगी
अध्यक्ष,
मध्यप्रदेश सशोधन मंडळ.

# लेखकाचें हृद्गत

सन १९२८ सालची गोष्ट. त्यावर्षी मॉरिस कॉलेजच्या स्नेहसंमेलना-करिता डॉ. श्री व्यं. केतकर नागपुरास आले होते. त्या वेळीं मॉरिस व हिस्लॉप कॉलेजामधील मराठी मंडळातर्फे त्याना मानपत्र देण्याकरिता भरलेल्या सभेचें अध्यक्षस्थान मला देण्यात आलें. त्या प्रसंगीं डॉ. केतकरानी आपला 'कालिदास आणि विदर्भ' हा निबंध समग्र वाचला. '*मालविकाग्निमित्र*' नाटकाचें मथन करून डॉक्टर साहेबानी कालिदासाचा स्वभाव, त्याचें राजकारणाचें व भूगोलाचें ज्ञान, उज्जयिनी व विदर्भ याचे परस्पर सबंध इत्यादींविषयी अशीं विलक्षण विधानें केलीं की त्यामुळे इतर श्रोत्याप्रमाणे मीहि अगदी थक्क झालो. डॉ. केतकराचें सशोधन विलक्षण वाटलें तरी त्याचें खडन करणें सोपें काम नव्हतें. केवळ कल्पनेवर विसंबून एखाद्याच्या ज्ञानावर व चारित्र्यावर आक्षेप घेणें सोपें असतें, पण त्याचें साधार खंडन करणें अत्यत कठीण जातें. शिवाय कालिदासाच्या काळाला दीड हजार वर्षें झालेलीं. त्या काळची राजकीय व सामाजिक परिस्थिति, कालिदासाचें चरित्र इत्यादिविषयी आज आपलें ज्ञान अत्यत अल्प. यामुळे डॉ. केतकराचीं विधानें खोडून काढणें कठीण होतें. तथापि त्यावेळींहि माझा प्राचीन इतिहासाचा थोडाबहुत व्यासग होता व कालिदासाच्या सुदैवानें त्यापूर्वी नुकताच शिलालेखादिकाचा अव्वल दर्जाचा पुरावा उपलब्ध झाला होता तो मला माहीत होता. म्हणून माझ्या अध्यक्षीय भाषणात मला डॉ. केतकराच्या विलक्षण सशोधनाचें सप्रमाण खडन करता आलें. माझें भाषण त्या सभेस उपस्थित असलेल्या अनेक विद्वानाना आवडलें. त्यापैकीं काहींच्या सूचनेवरून पुढे डॉ. केतकराच्या निबधाला उत्तर देण्याकरिता

मी सहा लेखांकाची विस्तृत लेखमाला नागपूरच्या 'महाराष्ट्रा'त लिहिली. हेच माझे मराठींतील पहिले संशोधनात्मक लेख वास्तविक पाहता प्राचीन भारतीय इतिहास हा माझा विषय नव्हे माझ्या अध्ययनकाळीं तो मुंबई विश्वविद्यालयांतील कोणत्याहि कॉलेजमध्ये शिकविला जात नसे. तेव्हा प्राचीन इतिहासाच्या अभ्यासाकडे माझें कसें लक्ष गेलें हें सांगणें या प्रसंगीं अप्रस्तुत होणार नाही असें वाटतें.

मी शिक्षण संपवून पुण्याच्या डेक्कन कॉलेजांतून बाहेर पडलों तेव्हा डॉ. रामकृष्णपंत भांडारकर, डॉ. का. बा. पाठक यांच्या संशोधनाचे आदर्श माझ्या दृष्टीपुढे होते. सन १९१७ मध्ये पुण्यास भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंडळाची स्थापना होऊन त्याने महाभारताची संशोधित आवृत्ति काढण्याचें प्रचंड काम हातीं घेतलें होतें. १९१९ मध्ये पुण्यास प्राच्यविद्यापरिषदेचें पहिलें अधिवेशन भरलें तेव्हा मध्यप्रांत सरकारनें आपला प्रतिनिधि म्हणून मला पाठविलें होतें. त्या प्रसंगीं अनेक संशोधकांशी परिचय होऊन त्यांचें कार्य जवळून पाहता आलें. अशा परिस्थितींत आपल्याहि हातून काही संशोधनकार्य व्हावें अशी इच्छा होणें स्वाभाविक होतें. प्राच्यविद्यासंशोधनाकरिता जर्मन व फ्रेंच भाषांचें सामान्य ज्ञान आवश्यक आहे हें माहीत असल्याने त्यांचा अभ्यास मी घरींच चालू केला होता, तथापि कोणत्या विषयात आपणास संशोधन करता येईल याची स्पष्ट कल्पना त्या वेळेला आली नव्हती एम्. ए. परीक्षेकरिता माझा ऐच्छिक विषय वेदान्त होता व त्या विषयातील नैपुण्याबद्दल 'मुळ गोकुळजी झाला वेदान्त पारितोषिक' हें मला दोनदा मिळालें होतें. नागपुरास आल्यावर व्याकरणाचें खोल अध्ययन व्हावें म्हणून कैं. प्रा. गो. के. गर्दे यांच्याजवळ पातञ्जल महाभाष्य वाचलें होतें. पुढे मुंबई विश्वविद्यालयाच्या 'विश्वनाथ नारायण मंडलिक सुवर्णपदका'करिता नेमलेल्या 'धर्मसूत्रें व स्मृतिग्रंथ यांचा परस्पर संबंध व त्यात दिसून येणारी हिंदु कायद्याची उत्क्रान्ति' या विषयावर लिहिलेल्या संशोधनपर निबंधाबद्दल तें सुवर्णपदकहि मला मिळालें होतें. तथापि वेदान्त, व्याकरण किंवा धर्मशास्त्र या विषयात माझ्या हातून

-संशोधन होतां दुसऱ्याच एका विषयाकडे माझें लक्ष गेलें व पुढे त्यांतच माझें मन रममाण होऊं लागलें.

सन १९११ मध्यें नागपुरास मॉरिस कॉलेजमध्ये संस्कृताध्यापक म्हणून माझी नियुक्ति झाली त्यावेळीं प्रयाग विश्वविद्यालयाच्या एम्. ए. परीक्षेकरितां नेमलेल्या संस्कृत विषयाच्या अभ्यासक्रमातील एक प्रश्न-पत्रिका 'प्राचीन भारतीय संस्कृति' या विषयावर असे. तत्पूर्वी मॉरिस कॉलेजांत हा विषय शिकविला जात नसे. विद्यार्थ्यांस त्याचा अभ्यास घरींच करावा लागे. ही परिस्थिति ठीक नव्हती म्हणून मीच तो विषय शिकविण्यास घेतला. या विषयाच्या अभ्यासाकरिता इंपीरियल गॅझेटी-यरच्या दुसऱ्या विभागांतील प्राचीन कोरीव लेख, पुराणवस्तुशास्त्र, स्थापत्यशास्त्र, शिल्पशास्त्र, नाणकशास्त्र इत्यादि विषयावरील डॉ. फ्लीट, व्हिन्सेंट स्मिथ, बर्जेस इत्यादिकांचे संदर्भांनी खच्चून भरलेले लेख नेमले होते. या लेखांतील विषय विद्यार्थ्यांस समजावून देण्याकरिता अनेक ग्रंथ जमवून अभ्यासावे लागत. त्या वेळीं या विषयाच्या अभ्यासाकरिता आवश्यक ग्रंथ असलेलें सुसमृद्ध पुस्तकालय या प्रांतात नव्हतें. तथापि नागपूरच्या सचिवालयाच्या पुस्तकालयातून व कलकत्याच्या इंपीरियल लायब्ररींतून मूळ ग्रंथ मिळवून त्यातील माहिती मी आपल्या विद्यार्थ्यांस देत असे. या अभ्यासाने या विषयाविषयी माझ्या मनात गोडी उत्पन्न झाली. त्यानंतर मी प्रकाशित कोरीव लेखांचा अभ्यास करूं लागलों. या अभ्यासामुळे मागे उल्लेखिलेल्या प्रसंगीं मला डॉ केतकराच्या विधानांचें खंडन करता आलें.

सन १९३१ मध्यें हिंदुस्थान सरकारच्या पुराणवस्तुसंशोधन खात्याचे डेप्युटी डायरेक्टर जनरल रा. ब काशिनाथ नारायण दीक्षित हे मध्यप्रांत-वऱ्हाडातील उत्खननयोग्य जागांची पाहणी करण्याकरिता नागपूरला आले होते. त्यांनी माझा प्राचीन इतिहासाचा व्यासंग पाहून मला प्राचीन कोरीव लेख प्रकाशित करण्याविषयी आग्रह केला, इतकेंच नव्हे तर काही लेखांचे छाप मजकडे पाठवून व अन्यप्रकारेंहि मदत करून मला उत्तेजन दिलें. त्यानंतर अनेक कोरीव लेख व नाणीं

प्रकाशनाकरिता मजकडे आली. त्यावर आणि संस्कृत व प्राकृत वाङ्मयातील-विविध प्रश्नावर मला लिहिता आलें. हे लेख तज्ज्ञाच्या दृष्टीस पडावे म्हणून इग्रजींत लिहिले आहेत. मराठी वाचकासहि महत्त्वाच्या प्रश्नावरचें संशोधन माहीत व्हावें म्हणून काही लेख मधून मधून मराठी वृत्तपत्रात, मासिकात, भारत इतिहास सशोधक मडळाच्या त्रैमासिकात व समानग्रंथात प्रकाशित केले आहेत. काही मित्राच्या सूचनेवरून या दोन्ही प्रकारच्या लेखाच्या याद्या सदर्भासह या लेखसंग्रहाच्या शेवटी जोडल्या आहेत.

गेल्या पचवीस वर्षांत विवाद्य प्रश्नावर अनेकाशीं माझे वाद झाले आहेत डॉ. केतकर याच्या 'कालिदास आणि विदर्भ' या लेखमालेला दिलेल्या उत्तराचा निर्देश मागे केला आहेच. याशिवाय 'कालिदास आणि ऋतुसहार', 'कालिदास आणि अश्वघोष', 'कालिदासाचा काळ' 'गाथासप्तशतीचा काळ', 'मेघदूतातील रामगिरि' या विषयावर कै द्वु. आ. तिवारी, श्री. अ. ज करदीकर, प्रा कृ मो. शेंबवणेकर, कै. म. म. कृष्णशास्त्री घुले इत्यादिकाच्या लेखातील विचारसरणी मान्य न झाल्यामुळे त्या विषयाची दुसरी बाजू मी माझ्या लेखात माडली होती. मध्यप्रदेश सशोधन मडळाने माझ्या निबडक सशोधनपर लेखाचा सग्रह प्रसिद्ध करण्याचें ठरवून मला लेखाची निवड करण्यास सागितलें, तेव्हा या प्रकारचे वादविषयक लेख त्यात घालावेत काय हा प्रश्न उपस्थित झाला. मूळ लेख छापले नसता त्याना दिलेलीं उत्तरें छापणें योग्य नव्हे असें एकदा वाटलें. पण हे वादविषय महत्त्वाचे असून त्यावर जुनीं मतें पुनः पुनः माडण्यात येतात. त्याना दिलेलीं उत्तरें वर्तमानपत्राच्या किंवा मासिकाच्या जुन्या अकात लुप्त झालीं असल्याने त्या प्रश्नाची दुसरी बाजू वाचकापुढे येत नाही असें आढळून आलें. याचीं एक दोन उदाहरणें येथे देतों. डॉ केतकराच्या 'कालिदास आणि विदर्भ' या लेखातील विक्षिप्त विधानाना दिलेल्या उत्तराचा निर्देश मागे आला आहे. 'त्याच्या ( डॉ केतकराच्या ) मनावर या वाग्युद्धाचा फार परिणाम झालेला होता' असें प्रा. बनहट्टी यानी एके ठिकाणीं लिहिलें आहे ('एकावळी,' पृ. १३४). तथापि त्यानतर प्रकाशित झालेल्या

आपल्या 'प्राचीन महाराष्ट्र, विभाग पहिला' या ग्रंथांत डॉ. केतकरानी तींच विधानें पुनः केलीं आहेत. मी त्यांच्या निदर्शनास आणलेल्या तत्कालीन शिलालेखाच्या प्रबळ पुराव्याने नाइलाज झाल्यामुळे 'पुष्यमित्राने अश्वमेध केला नव्हता व गादीवर आल्यावरहि त्याला 'सेनापति' म्हणण्यात कालिदासाने आपल्या सदसद्विवेकबुद्धीस चूक बसविलें होतें' यासारखीं काही विधानें मात्र गाळलीं आहेत. तरीहि त्यानी 'प्रो. मिराशी यांच्याकडून माझ्या कोणत्याही मुद्द्याचें खंडन झालें नाही' अशी शेखी मारली आहे (प्राचीन महाराष्ट्र, विभाग १, पृ. ३११.) 'महाराष्ट्र' वृत्तपत्राचे सन १९२८ चे अंक वाचकास सहज मिळण्याचा संभव नसल्यामुळे त्यास डॉ. केतकरांच्या म्हणण्यात किती तथ्य आहे हें समजण्यास साधन उपलब्ध होणार नाही. या कारणास्तव त्यांच्या लेखाना दिलेलें उत्तर पुनः छापणें अवश्य वाटलें. दुसरें उदाहरण प्रा. शेंबवणेकरांचें. 'प्रसाद' मासिकात प्रसिद्ध झालेल्या 'कालिदास आणि अश्वघोष' या लेखात त्यानी 'कोणत्याहि ब्राह्मण पंडिताने कोणत्याहि जैन किंवा बौद्ध कवीच्या काव्याचा अभ्यास केल्याचा यत्किंचितहि पुरावा नाही' असें विधान ठामून केलें होतें. त्याच मासिकात या लेखाला दिलेल्या उत्तरांत काही ब्राह्मण आलंकारिक व टीकाकार यांच्या ग्रंथातील संदर्भ देऊन हें विधान कसें निखालस खोटें आहे तें मी दाखविलें होतें. माझा लेख प्रा. शेंबवणेकरांच्या दृष्टीस पडला नसेल असें वाटत नाही. त्यानी माझ्या प्रमाणाचें खंडन केल्याचेंहि मला माहीत नाही. तरीहि काही महिन्यांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या The Glamour about the Guptas (p. 65) या ग्रंथात त्यानी तेंच विधान पुढील शब्दात केलें आहे—'Aśvaghosha's works, moreover, do not seem to have been noticed by orthodox Brāhman writers, as anything like a reference to them is entirely wanting in anthologies or alaṅkāra works.' यामुळे त्यांच्याहि लेखाला दिलेलें उत्तर या लेखसंग्रहात घ्यावें लागलें. कालिदासाच्या काळाचा विचार

करतांना अश्वघोषाशीं त्याच्या पौर्वापर्याचा प्रश्न नेहमी उपस्थित होतो. म्हणून श्री. अ. ज. करंदीकरांच्या तद्विषयक लेखाला दिलेलें उत्तर येथे घेणें जरूर वाटलें. प्रस्तुत संग्रहात वादविषयक असे तीनच लेख आहेत. उत्तर देताना पूर्वीच्या लेखांतील विवाद्य विधानें शक्य तो लेखकाच्या शब्दात देण्याचा माझा नेहमींचा प्रघात आहे. त्यामुळे त्याना अन्याय होण्याचा संभव नाही. मूळ लेखात व माझ्या उत्तरात आलेल्या व्यक्ति-विषयक उल्लेखाना मात्र चिरकालिक महत्त्व नसल्यामुळे ते पूर्णपणें गाळून फक्त महत्त्वाच्या मुद्दयाना दिलेलें उत्तर ठेवलें आहे. त्यावरून वाचकास विवाद्य विषयाच्या दोन्ही बाजू समजून आपलें मत बनविण्यास मदत होईल.

प्रस्तुत लेखसंग्रहात संस्कृतवाङ्मयविषयक सात, प्राकृतवाङ्मय-विषयक चार व प्राचीन-भारतीय-इतिहासविषयक पाच लेखाचा अन्तर्भाव केला आहे. त्यात कालिदास, भवभूति व राजशेखर हे संस्कृत कवि, आणि गुणाढ्य, हाल, छप्पण्णय, प्रवरसेन व सर्वसेन हे प्राकृत कवि याचा काल, जन्मस्थान, चरित्र, ग्रंथ इत्यादिकाविषयी नवीन माहिती आढळेल. यात सातवाहन, शक, गुप्त, वाकाटक, राष्ट्रकूट आणि कलचुरि या प्राचीन राजवंशाच्या इतिहासावर थोडाबहुत नवीन प्रकाश पाडलेला दिसेल याशिवाय रामगिरि, पद्मपुर, प्रवरपुर इत्यादि स्थलाचा शोध, शालिवाहन शकाची उत्पत्ति व प्रसार, महाराष्ट्र देशाचा सर्वांत प्राचीन उल्लेख असलेला कोरीव लेख, वाकाटककालीन शिल्पें, इत्यादि विषयावर संशोधनाने प्राप्त झालेली नवीन माहिती मिळेल. साराश, या लेखसंग्रहात वाचकास विषयाच्या महत्त्वाबरोबर विविधताहि आढळेल असा मला भरवसा आहे.

प्रस्तुत लेख वृत्तपत्रातून व मासिकातून भिन्न भिन्न काळीं प्रसिद्ध झाले होते. शिवाय ते संशोधकाकरिता नसून जिज्ञासु सामान्य वाचका-साठी लिहिले होते. अशा वाचकाना संशोधनाची अद्ययावत् प्रगति माहीत नसते. म्हणून प्रत्येक लेखात ती थोडक्यात सागून संशोधनाने प्राप्त झालेली नवीन माहिती दिली होती. यामुळे या लेखात क्वचित्

पुनरुक्ति झालेली आढळेल. काही ठिकाणी नवीन टीपा देणें आवश्यक वाटलें. त्या कंसात माझ्या नावाच्या आद्याक्षरांनी दाखविल्या आहेत या पुस्तकातील शुद्धलेखन महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नियमानुसार आहे.

हे लेख पुनर्मुद्रित करण्यास खालील वृत्तपत्रांच्या व नियतकालिकांच्या संपादकांनी अनुज्ञा दिली त्याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों---'महाराष्ट्र', नागपूर; 'तरुणभारत', नागपूर; 'सह्याद्रि', पुणें; 'प्रसाद', पुणें; 'युगवाणी', नागपूर; 'भारत इतिहास संशोधक मंडळाचें त्रैमासिक', पुणें; 'शारदाश्रम वार्षिक', यवतमाळ, आणि 'नवभारत', पुणें. पवनार येथील शिल्पाचे ब्लॉक भारत इतिहास संशोधक मंडळाच्या कृपेने मिळाले त्याबद्दलहि मी मंडळाचा ऋणी आहे.

माझ्या संशोधनपर मराठी लेखांचा संग्रह प्रसिद्ध व्हावा अशी इच्छा नागपूरच्या 'युगवाणी'चे संपादक श्री. या. ना. देशपांडे यांनी आठ वर्षांपूर्वी व्यक्त केली होती. पण आर्थिक दृष्ट्या तें फायदेशीर होण्याचा संभव नसल्याने तसें करण्यास कोणी प्रकाशक पुढे येणें शक्य नव्हतें. मध्यप्रदेश संशोधन मंडळाने माझ्यावरील प्रेमाने हें कार्य हातीं घेतलें याबद्दल मी मंडळाचा अत्यंत ऋणी आहें. मध्यप्रदेशाचे राज्यपाल डॉ. पट्टाभिसीतारामय्या यांचें भारतीय संस्कृति, संस्कृत वाङ्मय व संशोधन या विषयींचें प्रेम सर्वश्रुत आहे त्यांनी या प्रकाशनकार्याकरिता खास देणगी मध्यप्रदेश संशोधन मंडळाला उदारपणें दिली त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. मंडळाचे अध्यक्ष डॉ. सर भवानीशंकर नियोगी यांनी अत्यंत कार्यव्यापृत असताहि या लेखसंग्रहाला आपल्या पुरस्काराने भूषविलें याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों. 'नारायण मुद्रणालया'ने नेहेमीप्रमाणे हें पुस्तक शुद्ध व सुबक रीतीने छापून दिलें याबद्दल त्याचे संचालक श्री. पा. ना. बनहट्टी यांचे आभार मानले पाहिजेत.

१५ फेब्रुवारी १९५४ वा. वि. मिराशी

# संशोधनमुक्तावलि

## कालिदास आणि विदर्भ*

### डॉ. केतकर यांस उत्तर

### लेखांक पहिला

'नामूलं लिख्यते किंचित् नानपेक्षितमुच्यते ।'

**प्रास्ताविक**

'महाराष्ट्रीय ज्ञानकोशा'चे विद्वान् संपादक डॉ. श्री. ' केतकर यांनी गेल्या दीड महिन्यात ' विदर्भ व कालिदास ' या विषयावर एक विस्तृत लेखमाला लिहून कालिदासाचा काल, कृति व स्वभाव यांवर नवीनच प्रकाश पाडण्याचा प्रयत्न केला आहे. डॉक्टरसाहेबांनी सध्या प्राचीन महाराष्ट्राचा इतिहास लिहिण्याचें काम अंगावर घेतलें आहे. त्या इतिहासाच्या साधनांची जुळवाजुळव करीत असतांना साहजिकच त्यांचें लक्ष कालिदासाच्या मालविकाग्निमित्र या नाटकाकडे गेलें. कारण, त्या नाटकांत इ. स. पूर्वी दुसऱ्या शतकांत विदिशा ( सध्याचें भिलसा ) व विदर्भ येथें राज्य करणाऱ्या राजांच्या परस्परसंबंधाचा

* नागपूरच्या 'महाराष्ट्र' साप्ताहिकांत ता २८–१०–१९२८ पासून झालेल्या डॉ. श्री. व्य. केतकर यांच्या पांच लेखांस उत्तर. यांतील पहिला लेखांक ता. २ डिसेंबर १९२८ ला ' महाराष्ट्रा 'त प्रसिद्ध झाला.

उल्लेख आला आहे. परंतु खोल विचार करता या नाटकाची ऐतिहासिक दृष्टीने काही इतकीहि किंमत नाही; यात कालिदासाने ऐतिहासिक गोष्टींचा विपर्यास करून स्वकालीन परिस्थितिच वर्णिली आहे, असें त्यांचें मत झालें; व त्यावर एक विस्तृत लेख लिहून, दोन महिन्यापूर्वी ते नागपुरास आले होते त्यावेळीं हिस्लॉप कॉलेजमध्ये त्यास मानपत्र देण्याकरितां भरलेल्या हिस्लॉप व मॉरिस कॉलेज यातील मराठी वाङ्मय-मंडळातर्फे भरलेल्या सभेंत तो त्यानी वाचला. लेखातील विचार-सरणी अगदीच नवीन व प्रस्तुत लेखकाच्या मतें अत्यंत भ्रामक असल्यामुळे त्याने त्याच सभेंत त्यातील मुख्य मुद्यांचें साधार खंडण केलें होतें. तथापि, त्यावेळीं डॉ. केतकरानी आपला निबंध समग्र वाचला नव्हता. त्याप्रमाणेच त्याच्या विधानास दिलेलें उत्तरहि तात्कालिक दिलें असल्याने सविस्तर नव्हतें. त्यानंतर 'महाराष्ट्रा'त त्यांचा निबंध सविस्तर प्रसिद्ध झाला आहे त्यात प्रदर्शित केलेल्या विचारास लागलीच उत्तर न दिलें, तर डॉक्टरसाहेबांच्या 'प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासा'त त्याचा अन्तर्भाव होऊन, कविकुलगुरु कालिदासाच्या विमल यशावर त्यानी टाकलेले शिंतोडे मराठी वाचकापुरते तरी वज्रलेप होण्याची भीति आहे. शिवाय, त्यानी या लेखात जी विचारसरणी अवलंबिली आहे, तीच पुढे अनुसरिली तर प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासाचें अत्यंत विकृत व भ्रामक स्वरूप मराठी वाचकापुढे मांडलें जाण्याचा संभव आहे. या कारणाकरितां काही विद्वान् मित्राच्या सूचनेवरून प्रस्तुत लेखक या विषयाची दुसरी बाजू पुढे मांडण्याचा प्रयत्न करणार आहे. हें काम प्रस्तुत लेखकापेक्षा विद्वान् व प्राचीन इतिहासाचें सम्यग्ज्ञान असलेल्या गृहस्थानी हातीं घ्यावयास पाहिजे. शिवाय, नागपूरसारख्या ठिकाणीं एखाद्या विषयावर सांगोपांग विचार करण्याकरितां जरूर असलेल्या साधनाची वाण पदोपदीं भासते. तेव्हा अशा परिस्थितीत डॉक्टर-साहेबाची विधानें खोडून काढण्याचें काम बरेंच कठीण होणार आहे. डॉक्टरसाहेबाप्रमाणे केवळ कल्पनाशक्तीवरच विश्वास ठेऊन उत्तर देऊं म्हटलें तर तें अर्थातच कठीण होणार नाही; पण अशा लेखनाचा विचारी वाचकावर मुळीच परिणाम होणार नाही. तेव्हा या लेखात

वाक्य तों 'नामूल लिख्यते किंचित् नानपेक्षितमुच्यते' या पद्धतीस अनुसरूनच उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे कालिदासाच्या विमल कीर्तीवरचा डॉक्टरसाहेबानी उत्पन्न केलेला डाग अल्पांशाने जरी धुतला गेला अथवा त्यामुळे इतर अभ्यासकांस आपले विचार पुढे मांडण्याची इच्छा झाली, तरी प्रस्तुत लेखकाच्या श्रमाचें साफल्य होईल!

## केतकरांनी काढलेलें 'मालविकाग्निमित्रा'चें सार

कालिदासाच्या मालविकाग्निमित्र नाटकाचें परीक्षण करून डॉ. केतकरानी पुढील सार काढलें आहे—"मालविकाग्निमित्र हें नाटक ऐतिहासिक दृष्टया विश्वसनीय नाही. कारण कथानकाच्या कालापासून पाच साडे-पांचशें वर्षांनी इ. स. ३५०-४५० च्या सुमारास कालिदास होऊन गेला असल्यामुळे त्याला शुंगकालीन माहिती फारच थोडी होती. त्याचें भौगोलिक व ऐतिहासिक ज्ञान नाटयकाव्यादि वाङ्मयावरूनच तयार झालें असावेंसें दिसतें. त्याचें भांडवल म्हणजे बृहत्कथा असावें उदयनाच्या दिग्विजयाच्या हकीकतीवरून रघूच्या दिग्विजयाची हकीकत बनविल्याचें स्पष्ट दिसत आहे त्यास बौद्धजैनाचें वाङ्मय देखील ठाऊक असेलसें वाटत नाही. त्याने पुराणें वाचलीं होतीं; त्यावरून पुष्पमित्र, अग्निमित्र व वसुमित्र यांचीं नावें त्यास माहीत झालीं असावीं त्याने पतजलीचें महाभाष्य घोकलें होतें त्यावरून त्यास पुष्पमित्राने यज्ञ केला हें माहीत होतें पण तो यज्ञ अश्वमेध होता याचा पुरावा नाही. कालिदासाचा हेतु शुंगकालीन ऐतिहासिक परिस्थिति वर्णन करण्याचा नसून, स्वकालीन परिस्थिति प्रतिबिम्बित करण्याचा होता म्हणून त्याने आपल्या नाटकात मुद्दाम खोटा मजकूर दडपून दिला. कारण, विदिशा देशाचें राज्य शुंग घराण्याकडे कधीं होतें याला पुरावा नाहीं कालिदासानें या नाटकात सत्याचा अपलापहि केला आहे. कारण, मौर्य सम्राटाचा पुष्यमित्र शुंग याने विश्वासघात करून त्याचा वध केला याबद्दल कालिदास काहींच राग दाखवीत नसून, उलट स्वामिद्रोहाचा व राजवधाचा उल्लेख कालिदासाने वगळला आहे; आणि आपली सहानुभूति निमकहराम सेनापतीस देऊन आपली हलकट

वृत्ति दाखविली आहे पुष्पमित्रास सोज्वल करण्याकरिता सेनापतिपणा-तच असलेला व राजरक्ताचें रक्त हातावर न सांडलेला अशा काल्पनिक स्थितीतील पुष्पमित्र घेऊन कालिदासानें आपल्या सदसद्विवेकबुद्धीवर गप्प बसविलें आहे त्याने पुष्यमित्र सेनापतिपदावर असतानाच अश्वमेध करतो व अग्निमित्र आपल्या बापाचा अंकित होता तरी त्याच्या संमतीची वाट न पाहता मौर्यसचिवास मुक्त करीत आहे असें दाखवून, आपलें राजकारणविषयक अज्ञान प्रकट केलें आहे. अग्निमित्राच्या खलित्यास विदर्भराजाने पाठविलेल्या पत्रात जी भाषा योजिली आहे, तीवरूनहि त्याचें अज्ञान दिसून येतें. वर्धा नदीच्या योगें विदर्भ देशाचे उत्तर दक्षिण असे दोन भाग पडतात असें कालिदासाने म्हटलें आहे त्यावरून त्याचें भौगोलिक अज्ञानहि सिद्ध होतें. इतक्या ऐतिहासिक चुका असलेलें नाटक तत्कालीं कसें पसत पडलें याबद्दल आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. कारण, उज्जयिनींतील त्याचे श्रोते म्हणजे व्याकरण शिकलेले पण्डित व माळव्याच्या दरबारातील खुळे लोक. तेव्हा अशा नाटकास ऐतिहासिक मानणारे डॉक्टर भांडारकरादि संशोधक अगदीच भोळसट, एवढेंच न हे तर कालिदासाच्या कृतीचें मर्म न समजणारतके काव्यरसज्ञताहीन होत मालविकाग्निमित्र नाटक रचण्यात कालिदासाचे मुख्य दोन उद्देश होते पहिला हा कीं विदर्भ देशाचा हीनपणा उज्जैनीच्या लोकांपुढे मांडून त्यास खूप करणें. या दोन राज्यामध्ये कालिदासकाळीं वैर होतें त्याचें कारण असें की मालव राज्य अथवा उज्जयिनी याची कालिदास व त्याचा आश्रयदाता विक्रमादित्य याच्यामुळे जरी प्रसिद्धी झाली, तरी कालिदासाच्या अगोदर वाङ्मयात उज्जयिनीला स्थान नव्हतें. त्यामुळे उज्जयिनीच्या लोकांस विदर्भाविषयी मत्सर वाटत असे. त्यांस खूप करण्याकरिता कालिदासाने आपल्या नाटकात विदर्भ देशाच्या राजाचें हीनत्व व उद्दामपणा, नतर विदिशेच्या राजाने—अग्निमित्राने—केलेला त्याचा पराभव हीं दाखविलीं आहेत कारण अवंतीच्या लोकांस विदिशा राज्याचा विदर्भापेक्षा दर्जा वरचा आहे असें दाखविलें तर आनंद होणार. कारण विदिशा म्हणजे माळवा व अवन्ति म्हणजेहि माळवाच ! राज्यें दोन, राजधान्या दोन, पण राष्ट्र एकच.

कालिदासाचा दुसरा उद्देश स्वकालीन जिवंत व्यक्तींवर टीका करून लोकांची करमणूक करणें हा होय. याकरितां त्यानें आपला नायक कन्येंसवरच्या मुलाचा बाप व बिजवर असा कल्पिला आहे; व त्यानें राजकारणासाठीं केलेलें लग्न प्रेमाखातर केलें असें दाखविलें आहे. नाटकात धारिणीचा भाऊ वर्णावर म्हणजे लेकावळा असा दर्शविला आहे; याचें कारण स्वकालीन राजस्यालकावर एखादा शितोडा टाकता आला तर यावा, हें होय. कालिदासकालीन राणीच हलक्या कुळातली असावी. केवळ सौंदर्याच्या जोरावर ती राणी झाली असावी. राजा आपल्या हातांत नाही, आपल्या उरावर राजानें दुसरी सवत केलीच की नाही अशा भावनांची व विचारांची थोरली राणी (धारिणी) दाखविली असून, दुसरी राणी (इरावती) मात्र आपण विजयी व्यक्ति आहोंत अशा भावनेची दर्शविली आहे. यातहि स्थानिक महत्त्वाचे उल्लेख असावेत. इरावती राणीस झिंगलेली अशी रंगभूमीवर आणण्यात राणीची चेष्टा करून लोकांत हशा पिकवावा व राणीची देखील तिला दारू पिण्यास ऐतिहासिक आधार आहे अशी समजूत करून देऊन दोन्ही बाजूंची हापासकी मिळविणें असा कालिदासाचा उद्देश होता. कालिदासाच्या दृष्टीनें अग्निमित्रासारखी व्यक्ति म्हणजे आदर्शभूत राजत्वाचें उदाहरण होती. राजकारणासाठीं नवीन बायको करण्यात राजाची वैषयिक वृत्ति व्यक्त होत नसून सोशिकपणा व्यक्त होत आहे."

मालविकाग्निमित्र नाटकाचें हें सार (त्यातील ढेलक्या विशेषणासह) शक्य तों डॉ. केतकरांच्या शब्दात दिलें आहे. हेतु हा की, तें देण्यात त्यांच्या म्हणण्याचा विपर्यास होऊं नये. आता या साराचें सत्यासत्यत्व उपलब्ध असलेल्या पुराव्याच्या कसोटीवर घासून ठरवूं.

## कालिदासाविषयी आजपर्यंतची समजूत

कालिदासाचें जन्मस्थान, काल व चरित्र याविषयीं आजपर्यंत अनेकांनी अनेकविध तर्क केले आहेत. संप्रदाय व दंतकथा जाणणारे

लोक तो उज्जयिनी येथे राज्य करणाऱ्या विक्रमादित्याच्या आश्रयास होता असें म्हणतात; तर बंगाली लोक तो बंगालचा रहिवासी होता असें प्रतिपादितात. दोन वर्षांपूर्वी एका विद्वानानें तो काश्मीरांत होऊन गेला असें सिद्ध करण्याकरितां एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. (पंडित लक्ष्मीधर कल्ला यांचें दि बर्थप्लेस ऑफ कालिदास, १९२६, पाहा.) त्याच्या कालाविषयींहि असेंच मतवैचित्र्य आढळतें. इ स. पूर्वी पहिलें शतक (रा. चिंतामणराव वैद्य), इ. स. चें सहावें शतक (प्रो. मॅक्समूलर), इ. स. चें पांचवें शतक (प्रो. पाठक), इ. स. च्या चौथ्या शतकाचा उत्तरार्ध (डॉ. सर रामकृष्णपंत भांडारकर) इत्यादि विविध मतें कालिदासाच्या कालाविषयीं आतापर्यंत व्यक्त झालीं आहेत. कालिदास लहानपणीं मंदबुद्धीचा होता अशीहि दंतकथा आहे. पण तो पुढें अत्यंत विद्वान् झाला याविषयीं केवळ भारतीयच नव्हे तर युरोपीय विद्वानांचेंहि मतैक्य आहे व ज्यांनी त्याच्या ग्रंथाचा खोल अभ्यास केला आहे, त्या सर्वांनीं त्याच्या अष्टपैलू बुद्धीबद्दल त्याची मुक्तकंठानें स्तुति केली आहे. त्यानें शिक्षण, संगीत, चित्रकला इत्यादि विषयांवर आपल्या ग्रंथांत जे विचार प्रकट केले आहेत, त्यांवरून त्याचें त्या विषयासंबंधीं अगाध ज्ञान व्यक्त होतें, असेंही अभ्यासकांनी दाखविलें आहे. (रा. के ल. ओगले यांचे 'लोकमान्य' दैनिकाच्या १९२४ सालच्या 'हिंदुस्थान' अंकांत व 'विविधज्ञानविस्तार', वर्ष ५७, अं ५, यांत आलेले लेख व सरदार मुजुमदार यांचा भांडारकर इन्स्टिटयूटच्या ॲनाल्स्, पु. ७, भाग १–२ यांत आलेला लेख पहा.) त्याच्या ग्रंथांतील भूगोल-विषयक उल्लेखांवरून त्यानें दीर्घ काल प्रवास केला असला पाहिजे, निदान त्यानें प्रवासी लोकांकडून दूरदूरच्या देशांविषयीं अगदी बारीक-सारीक माहिती मिळविली असली पाहिजे, असें डॉ. भगवानलाल इंद्रजी, रा. चिंतामणराव वैद्य इत्यादि प्रसिद्ध संशोधकांचें मत आहे. या सर्व गोष्टींवरून कालिदास मोठा विद्वान्, रसिक, चतुरस्र व माहितगार कवि होऊन गेला, असा सर्वसाधारण समज आहे. डॉ. केतकरांनी मात्र त्याच्या ग्रंथसागरांत अवगाहन करून, कालिदास हा केवळ पठिक वैयाकरण व पुराणिक होता, त्यास राजकारणाचा गंधहि

नव्हता, स्वतःच्या निवासस्थानापासून (उज्जयिनीपासून) जवळच असलेल्या विदर्भ देशाच्या भुगोलाविषयीं त्याचें ज्ञान हल्लीच्या एखाद्या प्राथमिक शाळेंत शिकणाऱ्या शेंबड्या पोराच्या ज्ञानाइतकेंहि नव्हतें, त्याचा स्वभाव दुर्जनाच्या दुष्कृत्यावर पांघरुण घालण्याइतका व राजदरबारातील व अन्तःपुरातील व्यक्तींच्या खाजगी वर्तनावर सार्वजनिक ठिकाणीं टीका करण्याइतका हलकट होता, असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे! व आपल्या पूर्वीच्या डॉ. भांडारकरादि संशोधकास कालिदासानें चकविलें; आपण मात्र त्याचें हद्दत ओळखून त्याचा नीचपणा चव्हाट्यावर मांडीत आहों, असा आव आणला आहे! व या मतमतांतराच्या गलबल्यात आम्हास तर प्रसिद्ध आंग्ल टीकाकार मॅथ्यू आर्नोल्ड यानें आंग्लकविसम्राट् शेक्सपीयरविषयी जे उद्गार काढले आहेत त्याची आठवण होते.

> Others abide our question. Thou art free!
> We ask and ask–Thou smilest and art still,
> Outtopping knowledge!

भवभूति, बाण, बिल्हण इत्यादि कवींस त्यांचें जन्मस्थान, काळ, विद्वत्ता, इत्यादिकांविषयीं प्रश्न विचारा, त्याचीं निदान अल्पस्वल्प उत्तरें तुम्हास मिळतील; पण कालिदासास तसलेच प्रश्न विचारून कोंडींत धरण्याचा प्रयत्न करा की तो तुमच्या हातावर तुरी देऊन निसटलाच म्हणून समजावें तुमचे प्रश्न व त्याचा स्वभाव, विद्वत्ता इत्यादि जाणण्याविषयींची तुमची धडपड पाहून तो खदखदा हसतो व पुनः मुग्धता धारण करतो असें चित्र आमच्या मनश्चक्षुपुढे दिसत आहे. कालिदासानें डॉ. भांडारकरादि संशोधकास चकविलें म्हणून डॉ केतकर त्यास हसतात, पण आपल्या धडपडीकडे पाहून कालिदासाचा स्वर्गस्थ आत्मा (देहधारी असेल तर) हसत असेल हें डॉक्टरसाहेबांच्या लक्षात आलें नाहीं. पण पुढील विवेचन वाचून तें वाचकांच्या ध्यानात येईल, अशी आशा आहे.

## लेखांक दुसरा

### कालिदासाचा काळ ठरविण्याची आवश्यकता ·

डॉ. केतकरांच्या या नवीन संशोधनाची इमारत कल्पनेच्या पायावर उभारली आहे. त्यांनी आपल्या विधानास आधार देण्याचा प्रयत्न केला नाही; व कालिदासकालीन परिस्थितीचे जे उल्लेख सुदैवाने अद्यापि अवशिष्ट आहेत, त्यांचा अभ्यास करण्याचीहि काळजी घेतली नाही. त्यामुळे त्यांची इमारत पत्त्यांच्या इमारतीसारखी डळमळीत झाली आहे; व किंचित् विचाराचा धक्का दिल्याबरोबर जमीनदोस्त होणार आहे. शुंगकालीन माहिती आपणास फार थोडी आहे, तितकीच ती कालिदासावरहि असावी अशी त्यांची विचारसरणी आहे!

या बाबतींत प्रथम लक्षात घेण्याची गोष्ट ही की, या प्रश्नाचा विचार करण्यास कालिदास कोणत्या काळीं होऊन गेला, हें निश्चित करणें अवश्य आहे. कारण रा. चिंतामणराव वैद्य म्हणतात त्याप्रमाणे तो इसवी सनापूर्वी पहिल्या शतकात होऊन गेला असें मानलें तर डॉक्टर-साहेबांची सर्व कल्पना सूर्यापुढे धुक्यासारखी वितळून जाण्यास वेळ लागणार नाही. कारण सुमारें शंभर वर्षांच्या अवधींतच कालिदासकालीं शुंगकालीन इतिहास अज्ञात झाला असें मानावें लागेल. कालिदासानें जाणून बुजून त्याचा विपर्यास केला असला तर तत्कालीन लोक इतके भोळे व मूर्ख होते की त्यांनी त्यास तसें करू दिलें, असें समजावें लागेल. कालिदासाच्या नाटकाचा प्रेक्षक केवळ व्याकरणाभ्यासजड पंडित अगर 'माळव्याच्या दरबारातील खुळे लोक' होते, असा उल्लेख नाही. उलट तो आपलीं नाटकें विद्वत्परिषदेपुढे दाखविलीं गेलीं असें सांगत आहे (अभिरूपभूयिष्ठा परिषदियम्—शाकुंतल) माझ्या नाटकाची पूर्वीच्या नाटकाशीं तुलना करून सरस ठरतील तर त्याचा स्वीकार करा, केवळ दुसरे लोक एखादें नाटक चांगलें म्हणतात म्हणून त्याची प्रशंसा करू नका, असें त्याचें स्वकालीनासच नव्हे तर उत्तरकालीन टीकाकारांसहि सांगणें आहे (मालविकाग्निमित्र–प्रस्तावना). तेव्हा ऐतिहासिक सत्याचा अपलाप

करणारें नाटक कालिदासकालीं सर्वमान्य झालें असतें, असें दिसत नाही. कालिदासाचा काल इ. स. पूर्वी पहिलें शतक मानल्यास ही अडचण येते म्हणूनच की काय डॉ. केतकरानी त्यास इ. स. ३५०–४५० या कालात ठेवलें आहे. कारण त्यानी या मताच्या सिद्ध्यर्थ काही प्रमाणें मांडलीं नाहीत. या कालात कालिदास होऊन गेला असल्यास तो द्वितीय चंद्रगुप्त विक्रमादित्य (इ. स. ३७५–४१३) याच्या आश्रयास असावा असें मानण्याचा प्रघात आहे. कालिदासाचा काल ठरविण्याचें हें स्थल न हे. तेव्हा पुढील विवेचनात डॉ. केतकरानीं घेतलेलाच कालिदासाचा काल मान्य करून परीक्षण केलें आहे.

## कालिदासाच्या कालचें वाङ्मय व दंतकथा

५००–५५० वर्षांनतर होऊन गेलेल्या कालिदासास सध्या आपणास आहे त्यापेक्षा जास्त माहिती नव्हती असें डॉ० केतकर सांगतात. पण हें सिद्ध करण्याकरिता कालिदासकालीन सर्व वाङ्मय जसेच्या तसेंच आजपर्यंत चालत आलें आहे हें आपण दाखवून दिलें पाहिजे, हें त्याच्या ध्यानात आलेलें दिसत नाही. हिंदुस्थानातील प्राचीन वाङ्मयाचा ज्यानें थोडातरी अभ्यास केला आहे त्यास हें सांगणें नको की, उपलब्ध असलेल्याच्या कित्ती तरी पट विविध विषयावरील वाङ्मय कालाच्या उदरात गडप झालें आहे. यापैकी काहींचे केवळ नामनिर्देश तर काहींचे लहान लहान उतारे इतर पुस्तकात आढळतात. काहींची भाषांतरें चिनी व तिबेटी भाषेत झालेलीं उपलब्ध आहेत. पण मूळ संस्कृत अगर पाली ग्रंथ सध्या उपलब्ध नाहीत. तेव्हा एकादा ग्रंथ सध्या उपलब्ध नाही म्हणून तो पूर्वीहि उपलब्ध नव्हता असें सिद्ध होत नाही हें वाचकाच्या लक्षात येईल दुसरी गोष्ट ही की, प्राचीनकाळीं राजाच्या वंशावळीच नव्हे तर त्याच्या कारकीर्दीत होऊन गेलेल्या महत्वाच्या गोष्टींचें टाचण करून ठेवण्याचा प्रघात होता अशा प्रकारचें एक कलिंगदेशाच्या खारवेल नावाच्या राजाच्या कारकीर्दीचें सविस्तर वर्णन हाथीगुंफेमध्ये खडकावर कोरलेलें प्राचीन इतिहासाच्या अभ्यासकास माहीत आहे. अशा प्रकारचे शुंगराजाच्या कारकीर्दीचे वृत्तांत कालिदास-

कालींही शुंगराजे व कालिदासाचा आश्रयदाता चंद्रगुप्त विक्रमादित्य या दोहोंचीहि राजधानी असलेल्या पाटलिपुत्र शहरीं असणें असंभवनीय नाही. यादाकरितां सध्या उपलब्ध आहेत त्यापेक्षा जास्त ऐतिहासिक पुस्तकें अस्तित्वांत नव्हतीं असें गृहीत धरलें, तरी कालिदासाने आपल्या नाटकांत दिलेली माहिती तिसऱ्याच एका साधनावरून मिळविली असणें शक्य आहे. तें साधन म्हणजे दंतकथा अगर पूर्वपरंपरेने चालत आलेल्या गोष्टी हें होय. कालिदासकालीं दंतकथा होत्या याबद्दल पुरावा पाहिजे असेल तर त्याच्या मेघदूतातील उज्जयिनीचें वर्णन पहा. (श्लोक ३० व ३२) त्यांत 'प्रद्योतराजाच्या प्रिय कन्येला (वासवदत्तेला) येथून वत्सराज (उदयन) हरण करून घेऊन गेला, येथे त्याचें सोनेरी तालवृक्षाचें वन होतें, येथे त्याचा नलगिरि हा हत्ती आपला स्तम्भ उपटून सैरावैरा धावूं लागला, अशा गोष्टी सांगून उज्जयिनीचे पुरातनकथा जाणणारे लोक परकी गृहस्थांची करमणूक करतात' असें वर्णन आलें आहे. विदिशेवर शुंग राजाचें राज्य होतें हें आम्ही पुढे सिद्ध करणार आहों; व तसें तें असल्यास शुंग राजाच्यापूर्वी तीनचारशें वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या प्रद्योत व उदयन यांच्या गोष्टी उज्जयिनीस कालिदासकालीं माहीत होत्या, पण त्याच काळीं विदिशेस मात्र शुंग राजाच्या कथा लोकांस माहीत नव्हत्या असें आपणास म्हणता येईल काय व त्या विदिशेस माहीत असल्यास त्या कालिदासास माहीत नव्हत्या असेंही विधान करणें शक्य आहे काय, याचा वाचकानी विचार करावा. मेघदूतावरून (श्लो. २४–२६) कालिदासास विदिशेची चांगली माहिती होती असें दिसतें. तेथील वेत्रवती नदी व 'नीचैः' नामक टेकडी याचा त्याने निर्देश केला आहे; व ती नगरी दशार्ण देशाची राजधानी म्हणून चारी दिशास प्रसिद्ध आहे असें त्याने म्हटलें आहे. पश्चिम माळवा जिंकण्यापूर्वी विदिशा ही चंद्रगुप्ताची पाटलिपुत्राखालीच एक राजधानी होती असें काही विद्वानांचें म्हणणें आहे (जर्नल ऑफ इंडियन हिस्टरी, व्हॉ. ६, भा. २, पुरवणी मधील प्रो. कृष्णस्वामी ऐयंगार याचा द्वितीय चंद्रगुप्तावरील लेख, पृ. ५६ पहा).

तसें असल्यास आपल्या आश्रयदात्याबरोबर विदिशेसही काही काळ कालिदासाच्या मुक्काम असून त्या नगरीच्या पुरातन कथांची त्यास चांगली माहिती होती असें म्हणण्यास हरकत नाही. उदयनकालीनच कथा विशेष रम्य असल्याने लोकांच्या स्मरणात राहिल्या, शुगांच्या गोष्टी मात्र लोक विसरून गेले असण्याचा संभव आहे, असेंही म्हणता येणार नाही याला पुरावा कालिदासानंतर दोन अडीचशे वर्षांनी होऊन गेलेल्या बाणाच्या हर्षचरिताचा देता येईल. सध्या उपलब्ध असलेल्या सर्व पुराणात सेनापति पुष्यमित्रानें बृहद्रथ मौर्यास ठार मारून गादी बळकावली असा उल्लेख आहे. पण त्यास केव्हा व कसें मारलें याविषयी काहीच माहिती मिळत नाही. ती माहिती बाणानें हर्ष दिग्विजयास निघाला असता त्यास गजसैन्याधिपति स्कंदगुप्त याने जो उपदेश केला त्यात पुढीलप्रमाणे दिली आहे—सैन्याची पहाणी करण्याच्या मिषानें मूर्ख बृहद्रथ राजाला बोलावून सेनापति पुष्यमित्राने त्यास ठार मारिलें. (हर्षचरित, षष्ठ उच्छ्वास, निर्णयसागर प्रत, पृ. १९९ वहा) साराश, कालिदासकाली अशा प्रकारच्या कथा प्रचलित असणें व त्या त्यास माहीत असणें अशक्य नाही शुगमौर्यांची नावें कालिदासास कदाचित् दंतकथा-वरून कळली असतील, असें डॉ. केतकर एके ठिकाणी म्हणतात यावरून दंतकथांचें तत्कालीं अस्तित्व त्यास मान्य आहेसें दिसतें. पण तसें असल्यास दंतकथावरून कालिदासास शुगमौर्यांचीं नावेंच कळलीं, इतर काहीच माहिती मिळाली नाही, असें डॉक्टरसाहेब कोणत्या पुराव्यावरून म्हणतात तें समजत नाही.

### अभावात्मक प्रमाण व त्याचा उपयोग

मालविकाग्निमित्र नाटकाचें सविधानक कपोलकल्पित आहे हें सिद्ध करण्यास डॉ केतकर यानी दुसरें एक प्रमाण पुढे मांडलें आहे. त्याकडे आता वळू ते म्हणतात, "विदिशेवर अग्निमित्राचें राज्य होतें यास पुरावा काय ? पुराणात तसा उल्लेख आढळत नाही. पुष्यमित्राने अश्वमेध यज्ञ केला होता हें कशावरून ? कारण पतजलीच्या महाभाष्यात 'इह पुष्यमित्र याजयामः' असा फक्त यज्ञाचा उल्लेख आहे, अश्व

मेधाचा नाही, तेव्हां पुष्यमित्राने अश्वमेध केला नाही व अग्निमित्रहि विदिशेत राज्य करीत नव्हता." या प्रकारचे उल्लेख कोठे आढळत नाहीत हें गृहीत धरलें तरी या अभावात्मक प्रमाणावरून वरील गोष्टी कशा सिद्ध होतात तें समजणें कठीण आहे. अभावात्मक प्रमाणावरून (argumentum ex silentio) अनुमान काढणें पुष्कळदा धोक्याचें असतें. एखाद्या पुस्तकात अमुक एका गोष्टीचा उल्लेख नाही यावरून ती गोष्ट तें पुस्तक लिहिण्यापूर्वी घडली नव्हती असें अनुमान काढण्यापूर्वी ती गोष्ट घडली असती तर त्या पुस्तकात तिचा उल्लेख होणें स्वाभाविक व अपरिहार्य होतें, असें प्रथम दाखविलें पाहिजे. उदाहरणार्थ हल्ली लिहिल्या जाणाऱ्या प्रत्येक पुस्तकात गेल्या युरोपीय महायुद्धाचा उल्लेख येत नाही. असें एखादें १९२८ साली प्रसिद्ध झालेलें पुस्तक शंभर वर्षांनी एखाद्या संशोधकाच्या हातीं लागलें व त्यावरून तो १९२८ च्या पूर्वी महायुद्ध झालें नाही, असें अनुमान करूं लागला तर तें किती अयुक्तिक होईल बरें ! या कालच्या इतिहासाच्या पुस्तकात मात्र असा निर्देश नसल्यास तसें अनुमान करणें वाजवी होईल. संस्कृत शास्त्रज्ञानी सुद्धा अनुपलब्धि हें एक प्रमाण मानलें आहे. पण ती योग्य अनुपलब्धि असली पाहिजे. एखाद्या वस्तूच्या ज्ञानाला सर्व गोष्टी अनुकूल असूनहि तिचें ज्ञान होत नसेल तर त्यावरून तत्कालीं व तत्स्थलीं तिच्या अस्तित्वाचा अभाव सिद्ध करणें यास योग्य अनुपलब्धि असें म्हणतात. उदाहरणार्थ, दिवसा स्वच्छ प्रकाश पडला असतां दृष्टि धाव्रुत असलेल्या मनुष्यास एखादे ठिकाणीं घट दिसत नसेल तर तो तेथे नाही असें अनुमान करण्यास हरकत नाही. पण हेंच अनुमान तो मनुष्य एका अंधाऱ्या खोलींत जाऊन करूं लागला अगर एखादा आंधळा मनुष्य दिवसाउजेडींहि तसलें अनुमान करूं लागला तर तो त्या घटावर अडखळल्याशिवाय रहाणार नाही पुराणात राजाच्या फक्त वंशावली व फारच क्वचित् ते जेथे राज्य करीत होते त्या देशांचीं नावें येतात. पतंजलीचा तर उद्देश ऐतिहासिक गोष्टींचें वर्णन करण्याचा नसून डॉ० भांडारकराच्या संस्कृत पुस्तकात नियम समजण्याकरितां जशीं वाक्यें दिलेलीं असतात, तशाच रीतीने पाणिनीच्या सूत्रावरच्या चर्चेत उदा-

दूरणें देण्याचा आहे, हें महाभाष्याच्या अभ्यासकांस माहीत आहे. तेव्हा पतंजलीच्या महाभाष्यांत अश्वमेधाचा उल्लेख नाही, यावरून पुष्यमित्राने अश्वमेध यज्ञ केला नव्हता हें सिद्ध होत नाही. वास्तविक पाहतां पतंजलीचा उल्लेख अश्वमेध यज्ञाच्या विरुद्ध जात नाही. पुष्यमित्राने कोणताच यज्ञ केला नाही असें पतंजली म्हणत नाही तर 'आम्ही येथे पुष्यमित्राकडून यज्ञ करवितों' असें म्हणत आहे व अश्वमेध हाहि एक यज्ञच आहे

## पुष्यमित्राचा यज्ञ अश्वमेधच असावा

पुष्यमित्राने जो यज्ञ केला तो अश्वमेध असण्याचा बराच संभव आहे हें थोडासा विचार केला असता कोणाच्याहि लक्षात येईल. पुष्य-मित्रापूर्वी मौर्यांचें हिंदुस्थानावर साम्राज्य होतें. मौर्य सम्राट् अशोक हा बौद्धधर्माचा पक्का अभिमानी व पुरस्कर्ता असल्याने त्यानें आपल्या साम्राज्यात पशुवधास बंदी केली होती व ती त्यानंतरच्या राजानीहि तशीच चालू ठेविली असावी. हल्ली हिंदुधर्माचें स्वरूप फार बदललें असल्याने अशा नियंत्रणाचें आपणास कदाचित् काही वाटणार नाही. पण त्याकाळीं लोकांच्या धार्मिक भावना निराळ्या होत्या. यज्ञानें स्वर्ग मिळतो ही त्या पूर्वीच्या कालची समजूत तेव्हाहि प्रचलित होती. तेव्हा मौर्य राजा बृहद्रथ यास ठार मारून गादी बळकावल्यावर शेवटच्या मौर्यांच्या कारकीर्दीत पशुवधनियंत्रणामुळे त्रस्त झालेल्या हजारों आर्य-धर्मानुयायी लोकांचीं अंतःकरणें आपणाकडे वळवून घेण्याकरिता पुष्य-मित्रानें पशुवधात्मक यज्ञ करण्याचा निश्चय केला असावा. शिवाय आपणास अनुकूल कोणते राजे आहेत व आपला अंमल कोठपर्यंत चालू शकेल हेंहि जाणण्याची त्याची इच्छा असली पाहिजे. हे दोन्ही उद्देश साध्य होण्यासाठी कोणत्या यज्ञाची त्याने निवड केली असेल हें समजणें कठीण नाही. तेव्हा पतंजलीने ज्याचा उल्लेख केला आहे तो पुष्य-मित्राचा यज्ञ अश्वमेधच असला पाहिजे हें उघड आहे.

आतापर्यंत शुंगाचें विदिशेवर राज्य व पुष्यमित्राचा अश्वमेध याग या दोन गोष्टींवर डॉ. केतकरानी घेतलेले आक्षेप अत्यंत निर्बल

असून कालिदासाने वर्णिली त्याप्रमाणें परिस्थिति असणें अशक्य नाही हें दाखविलें. डॉ. केतकरांचा या मुद्द्यावर विशेष जोर असल्याने या दोन बाबतींत केवळ अनुमानावर विश्वासून न राहता बळकट पुरावा असल्यास तो पुढे मांडला जावा अशी वाचकांची अपेक्षा असणार. तेव्हा याकरिता कालिदासाच्या सुदैवाने जो थोडासा तसा पुरावा उपलब्ध आहे तो पुढील लेखांत मांडू.

## लेखांक तिसरा

### अग्निमित्र विदिशेस राज्य करीत होता यास पुरावा

पुष्यमित्राच्या कालाला आज दोन हजारावर वर्षे झालीं. इतक्या वर्षांपूर्वीचे कागदपत्र सध्या मिळणें अर्थातच शक्य नाही व शुंग राजांचे शिलालेखहि परवापर्यंत उपलब्ध नव्हते. तथापि शुंग नांवाचे राजे मगध देशांत होऊन गेले हें पुराणावरून माहीत होतें. प्रयागच्या नैऋत्येस १००।१२५ मैलावर भरहूत म्हणून गांव आहे तेथे फार प्राचीन स्तूप वगैरे अवशेष आढळतात. तेथें पूर्वी असलेल्या (परंतु आता कलकत्त्याच्या अजबखान्यांत ठेवलेल्या) स्तंभावर शुंगांच्या राज्यांत (प्राकृत, सुगनं रजे) वात्सीपुत्र धनभूति यानें व दुसऱ्या एकाने तें तोरण उभारलें अशा अर्थाचे दोन शिलालेख आहेत. (एपिग्राफिया इंडिका, व्हॉ. १० मधील प्रोफेसर ल्यूडर्सच्या कोरींव लेखांच्या यादींतील लेख नं. ६८७ व ६८८ पहा.) त्यावरून सध्याचा संयुक्तप्रांत शुंगांच्या अंमलाखाली होता यांत शंका नाही. विदिशा ही नगरी भरहूतपासून बरीच अंतरावर आहे. तेथें शुंगांचें राज्य होतें याला पुरावा नाही, असें डॉ. केतकर पुन्हा पुन्हा ठासून सांगतात. त्यांना आम्ही पुराणांतील एक उल्लेख नजर करतों. मत्स्य, वायु व ब्रह्मांड पुराणांत विदिशेच्या राजांची वंशावळ देतांना प्रथम तेथील नागवंशातील राजांचीं नांवें सांगितल्यावर खालील ओळ आली आहे. (पार्जिटरकृत 'कलियुगांतील राजवंश' पृ. ४८–४९ पहा)—

शुंगाना तु कुलस्यान्ते शिशुनन्दिर्भविष्यति ।

यांत अधोरेखाकित शब्द महत्त्वाचे आहेत. कारण त्यावरून विदिशेस शुंगांचें काही काल राज्य होतें हें सिद्ध होतें. प्रो. ऐयंगार याचे मतें तर शुंग राजे पूर्वीचे विदिशेचेच असावे. (जर्नल ऑफ इंडियन हिस्ट्री, व्हॉ. ६, भाग २, पुरवणी, पृ २ पहा.) तें जरी आपण मान्य केलें नाही तरी विदिशेवर शुंगराजाचें राज्य होतें हें मानण्यात काहीच अडचण नाही. शिवाय या भागात खुद्द अग्निमित्राचीं नाणींहि सापडलीं आहेत. (बॅ. जयस्वालाचा आक्टोबर १९२४च्या मॉडर्न रिव्ह्यूमधील लेख पहा.)

## पुष्यमित्राने अश्वमेध केला याबद्दल तत्कालीन पुरावा

पुष्यमित्राने अश्वमेध याग केला होता याबद्दल तर पुरावा तत्कालीन व म्हणून अत्यंत विश्वसनीय असा नुकताच ४ वर्षांपूर्वी उपलब्ध झाला आहे. मॉडर्न रिव्ह्यूच्या ऑक्टोबर १९२४ च्या अंकात पाटण्याचे प्रसिद्ध संशोधक बॅरिस्टर काशीप्रसाद जयस्वाल यानी एक शिलालेख प्रसिद्ध केला आहे. तो अयोध्येतील एका देवळाच्या दरवाजावर कोरलेला आहे. तो रा. जयस्वाल यानी पुढीलप्रमाणें वाचला आहे.

> [कोस]लाधिपेन द्विरश्वमेधयाजिनः सेनापतेः पुष्य-
> मित्रस्य षष्ठेन कौशिकीपुत्रेण धन...धर्मराज्ञः पितुः फल्गु-
> देवस्य केतन कारितम् ।
>
> ( भाषांतर–दोनदा अश्वमेधयाग करणाऱ्या सेनापति
> पुष्यमित्राचा सहावा, कोसल देशावर राज्य करणारा,
> कौशिकीपुत्र जो धन[देव] त्याने धर्मराजाच्या पित्याचें
> म्हणजे फल्गुदेवाचें हें प्रतिमागृह बांधलें आहे.)

रा. जयस्वाल यांचे मतें फल्गुदेव हा पुष्यमित्राचा बाप असावा. पुराणात पुष्यमित्राच्या बापाच्या नावाचा उल्लेख आला नसल्यामुळे या बाबतींत निश्चित काही सांगता येत नाही. धनदेवास ते पुष्यमित्राचा भाऊ समजतात परंतु पुढे त्यांनी कबूल केल्याप्रमाणे मुलगा मानणेंहि शक्य आहे. रा. जयस्वाल हे प्रसिद्ध पुरातनेतिहाससंशोधक आहेत.

त्यांनी लिहिलेलें 'भारतीयशासनपद्धति' (Hindu Polity) हें पुस्तक प्रसिद्ध आहे. या पुस्तकाच्या आधारेंच दोन वर्षांपूर्वी बाबू विपिनचंद्र पाल यांनी नागपुरास देमत व्याख्यानमालेंत व्याख्यानें दिलेली नागपूरकरांच्या स्मरणात असतील. तेव्हा त्यांनी वाचलेल्या या शिलालेखाच्या पाठामध्ये सहसा चुका असणार नाहीत, असें गृहीत धरण्यास हरकत नाही. तत्रापि मॉडर्न रिव्ह्यूमध्ये त्या लेखाचें छायाचित्र दिलें आहे तें पहावें.

हा शिलालेख शुंग घराण्याच्या इतिहासास व आपल्या प्रस्तुत विवेचनासही अत्यंत महत्त्वाचा आहे. यावरून पुष्यमित्राने आपल्या एका म्हणजे सहाव्या मुलास कोसल देशावर व्हाइसरॉय अगर राजा म्हणून नेमलें होतें असें दिसतें वायुपुराणाच्या एका प्रतीवरून पुष्यमित्रास ८ मुलगे होते व ते एकाच वेळीं राज्य करीत होते असें दिसतें. (पुष्यमित्रसुतास्चाष्टौ भविष्यन्ति समा नृपा'।) व पुष्यमित्र त्या मुलाचे द्वारें राज्य करीत होता असें सर्व पुराणातील 'पुष्यमित्रस्तु सेनानीरुद्धृत्य स बृहद्रथम्। कारयिष्यति वै राज्यम्' (सेनापति पुष्यमित्र बृहद्रथाला पदच्युत करून राज्य करवील) या श्लोकातील 'कारयिष्यति' या प्रयोजक क्रियापदावरून दिसत आहे. मुख्य महत्त्वाची गोष्ट म्हणजे पुष्यमित्राने एक नव्हे तर दोन अश्वमेध केले असा स्पष्ट निर्देश या शिलालेखात केला आहे ही होय जयस्वाल यांचे मतें दोन अश्वमेध करण्याचें कारण पहिला अश्वमेध केल्यावर कलिंग देशाचा राजा खारवेल याने त्याचा पराभव केला होता. त्यामुळे झालेली अपकीर्ति धुऊन काढण्याकरितां त्यानें दुसरा अश्वमेध केला असावा. मालविकाग्निमित्रात उल्लेखिलेला अश्वमेध हा पहिला असावा कारण त्यापूर्वी पुष्यमित्राने अश्वमेध केल्याचें पाचव्या अंकातील पुष्यमित्राच्या पत्रावरून दिसून येत नाही.

### पुष्यमित्राची सेनापति ही पदवी

दुसरी एक लक्षात ठेवण्याची गोष्ट ही की, यांत दोन अश्वमेध केल्यावरहि पुष्यमित्राने आपली पूर्वीची सेनापति हीच पदवी कायम ठेविली होती. एवढेंच नव्हे तर सर्व लोकांनीहि आपणास सेनापतिच,

म्हणावें अशी त्याची इच्छा दिसते व त्याप्रमाणे मालविकाग्निमित्राच्या पाचव्या अंकात कंचुकी व राणी धारिणी (पुष्यमित्राची सून) पुष्यमित्राचा 'सेनापति' असाच उल्लेख करतात. थोडा विचार केला असता यात अस्वाभाविक असें काहीच नाही. कोणाचेंहि एकदा एखादें नाव अगर पदवी लोकात प्रसिद्ध झाली म्हणजे तिचें कारण गेल्यावरहि ती चालू राहाते व त्या व्यक्तीसहि त्याचें काही वाटेनासें होतें. याला इतिहासातून अनेक उदाहरणें देता येतील अर्थशास्त्रकर्ता विष्णुगुप्त आपल्या ग्रंथात कौटिल्य नावानेच आपल्या मताचा निर्देश करतो. इ. स च्या सातव्या शतकात काठेवाडात वलभी येथे राज्य करणाऱ्या मैत्रक राजाच्या पहिल्या दोन पुरुषानी राज्यपद प्राप्त झाल्यावरहि सेनापति ही पदवी टाकली नाही असें त्याच्या वंशजाच्या कोरीव लेखावरून दिसतें मराठ्याच्या इतिहासातील प्रसिद्ध शूर पुरुष महादजी शिंदे यास पाटीलबुवा म्हटल्याबद्दल राग येत नव्हता हैद्राबादचे नवाब दिल्लीच्या बादशहाची सत्ता लयाला गेल्यावरहि अद्यापपर्यंत आपणास निजाम म्हणवून घेतात असो. तेव्हा डॉ. केतकर यानी कालिदासाने पुष्यमित्रास सेनापति असताच अश्वमेध यज्ञ करावयास लावलें यावरून त्याच्या दुष्कृत्यावर त्यास पांघरुण घालावयाचें होतें व त्यास राजकारणाचा गंधहि नव्हता अशीं जीं दोन अनुमानें काढली आहेत, तीं किती फोल आहेत हें आता वाचकाच्या ध्यानात येईल. कालिदासाच्या राजकारणविषयक ज्ञानाबद्दल पुढे सविस्तर लिहू सध्या रा. जयस्वाल याचे या बाबीसंबंधी खालील उद्गार मननीय आहेत—

> 'Kalidasa must have had contemporary records before him to note the intimate reference to him (Pushyamitra) as Senapati by the family members of the first Shunga.'

(पहिल्या शुंगराजाच्या कुटुंबातील मंडळी पुष्यमित्रास सेनापति म्हणून सलगीने उल्लेखित असत हें समजण्यास कालिदासास शुंगकालीन लेख उपलब्ध असले पाहिजेत)

## संस्कृत वाङ्मयांतील ऐतिहासिक उल्लेखांची विश्वसनीयता

वास्तविक रीतीने पाहता कालिदासाच्या नाटकात आलेल्या ऐतिहासिक उल्लेखाबद्दल स्वतंत्र पुरावा पुढे आला नाही तर ते उल्लेख बनावट असा जो डॉ. केतकर अट्टाहास करतात तो आमच्या मतें बरोबर नाही. हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाचीं साधनें इतकीं अल्प आहेत कीं संस्कृत वाङ्मयातील उल्लेख, उपोद्बलक स्वतंत्र प्रमाण मिळाल्याशिवाय, विश्वसनीय मानले जाऊ नयेत, असा नियम स्वीकारला तर पुराणेतिहाससंशोधनाची वाट खुंटल्याखेरीज राहणार नाही. तेव्हा इतर प्रबळ प्रमाणाचा विरोध नसेल तर वाङ्मयातील उल्लेख प्रमाण मानण्याचा संशोधकाचा प्रघात आहे. पुराण ग्रंथामध्ये राजे लोकांच्या कारकीर्दीचा काळ, अनुक्रम वगैरे बाबतीत परस्पर एकवाक्यता बरीच कमी आढळते व पुष्कळदा तत्कालीन कोरीव लेखाशीं त्याचा विरोध आढळतो. पण असें असलें तरी पुराणें सर्वस्वी त्याज्य मानलीं जात नाहीत. कालिदास, बाण इत्यादि ग्रंथकार जेव्हा काही ऐतिहासिक माहिती देतात तेव्हा ती त्यास उपलब्ध असलेल्या साधनाचा योग्य उपयोग करून देतात असेंच मानणें योग्य होईल केवळ स्वकपोलकल्पित काही तरी लिहितात असें प्रबळ प्रमाणाभावीं मानणें योग्य नव्हे 'मालविकाग्निमित्र नाटक लिहिण्यांत कालिदासाचा हेतु प्राक्कालीन इतिहास देण्याचा नव्हता त्या नाटकाकडे ललितवाङ्मयातील एक रमणीय कृति अशा दृष्टीने पाहिलें पाहिजे' हें डॉ. केतकराचें म्हणणें आम्हास कबूल आहे व त्या नाटकाच्या सविधानकात–कालिदास इ. स. ३५०–४५० या कालात होऊन गेला असल्यास–प्राचीन कथांचें व कदाचित् स्वकालीन परिस्थितीचें हि प्रतिबिंब पडलें असल्याचा संभव आहे हेंहि आम्हास मान्य आहे. तथापि कालिदासाने नाटकात आपल्या काळचेंच चित्र रंगविलें असें सिद्ध करण्यापुरता स्वतंत्र पुरावा डॉ. केतकरानी पुढे मांडला नाही ही आमची तक्रार आहे. एवढेंच नव्हे तर त्यानी जीं अनुमानें काढलीं आहेत तीं गुप्तकालातील ज्या थोड्या गोष्टी आम्हास माहित आहेत त्याच्याविरुद्ध असल्यामुळे त्याज्य आहेत असें आमचें मत आहे.

## कालिदासाच्या शीलावर शिंतोडे टाकण्यांत डॉ. केतकर यांचा हेतु

कोणत्याहि देशात पुराव्याची विश्वसनीयता साक्षीदाराच्या केवळ सख्येवरून ठरवीत नाहीत. सज्जनाची साक्ष–तो एकटा असला तरी–शेकडो दुर्जनाच्या साक्षीपेक्षा जास्त विश्वासार्ह मानली जाते. यामुळे हुशार वकील उलट तपासणीत एखादा साक्षीदार आपल्या विरुद्ध जाऊ लागला म्हणजे त्याच्या शीलावर शिंतोडे टाकून त्याची साक्ष खोटी आहे असें दरविण्याचा प्रयत्न करीत असतात अशा प्रकारचा अधिकार सध्याच्या पुराव्याच्या कायद्याच्या १४६ व्या कलमाने वकिलास हल्लीच्या न्यायव्यवस्थेत दिला आहे, पण त्या अधिकाराचा उपयोग वकिलाने फार जपून व तसे प्रश्न विचारण्यास सबळ कारणें असतील तरच करावा असें कलम १५० मध्ये ठरविलें आहे. कालिदासाने शुंगकालीन जी माहिती दिली आहे ती खोटी ठरविण्याकरिता अशाच मार्गाचा डॉ. केतकरानी अवलंब केलेला दिसतो. मालविकाग्निमित्राचें कथानक ऐतिहासिक दृष्ट्या चुकवायाचें का, तर कालिदासाने पुष्यमित्राने जो स्वामिद्रोह केला त्याबद्दल काहीच राग न दाखविता उलट आपली सहानुभूति निमकहराम सेनापतीस देऊन आपली हलकट वृत्ति दाखविली आहे म्हणून. थोडा विचार केला असता डॉक्टरसाहेबानी गरीब बिचाऱ्या कालिदासावर जी ही आग पाखडली ती किती अन्याय्य आहे हें दिसून येईल कालिदासाने पुष्यमित्राच्या कृत्याचा वाणाप्रमाणे धिक्कार केला नाही, ही गोष्ट खरी, पण त्याचें कारण मालविकाग्निमित्र ह्या नाटकाचें कथानक बृहद्रथाची पदच्युति अगर पुष्यमित्राचें राज्यारोहण हें नसून पुष्यमित्राच्या मुलाच्या म्हणजे अग्निमित्राच्या अन्त पुरातील प्रेमकथा आहे हें होय सेनापतीचा उल्लेख नाटकाच्या शेवटीं म्हणजे पाचव्या अंकात आला आहे तेथे कालिदासाने त्याचा धिक्कार करणें अप्रस्तुत झालें असतें. कालिदासाने त्याचा धिक्कार केला नाही, पण त्यास सहानुभूतीहि दाखविलेली आम्हास कोठे दिसत नाही त्यास सेनापति म्हणण्यात कालिदास ऐतिहासिक सत्यास अनुसरत होता

आहे. तेव्हा त्याच्या शीलाला मुद्दाम कालिमा लाव-
ण्याचा प्रयत्न डॉ. केतकरांनी सर्व उपलब्ध माहिती गोळा
कारणामुळे केला की काय हें वाचकांनीच ठरवावें.

## लेखांक चवथा

### मालविकाग्निमित्र नाटकाचें सविधानक गुप्तकालीन होतें काय ?

मालविकाग्निमित्र नाटकाचें संविधानक वस्तुतः शुंगकालीन नसून गुप्तकालीन असावें, कालिदासकाली राजस्थलक हीन कुळांतला असावा, राणीहि हीन कुळांतील असून केवळ आपल्या सौंदर्याच्या जोरावर राणी झाली असावी, इत्यादि आश्चर्यकारक विधानें डॉ. केतकरांनी केलीं आहेत; पण हें सिद्ध करण्यास जरूर त्या पुराव्याचा बोजा स्वतःवर असतांही त्याच्या पुष्टयर्थ त्यांनी एकहि प्रमाण पुढें मांडलें नाहीं. शुंग-कालीन माहिती आपणास फार थोडी असल्यामुळें नाटकाचें सविधानक शुंगकालीनच आहे असें सिद्ध करणें अर्थातच अशक्य आहे; पण तें गुप्तकालीनच असावें अशी जी डॉ. केतकरांची कल्पना आहे ती मात्र निर्मूल आहे असें दाखविणें सोपें आहे. शेक्सपीयरप्रमाणेच आपल्या नाटकांचीं कथानकें कालिदास स्वतः कल्पित नसून तो महाभारत, पुराणें इत्यादिकांतून घेतो. मालविकाग्निमित्र नाटकाची ऐतिहासिक चौकट सत्य आहे हें आम्हीं मागें दाखविलेंच आहे. बाकीचें कथानक शुंगकालाविषयीं त्यावेळीं प्रचलित असलेल्या दंतकथांवरून किंवा गुणाढ्याच्या बृहत्कथेवरून त्यानें घेतलें असेल. ही बृहत्कथा मूळ पैशाची भाषेंत होती. ती सध्या उपलब्ध नाहीं. पण तिचीं साराशरूपानें दोन रूपांतरें–सोमदेवाचा कथासरित्सागर व क्षेमेंद्राची बृहत्कथामंजरी-हीं सध्या उपलब्ध आहेत. त्यांत पुढील गोष्ट आली आहे. ( कथासरित्सागर, कथामुखलम्बक, तरंग ६, निर्णयसागर प्रत, पृष्ठ ५६)—

"अवन्ती अथवा उज्जयिनी येथील राजा महासेन याच्या मुलीचा-वासवदत्तेचा-विवाह वत्सदेशाचा राजा जो उदयन त्याच्याशीं झाला होता. वासवदत्तेच्या पालक नावाच्या भावाने आपण स्वतः जिंकून आणलेली एक बन्धुमती नावाची राजकन्या आपल्या बहिणीस भेट म्हणून पाठविली. ती अत्यंत रूपवती असल्यामुळे वासवदत्तेने तिला मञ्जुलिका असें नाव ठेवून गुप्त ठेविली. पुढे एके दिवशीं उद्यानलतागृहात वसंतक नावाच्या आपल्या प्रियमित्र विदूषकास घेऊन फिरत असता उदयनाने तिला पाहिली व तिच्याशीं गुप्तपणें गान्धर्व विवाह केला. हें तेथेंच लपून असलेल्या वासवदत्तेने पाहिलें व त्यामुळे तिला क्रोध येऊन ती वसंतकाला बाधून घेऊन गेली. तेव्हा राजा तिच्या माहेरच्या सांकृत्यायनी नामक परिव्राजिका मैत्रिणीला शरण गेला व तिच्या साहाय्याने त्याने वसंतकास सोडवून आणलें. राणीच्या अनुमतीने परिव्राजिकेने बन्धुमती राजास अर्पण केली."

डॉ. केतकरानी आपल्या लेखात मालविकाग्निमित्राचें कथानक दिलें असल्याने तें वाचकांच्या परिचयाचें आहे. तेव्हा त्यात व वरील कथेंत असणारें साम्य त्यांच्या लक्षात आलें असेलच. दोहोंतहि नायिका प्रथम गुप्तरूपाने असणें, विदूषकाच्या साहाय्याने उद्यानलतागृहात भेटणें, नंतर बंदिवास व शेवटीं परिव्राजिकेच्या साहाय्याने नायिकेशीं राजाचा विवाह या गोष्टी समान आहेत. दोन्ही कथात फरकहि अर्थात् पुष्कळच आहे. तथापि कथानक कोठून तरी घेऊन त्यात जरूर ते फरक करण्याची कालिदासाची सवय लक्षात घेता मालविकाग्निमित्राचें सविधानक बृहत्कथेंतून घेतलें असणें असंभवनीय नाही. त्यावरून कालिदासकाळींहि अशीच परिस्थिति होती हें अनुमान, अन्य पुरावा असल्याशिवाय, काढणें मात्र योग्य होणार नाही. कारण इ. स च्या ७ व्या शतकात होऊन गेलेल्या सम्राट् हर्षाच्या प्रियदर्शिका व रत्नावलि या नाटिकांचेंहि सविधानक या रीतीचेंच असल्यामुळे त्यांच्या बाबींतहि तसेंच अनुमान करावें लागेल व तें हास्यास्पद होईल हें सांगणें नकोच.

### उज्जयिनीस विदर्भांचा मत्सर वाटत होता याचीं (डॉ. केतकर यांच्या मतें) कारणें

मालविकाग्निमित्र नाटक लिहिण्यांत कालिदासाचा जो दुसरा हेतु होता असें डॉ. केतकर म्हणतात त्याचें आता परीक्षण करूं. त्यांच्या मतें या नाटकांत विदिशेच्या राजानें विदर्भ राज्याच्या राजाचा पाडाव केला असें दाखविलें, त्याचा हेतु उज्जयिनीच्या लोकांस खूप करणें होय. कारण उज्जयिनी व विदिशा हीं राज्यें व राजधान्या दोन असल्या तरी राष्ट्र (माळवा) एकच. तेव्हा विदिशेबद्दल उज्जयिनीच्या लोकांस आपलेपणा वाटत होता. विदर्भ देशाची पूर्वीपासून वाङ्मयांत प्रसिद्धि होती; पण कालिदासापूर्वी उज्जयिनीस वाङ्मयांत स्थान नव्हतें. तेव्हा उज्जयिनीच्या लोकांस विदर्भाविषयीं मत्सर वाटत असे त्यांस खूप करण्याकरितां विदर्भराजाचें हीनत्व व उदासपणा कालिदासानें दाखविला आहे.

### वरील कारणांचें परीक्षण

वरील विभागांतील प्रत्येक वाक्य खोडून काढतां येईल. आधी उज्जयिनी व विदिशा येथे दोन स्वतंत्र राज्यें होतीं असें डॉ केतकरांनी सिद्ध केलें नाहीं. उज्जयिनी ही चंद्रगुप्त विक्रमादित्याची राजधानी होती हें त्यांनी मान्य केलेंच आहे. विदिशाहि द्वितीय चद्रगुप्ताच्याच अमलाखालीं होती हें विदिशेपासून थायव्यदिशेस दोन मैलांवर उदयगिरि नावाच्या टेकडीवरील गुहांत द्वितीय चद्रगुप्ताच्या मांडलिक राजानें आणि अमात्यान कोरलेले दोन लेख उपलब्ध झाले आहेत (फ्लीट, गुप्त इन्स्क्रिप्शन्स्, न. ३ व ४ पहा) व जवळच त्याची येथेहि चन्द्रगुप्ताच्या काळचा शिलालेख आहे (गु इ., न. ५ पहा) त्यावरून सिद्ध होईल. उज्जयिनी व विदिशा येथे दोन राज्यें होतीं असें कबूल केलें तरी मालविकाग्निमित्राचें कथानक विदिशा येथें घडलें असें दाखवून विदिशेविषयीं उज्जयिनीच्या लोकांस आपलेपणा वाटत असल्यामुळें आपणच विदर्भदेशाचा पाडाव केला असें त्यांस वाटावयास लावावयाचें एवढा द्राविडी प्राणायाम करण्यापेक्षा उज्जयिनीसच कथानक घडलें असें दाखविलें असतां चाललें नसतें काय ? कारण डॉ० केतकरांच्या मतें विदिशेस अग्निमित्राचें राज्य

होतें हें कालिदासास माहीत नव्हतें तेव्हा उज्जयिनीच्या राजाने विदर्भाचा पराभव केला असें दाखविण्याने कालिदासाचा हेतु साध्य झाला असता व 'व्याकरणाभ्यासजड पंडित व माळव्याच्या दरबारातील भोळे लोक' याच्या कल्पनाशक्तीसहि ताण बसला नसता.

## उज्जयिनी विदर्भापेक्षा कोणत्याहि बाबतींत कमी नव्हती

विदिशेच्या राजाने विदर्भाचा पराभव केला असें दृश्य पाहून उज्जयिनीच्या लोकास हर्ष होण्याचें कारण त्यांस विदर्भाच्या कीर्तीबद्दल मत्सर वाटत होता हें जें डॉ केतकर याचें विधान आहे त्याचें आता परीक्षण करू. या मत्सराचें जें कारण त्यानी दिलें आहे तें हें की, विक्रमादित्य व कालिदास याच्यापूर्वी विदर्भाची वाङ्मयात प्रसिद्धि होती व उज्जयिनीची नव्हती. या विधानास नेहेमीप्रमाणेच त्यानी काही आधार दिले नाहीत विदर्भ देशाची 'सारस्वती जन्मभूः' म्हणून राजशेखराने स्तुति केली आहे खरी व वैदर्भी रीति ही सर्व रीतींत श्रेष्ठ गणली जाते हेंहि खरें. पण कालिदासाच्या पूर्वी विदर्भात होऊन गेलेल्या ग्रंथकाराची आपणास माहिती नाही, वैदर्भी रीतीचा उल्लेखहि प्रथम इ स ६०० च्या सुमारास (म्हणजे कालिदासानतर १५०–२०० वर्षांनी) होऊन गेलेल्या दण्डीच्या काव्यादर्शात प्रथम आढळतो, त्यामुळे त्याचाहि प्रस्तुत बाबतींत उपयोग करणें योग्य होणार नाही विदर्भ हें रुक्मिणीचें माहेर म्हणून वाङ्मयात प्रसिद्ध होतें असें म्हटलें तर उज्जयिनी ही बुद्धकालीन चण्डमहासेन राजाच्या काळापासून वासवदत्तेचें माहेर म्हणून तितकीच प्रसिद्ध आहे. इतकेंच नव्हे तर पाली वाङ्मयावरून बुद्धकालीन 'अवन्तिदक्षिणापथ' या देशात विदर्भाचा अतर्भाव होत असे असें दिसतें (डॉ देवदत्त भाण्डारकर याचीं कारमायकेल लेक्चस, १९१८, पृ. ४५ पहा) कालिदासाच्या पूर्वी उज्जयिनीची अतिशय भरभराट होती. तेथें राज्य करणाऱ्या क्षत्रप रुद्रदामन् प्रभृति परकी राजानीही सस्कृत विद्येस उत्तेजन दिलें होतें, हें सध्या उपलब्ध अस लेल्या रुद्रदामन् याच्या गिरनार येथील खडकावरील इ. स १५० च्या सस्कृत कोरीव लेखावरून सिद्ध होत आहे विस्तृत हिंदुस्थ नच्या

पश्चिम किनाऱ्यावरील बंदरांचा व्यापार या शहरामार्फतच चालत असे. (व्हिन्सेंट् स्मिथ्, अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया, पृ २९१ पहा.) क्षत्रपाचा पराभव केल्यावर चंद्रगुप्ताने उज्जयिनी ही आपली राजधानी केली. त्यावेळीं तर तिची अत्यंत भरभराट होत असली पाहिजे. उज्जयिनींत परीक्षा दिल्यावरच कालिदास, मेंठ, अमर, भारवि इत्यादि कवि प्रसिद्धि पावले असें राजशेखरच्या काव्यमीमांसेंत (पृष्ठ ५५) उद्धृत केलेल्या एका श्लोकावरून दिसतें. विदर्भांत रामगिरि (रामटेक)-सारखीं तीर्थें असल्यामुळे उज्जयिनीच्या लोकास मत्सर वाटत असेल असें म्हणावें तर फार प्राचीन कालापासून उज्जयिनीची मोक्षदायक पुरी म्हणून कीर्ति आहे (अग्निपुराण, अ. १०९ पहा). तेथील महाकालेश्वराची द्वादश ज्योतिर्लिंगांत अद्यापि गणना करतात व कालिदासाच्या मेघदूतांतील वर्णनावरून तें देऊळ त्याच्या वेळींही फार प्रसिद्ध असावें असें दिसतें. तेव्हा कोणत्याहि बाबतींत उज्जयिनी विदर्भाच्या राजधानीपेक्षा कमी नव्हती. आपल्यापेक्षा बरचढ असलेल्या माणसाच्या ऐश्वर्याबद्दल आपणास हेवा वाटतो. समान अगर कमी प्रतीच्या माणसाबद्दल वाटत नाही. जो न्याय व्यक्तींस तोच शहरांसहि लागू आहे.

*विदर्भराजाचें अग्निमित्रास उत्तर*

'डॉ. केतकरांनी निर्दिष्ट केलेल्या कारणाहून निराळ्याच काही कारणाने उज्जयिनीच्या लोकांस विदर्भाचा मत्सर वाटत असेल. कारण काही असो, मालविकाग्निमित्र नाटकांत विदर्भाची हीनता व उद्दामपणा, नंतर त्याचा झालेला पराजय व त्या पराजयाचें कालिदासाने केलेलें रसभरित वर्णन हीं तरी दिसतातच की नाही?' अशी वाचकाच्या मनात शंका येण्याचा संभव आहे. तेव्हा डॉ० केतकरांनी जो हा भ्रम उत्पन्न केला आहे त्याचें निरसन करणें जरूर आहे. विदर्भराजाची हीनता दाखविण्यासाठी त्याने अग्निमित्राच्या खलित्यास पाठविलेल्या व मालविकाग्निमित्राच्या पहिल्या अंकात दिलेल्या उत्तरातील भाषासरणीवर डॉ० केतकरांनी जोर दिला आहे. अग्निमित्र आपणास अहेतुरे करतो

तरी विदर्भराजा त्यास पूज्य म्हणतो व त्यायोगें आपली हीनता दाखवितो असें डॉक्टरसाहेब म्हणतात. पूर्वीची पत्रलेखनपद्धति कशी होती हें सध्या समजण्यास मार्ग नाही. गायकवाड ओरिएंटल सीरीजमध्ये लेखनपद्धति म्हणून एक ग्रंथ अलीकडे प्रसिद्ध झाला आहे. पण त्याचा लेखक पुढे फार वर्षांनी म्हणजे इ. स. १५ व्या शतकात होऊन गेला असल्यामुळे त्याचा आपणास काही उपयोग होणार नाही. संस्कृत वाङ्मयात अशी फारच थोडीं—नऊ दहा पत्रें उपलब्ध आहेत. त्यातहि संधिविग्रहाचीं तर अत्यल्प. त्यामुळे विदर्भ राजाच्या उत्तराची त्यांच्याशीं तुलना करता येईल असें एकहि पत्र मिळत नाही. आम्ही मालविकाग्निमित्र नाटकांतील पत्र पुन्हा पुन्हा वाचलें पण त्यावरून विदर्भराजाची हीनता कशी व्यक्त होते तें आम्हास समजलें नाही. विदर्भ राजाने अग्निमित्रास पूज्य म्हटलें आहे तर अग्निमित्रानेहि त्याचा एकदा 'भवतः' म्हणजे 'आपला' असा बहुमानद्योतक सर्वनामाने निर्देश केला आहे. पण आमच्या मतें अशा विशेषणावर फार जोर देणें योग्य नव्हे. तीं लेखकाचें हृद्गत क्वचितच व्यक्त करतात. सध्याहि आपल्या कट्टया दुष्मनासही लिहिताना आपण 'राजमान्य राजश्री' अगर 'श्रीयुत' म्हणून मराठींत संबोधतों व इंग्रजींत 'आपला आज्ञाधारक सेवक' असें स्वतःसंबंधाने लिहितों. पण त्यावरून एकाद्याने लेखकाच्या हीनतेचें अनुमान काढलें तर योग्य होईल काय ? कदाचित् शुंगकालीं विदर्भाचें राज्य शुंगसाम्राज्याच्या मानानें लहान असेल व त्यामुळे विदर्भाचा दर्जा कमीहि असण्याचा संभव आहे. तरीहि विदर्भराजाने जें सभ्यतापूर्वक पण स्पष्ट व निर्भीड उत्तर पाठविलें आहे त्यावरून अन्तःपुरात रममाण होणाऱ्या चढाईखोर अग्निमित्रापेक्षा त्याच्याबद्दल आपणास जास्त सहानुभूति वाटते. पुढे विदर्भ राजाचा पराजय झाला आहे हें खरें, पण त्या पराजयाच्या वर्णनात विशेष काही नाही. पराजित राजाच्या नगरींत अगर तिच्याजवळच्या नदीच्या तटावर भाट विजयी राजाचीं स्तुतिस्तोत्रें गातात ही कल्पना केवळ कालिदासाच्या इतर ग्रंथातच नव्हे तर अन्य ठिकाणींही आढळते. (पहा रघु. ४. ७८, आदित्यसेनाचा अफ्सड येथील शिलालेख, श्लो. १४, फ्लीट–गुप्त इन्स्क्रिप्शन्स्, न. ४२.)

### कालिदासाची विदर्भाविषयी वृत्ति

खरें, कालिदासास विदर्भाविषयी इतका तिटकारा होता तर तो त्यानें इतरत्र दाखविला पाहिजे होता. पण तसें तर कांहीं दिसत नाही. कालिदासानें आपले ग्रंथ वैदर्भी रीतीत लिहिले असें मानलें जातें. (अवन्तिसुन्दरीकथा, पृ. २ पहा). रघुवंशात विदर्भ राजकन्या इंदुमती हिचा विवाह व तिच्या निधनानंतर अजाचा शोक ज्यात वर्णिला आहे ते म्हणजे सहावा व आठवा हे सर्ग उत्कृष्ट गणले जातात. पाचव्या सर्गात 'क्रथकैशिकानां (?) विदर्भाधिपराजधानीम् (५, ४०) सौराज्यरम्यान् अपरो विदर्भान् (५, ६०) अशी विदर्भाच्या समृद्धीविषयी व सुराज्याविषयी विधानें आलीं आहेत. कालिदासाचे समग्र ग्रंथ लक्षात न घेता एखाद्या ग्रंथाचा श्लोक काढून अनुमान करीत असल्यामुळे डॉ. केतकरांची स्थिति हत्तीच्या सोंडेला स्पर्श करून हत्ती अजगरासारखा आहे असें म्हणणाऱ्या आंधळ्यासारखी झाली आहे, हें यावरून वाचकांच्या ध्यानात आलें असेल.

## लेखांक ५

### विदर्भाचा थोडा प्राचीन इतिहास

कालिदासाच्या मनात विदर्भाविषयी तिटकारा नव्हता हें मागे दाखविलें. पण याच्याहि पुढे जाऊन आपणास म्हणता येईल की त्याला विदर्भाबद्दल अभिमान व आपलेपणा वाटत होता. याकरिता विदर्भाच्या इतिहासाचें अलीकडे झालेलें संशोधन ध्यानात घेतलें पाहिजे. त्यावरून असें दिसतें की त्याकाळीं विदर्भावर वाकाटकांचें फार समृद्ध असें राज्य होतें. गुप्तवंशात महान् पराक्रमी राजे होऊन गेले पण त्यांनी विदर्भाचें सामर्थ्य ओळखून त्याच्याशीं हातघाईचा प्रसंग टाळलेला आढळतो द्वितीय चंद्रगुप्ताचा पिता समुद्रगुप्त याने जिंकलेल्या देशाची यादी प्रयागच्या किल्ल्यात अद्यापि उभ्या असलेल्या अशोकाच्या शिलास्तंभावर उत्कीर्ण केलेली आहे. त्यात कांची, कोसल, कलिंग इत्यादि

दक्षिण देशाचीं नावें आहेत पण विदर्भाचें नाव नाही. कालिदासाचा आश्रयदाता द्वितीय चन्द्रगुप्त–विक्रमादित्य यानें तर आपली मुलगी प्रभावतीगुप्ता ही वाकाटक घराण्यातील राजा द्वितीय रुद्रसेन यास दिली होती. रुद्रसेन पुढे लवकरच मरण पावला त्यास दिवाकरसेन व दामोदरसेन असे दोन (काहींच्या मतें तीन) पुत्र होते. ते लहान असल्यामुळे त्याच्या तर्फे प्रभावतीगुप्ता ही पुष्कळ वर्षे राज्यकारभार पाहत होती. त्यापैकी एक मुलगा (द्वितीय) प्रवरसेन या नावाने राज्य करूं लागला परंतु त्याचें लक्ष राज्यकारभारापेक्षा काव्याभ्यासाकडे फार होतें. त्याने सेतुबंध किंवा रावणवहो (संस्कृत, रावणवध) नावाचें प्राकृतभाषेंत एक मोठें काव्य लिहिलेलें प्रसिद्ध आहे. त्या काव्याचा कर्ता प्रवरसेन होता याबद्दल बाण (सातवें शतक) क्षेमेंद्र (अकरावें शतक) इत्यादिकाच्या ग्रथांत उल्लेख आहेत.

## कालिदास व विदर्भ यांचा संबंध

या ग्रथावर सोळाव्या शतकाच्या शेवटीं होऊन गेलेल्या रामदास नावाच्या राजाची टीका आहे. त्यांत आरंभींच 'इह तावन्महाराजप्रवरसेननिमित्तं महाराजाधिराजविक्रमादित्येनाज्ञप्तो निखिलकविचक्रचूडामणि. कालिदासमहाशयः सेतुबन्धप्रबन्धं चिकीर्षु.'''इ. उल्लेख आहे. त्यावरून कालिदासाने प्रवरसेनाकरिता महाराजाधिराज (चन्द्रगुप्त) विक्रमादित्याच्या आज्ञेने तो सेतुबंध ग्रंथ तपासला असावा असें विद्वानांचें मत आहे. (भाण्डारकर इन्स्टिट्यूटच्या ॲनल्स्, व्हा ५, भाग १ व मिथिक सोसायटीचें जर्नल, व्हॉ. १५, नं. २, पृ १५३ यातील प्रोफेसर ऐयगार यानें वाकाटकावरचे लेख पहा मराठी वाचकांस याबद्दल माहिती विविधज्ञानविस्तार, वर्ष ५८, अंक ३ यात रा. य. रा गुप्ते याच्या लेखात मिळेल. वर सांगितल्याप्रमाणें विदर्भाचा राजा (विक्रमादित्याचा नातु) कालिदासाचा प्रियशिष्य व मित्र होता वाकाटक राजे रामटेकास जात येत असत हें श्री. य. रा गुप्ते यानी प्रसिद्ध केलेल्या ऋद्धपूरच्या ताम्रपटावरून दिसतें कालिदासहि तेथें बरोबर जात असला पाहिजे म्हणूनच त्याने आपल्या मेघदूत काव्यांत यक्षाचें निवासस्थान रामगिरि होतें असें वर्णिलें आहे.

..,वरील विवेचनावरून मालविकाग्निमित्र नाटक रचण्यांत कालिदासाचा उद्देश विदर्भाचें हीनत्व दाखविणें हा असणें शक्य नाही ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट झाली असेल असें वाटतें. राणीस अगर राजदयालकास चिमटे घेणें हाहि उद्देश असणें शक्य नाही; कारण जरी विक्रमादित्याला अनेक स्त्रिया होत्या याबद्दल पुरावा आहे तरी त्यांतील कोणी हीन कुळांतील होती व आपल्या सौंदर्याच्या जोरावरच राणी झाली होती असें मानण्यास पुरावा नाही. तसेंच कालिदासाचा असा कुजका स्वभाव होता हेंहि सिद्ध झालें नाही. शिवाय अशा प्रकारचे सहज दिसणारे उल्लेख त्याच्या नाटकांत असते तर त्याची दरबारांतून लवकरच उचलबांगडी झाली असती. तेव्हा डॉ. केतकराची ही कल्पनेची इमारत पार कोसळून पडली आहे.

### मालविकाग्निमित्र रचण्यांत कालिदासाचा उद्देश

मालविकाग्निमित्र नाटक रचण्यात कवीचा काय उद्देश असावा याचा विचार करण्यांत वेळ घालविणें व्यर्थ होईल तथापि कल्पनाच करावयाची तर कालिदासाचे काळीं जसा चंद्रगुप्त-विक्रमादित्याने शकांचा पराभव केला, साम्राज्य स्थापिलें व संस्कृतविद्येस उत्तेजन दिलें, त्याप्रमाणेच पूर्वी शुंगराजानीही केलें होतें व प्रभावतीगुप्ता व रुद्रसेन यांच्या विवाहामुळे माळवा व विदर्भ यांचा जसा संबंध जोडला गेला तसाच तो पूर्वीहि जोडला गेला होता हें दाखविण्याचा कालिदासाचा उद्देश असावा. असो.

### कालिदासाचें राजकारणविषयक ज्ञान

येथवर डॉ. केतकर यांच्या लेखमालेंतील मुख्य विधानाचें खंडण केलें. याशिवाय अनेक विधानें त्या लेखात विखुरलेलीं आहेत. त्या सर्वांचा समाचार घेऊं म्हटलें तर एक मोठाच ग्रंथ होईल. तथापि लेखणी खालीं ठेवण्यापूर्वी एकदोन विधानाचा विचार करणें जरूर आहे. पुष्यमित्र सेनापति असताच यज्ञ करतो त्यावरून व विदर्भ देशाचा राजा पत्रात जी भाषा योजतो त्यावरून कालिदासास राजकारणाचें ज्ञान नव्हतें

असे जे डॉ. केतकराचे दोन आक्षेप आहेत त्यास वर उत्तर आलेंच आहे. तिसरा आक्षेप हा की विदिशेवर राज्य करणारा अग्निमित्र आपल्या बापाचा अंकित होता तरी आपल्या बापाच्या संमतीची वाट न पाहता तो मौर्य सचिवास मुक्त करतो असें कालिदासाने दाखविलें आहे. यावर उत्तर देण्याकरिता मालविकाग्निमित्राचें जरा बारीक निरीक्षण केलें पाहिजे. पहिल्या व शेवटच्या अंकावरून ज्या मौर्यसचिवाच्या सुटकेची अट विदर्भराजा घालत आहे तो अग्निमित्राच्या कैदेंत विदिशेस होता, पाटलिपुत्रास नव्हता असें दिसतें. व म्हणूनच 'आपण मौर्यसचिवास सोडाल तर मी माधवसेनास मुक्त करीन' असें विदर्भराजा म्हणत आहे. 'सोडवाल तर' असें म्हणत नाही पत्राचें उत्तर विदर्भराजाकडून आल्याबरोबर अग्निमित्र आपल्या बापाच्या संमतीची वाट न पाहता सैन्यासह वीरसेनास विदर्भावर चालून जाण्यास आज्ञा करतो यावरूनही परराष्ट्रांशीं संधिविग्रहाच्या बाबतींत देखील अग्निमित्रास हल्लीच्या भाषेंत बोलावयाचें तर पूर्ण प्रांतिक स्वायत्तता होती असें दिसतें शिवाय 'मनातील राग दूर करून सर्व स्नियासह तू विलंब न करता (पाटलिपुत्रास) यज्ञाकरिता ये' असें पुष्यमित्राने लिहिलें आहे, त्यावरून अग्निमित्र काही कारणाने बापाशीं फटकून वागत होता असें दिसतें. अयोध्येंतील मागे दिलेल्या शिलालेखावरून पुष्यमित्रास निदान ६ मुलगे होते व त्यापैकी सहावा अयोध्येजवळच्या प्रदेशात राज्य करीत होता असें सिद्ध होतें. पूर्वीच्या उत्तर पांचाल (हल्लीचा संयुक्तप्रांत) देशाची राजधानी अहिच्छत्र या शहरच्या आसपास शुंगाचीं बरींच नाणीं सांपडली आहेत त्यावरून तेथेहि शुंगाचें राज्य होतें यात शंका नाही (व्हि. स्मिथचा कलकत्याच्या इंडियन् म्युझियम्‌मधील नाण्याचा कॅटलाग, व्हॉ. १, पृ १८४ पहा). पुष्यमित्राचा ज्येष्ठ मुलगा अग्निमित्र विदिशेस राज्य करीत होता. या सर्व प्रमाणावरून पुष्यमित्राने आपले पुत्र साम्राज्याच्या निरनिराळ्या प्रांतावर राजे म्हणून नेमले होते व तो त्याच्याकडून आपल्या वृद्धपणीं राज्य करवीत असे, असें दिसतें व हेंच पुराणांतील 'सेनापति पुष्यमित्र अमुक वर्षे राज्य करवील' अशा प्रयोजक क्रियापदाच्या प्रयोगावरून सिद्ध होत आहे. तेव्हा यावरून

अग्निमित्राने आपल्या बापाची संमति न घेता मौर्यसचिवास सोडून दिलें या आक्षेपांत काहींच तथ्य राहात नाही. कालिदासाचें राजकारण-विषयक ज्ञान किती होतें हें त्याच्या ग्रंथातील पुराव्यावरून सिद्ध करू म्हटलें तर मोठाच लेख लिहावा लागेल, तो पुढे केव्हा तरी लिहू पण केलेल्या विवेचनावरून संगीतादि कला, शिक्षण इत्यादि विषयांत निपुण असलेला कालिदास केवळ राजकारणांतच जडबुद्धि ठरेल असें वाटत नाही.

## कालिदासाचें भौगोलिक ज्ञान

वर्धा नदीच्या योगानें विदर्भाचे उत्तर दक्षिण विभाग होतात असें कालिदास नाटकात म्हणतो यावरून त्याचें भौगोलिक अज्ञान व्यक्त होतें असें डॉक्टरसाहेब म्हणतात त्याचा आता विचार करू.

कालिदासाने आपल्या ग्रंथात अनेक देशांचीं, नगरांचीं, पर्वतांचीं व नद्यांची वर्णनें दिलीं आहेत. मेघदूतातील मेघाच्या अलकेपर्यंतच्या मार्गाचें वर्णन, रघूच्या दिग्विजयाचें ४ थ्या सर्गांत केलेलें वर्णन, कुमारसंभवांतील हिमालयाचें वर्णन इत्यादिकांवरून त्याचें भौगोलिक ज्ञान बिनचूक होतें अशी प्रचलित समजूत आहे रघुवंशाच्या सहाव्या सर्गांत पाड्य राजाच्या राजधानीचें वर्णन आलें आहे, त्यावरून कालिदासाचा काल ठरविण्याचा रा. चिंतामणराव वैद्यांनी प्रयत्न केला आहे तो एरव्ही त्यांनी केला नसता (भा. इ. ॲनाल्स, व्हा. २, भाग १.) कालिदास विदर्भांत आला असावा असें आम्ही वर सप्रमाण म्हटलें आहे. त्यावरून विदर्भाच्या भूगोलाविषयी तो चूक करील असें वाटत नाही

वर्धा नदीच्या प्रवाहाचा हा उल्लेख कसा बरोबर आहे हें रा यादवराव काळे यांनी 'महाराष्ट्र'च्या ता ९ डिसेंबरच्या अंकात उत्तम रीतीने दाखवून दिलें आहे कोणत्याहि नदीच्या प्रवाहाची दिशा आरंभा पासून अखेरपर्यंत एकसारखी राहात नसल्यामुळे तिच्या तटाचा उल्लेख करिताना दक्षिण (उजवा) व उत्तर (डावा) या शब्दांचा प्रयोग करतात. कालिदासाने आणखी एके ठिकाणीं असाच एक उल्लेख केला आहे त्याच्याकडे आम्ही डॉक्टरसाहेबांचें लक्ष वळवितो. मालवि

काग्निमित्रातील पुष्यमित्राच्या पत्रात 'सुमित्राने सिंधुनदीच्या दक्षिण तीरावर यवनसेनेचा पराभव केला' असा उल्लेख आहे. ही सिंधुनदी सिंधमधील प्रसिद्ध सिंधुनदी नसून विदिशेच्या उत्तरेस सुमारें ५० मैलावर उगम पावणारी राजपुतान्यातील संस्थानें आणि बुंदेलखंड यास विभागणारी व शेवटीं यमुना नदीस मिळणारी सिंधुनदी असली पाहिजे असें विद्वानांनी दाखवून दिलें आहे. (व्हिन्सेंट् स्मिथ्–अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया, पृ. २०१ पहा.) ही नदी नैऋत्येकडून ईशान्येकडे वाहत जाणारी आहे तरी तिच्या तीराचा 'दक्षिण' असाच उल्लेख कालिदासाने केला आहे. उज्जयिनीपासून बऱ्याच अंतरावर असलेल्या वर्धा नदीच्या प्रवाहाची दिशा कालिदासास बरोबर माहीत नव्हती असें घटकाभर कबूल केलें तरी उज्जैनीपासून जवळच उगम पावणाऱ्या सिंधुनदीचीहि त्यास बरोबर माहिती नव्हती असें डॉक्टरसाहेब म्हणणार नाहीत असें वाटतें. तेव्हा रा. यादवराव काळे यांनी सुचविलेला अर्थच आम्हास ग्राह्य वाटतो. डॉक्टरसाहेब करतात तसा दक्षिण व उत्तर या शब्दाचा अर्थ केला तरी कालिदासाचें वर्णन निर्दोष आहे हें दाखविणेंही कठीण नाही.

'त्याने वर्धा नदीने विदर्भाचे उत्तर दक्षिण विभाग होतात असें म्हटलें आहे तें कसें ?' या डॉक्टरसाहेबांच्या प्रश्नास उत्तर हें की त्यामुळे व्यवहारात वऱ्हाडचे कोणते दोन भाग विवक्षित होते हें समजण्यास अडचण येत नाही. कालिदास काही तहाचीं कलमें देत नाही. तसें असतें तर त्याने डॉ. केतकर म्हणतात त्याप्रमाणे वर्धा ही नदी वायव्येकडून आग्नेयेकडे वाहत जाते तिने होणारे भाग असें म्हटलें असतें. शिवाय हें ध्यानात घेतलें पाहिजे की, विदर्भाच्या ह्या तुकड्याचा निर्देश कालिदासाने एका श्लोकात केला आहे व कवितेंत अशा बारीक सारीक गोष्टी येणें शक्य नसतें. डॉ केतकर म्हणतात त्याप्रमाणे वर्धा नदीने विदर्भाचे पूर्व पश्चिम असे तुकडे होतात असें कालिदास म्हणता तरीहि तीच अडचण आली असती, कारण वर्धा अगदी बरोबर दक्षिण उत्तर वाहत नाही. नद्या कांही तह करणाऱ्यांच्या सोईकरिता वाहत

नाहीत तर तह करणार नदीचा प्रवाह देशाचे विभाग करण्यास सोईचा म्हणून तहनाम्यात निर्दिष्ट करतात. तेव्हा कालिदासाच्या उल्लेखाचा साधारणत बरोबर अर्थ लागत असेल तर तो जास्त खोलात गेला नाही, व नदीच्या प्रवाहाची बरोबर दिशा त्याने दाखविली नाही यावद्दल त्यास दोष देणें योग्य नव्हे असें आम्हांस वाटतें पण याहिपुढे जाऊन कालिदासाने वर्धा नदीच्या प्रवाहाचा निर्देश केला आहे तो बरोबर आहे असें म्हणता येईल. कारण सध्या वऱ्हाड आहे त्याच्या खालचाहि भाग पूर्वी विदर्भात मोडत असे (रा. या. मा. काळे याचा वऱ्हाडचा इतिहास, पृ. २६ पहा) व यांतील काही भाग वर्धा नदीच्या दक्षिणेसच येतो. शिवाय वायव्येकडून आग्नेयेकडे वाहत असणाऱ्या नदीच्या प्रवाहाने होणारे देशाचे भाग उत्तर दक्षिण असें ठरलेलेले जातात हें अर्वाचीन काळातील एका तहाच्या कलमाचा उल्लेख करून दाखविता येईल इ. स. १७११ मध्ये कोल्हापूरकर संभाजी व सातारकर शाहू याच्या मध्ये जो तह झाला तो वारणेचा तह म्हणून इतिहासात प्रसिद्ध आहे. त्याचें सहावें कलम पुढील आहे "वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून दक्षिण-तीर तहत निवृत्तिसंगम तुंगभद्रेपावेतो दरोबस्त देखील गड ठाणीं तुम्हा-कडे दिलीं असत." ( मराठी रियासत, मध्यविभाग, भाग १, पृ. ११२ पहा ) वारणा ही नदी लहान असल्याने लहान नकाशात दाखविली नसते पण ग्रँट डफच्या मराठ्यांच्या इतिहासात जोडलेल्या नकाशासारख्या विस्तृत नकाशात पाहिलें असता असें आढळून येईल की कृष्णावारणा-संगमापासून पुढे शभर सवाशें मैल कृष्णेचा प्रवाह वायव्येकडून आग्नेये-कडेच वहात आहे. तरीहि वरील तहात 'कृष्णेच्या दक्षिणतीरचीं सर्व गडठाणीं कोल्हापुरकरास दिलीं' असा निर्देश केला आहे ज्या मराठ्यानी सदैव मुलुखगिरी केली त्यासहि स्वतःच्या प्रदेशाच्या भूगोलाचें ज्ञान नव्हतें असें डॉ. केतकर म्हणणार नाहीत असें वाटतें मग त्यानी जर वायव्येकडून आग्नेयेकडे वाहणाऱ्या नदीच्या योगें होणाऱ्या देशाच्या भागास तहनाम्यात सुद्धा उत्तर दक्षिण असें म्हटलेलें चालतें तर कालि-दासाने ललितवाङ्मयात व एका श्लोकात तसाच उल्लेख केल्यास तो का न चालावा ?

# लेखांक ६

## कालिदासाचें बौद्ध धर्माचें व वाङ्मयाचें ज्ञान

कालिदासास बौद्ध व जैन धर्माचें ज्ञान नव्हतें असें डॉ. केतकर म्हणतात त्याचा आता विचार करूं. कालिदासाने बौद्ध अगर जैन ग्रंथ लिहिले नसल्याने या बाबतींत प्रबल प्रमाण देणें शक्य नाही. कोणाहि मनुष्यास असलेलें सर्व ज्ञान त्याच्या ग्रंथात येत नाही. तसें झालें तर प्रत्येक ग्रंथ त्या माणसाचा ज्ञानकोशच झाला असता तेव्हा कालिदासाच्या ग्रंथात बौद्ध वाङ्मयाचे अगर धर्माचे उल्लेख नाहीत या अभावात्मक प्रमाणावरून त्याच्या अज्ञानाचें अनुमान करणें सयुक्तिक होणार नाही. पण थोडा विचार केला तर कालिदासास बौद्ध धर्माचेंहि ज्ञान असावें असें दिसेल. गुप्त राजे ब्राह्मण धर्माचे व संस्कृत विद्येचे पुरस्कर्ते होते; तथापि भारतीय राजांच्या संप्रदायास अनुसरून ते बौद्धधर्माचाही परामर्श घेत असावे. त्यांच्या कालातील अनेक भव्य बौद्ध विहार पुराणवस्तुसंशोधन खात्याने उजेडात आणले आहेत. चिनी यात्रेकरी फा हायन् हा द्वितीय चंद्रगुप्ताच्या कारकीर्दीत इ० स० ४०५-४११ या अवधींत हिंदुस्थानात प्रवास करून गेला त्याने लिहून ठेवलेल्या प्रवासवर्णनावरून त्यावेळीं हिंदुस्थानात बौद्ध धर्म जोरात होता असें दिसतें. (व्हिन्सेंट् स्मिथ्-अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया, पृ ३०७ पहा.) विदिशेच्या दक्षिणेस जवळच असलेल्या साची येथील स्तूपाकरिता चंद्रगुप्ताच्या एका अधिकाऱ्याने २५ दीनारांचें दान केलें व त्याचें अर्धें पुण्य आपल्या राजास व अर्धें आपणास ठेवलें असा एक शिलालेख साची येथे सापडला आहे. (फ्लीट्-गुप्त इन्स्क्रिप्शन्स्, पृष्ठ २९ पहा). त्यावरून बौद्ध धर्माचा चंद्रगुप्त द्वेष करत नव्हता असें दिसतें व कदाचित् त्याचाहि त्यास आश्रय असेल तेव्हा कालिदासासारखा चौकस मनुष्य आपल्या देशात आपल्या डोळ्यासमोर भरभराटींत असलेल्या बौद्ध धर्माविषयी पूर्ण अज्ञानी राहील असें वाटत नाही. कालिदासाने स्वकालीन इतिहास अगर ऐतिहासिक गोष्टी यास आपल्या ग्रंथाचे विषय केले नसल्यामुळे

अर्थातच त्यात बौद्ध धर्माचे उल्लेख नाहीत. कालिदासानंतर २००—२५० वर्षांनी होऊन गेलेल्या बाणाच्या काळांत कालिदासाच्या काळातल्यापेक्षा बौद्धधर्माची स्थिति जास्त अवनत झाली होती. तरीहि बाण आपल्या हर्षचरितात वसुबन्धूचा कोश व बुद्धजन्मकथात्मक जातकें यांचा निर्देश करतो. (हर्षचरित, निर्णयसागर प्रत, पृ. २३७.) यावरूनहि वरीलच अनुमान निघत नाही काय? जैन धर्माचा प्रसार मात्र माळवा व उज्जयिनी येथे होता की काय याबद्दल आम्हास माहिती नाही; त्यामुळे त्या बाबतींत आम्ही काही निश्चित लिहू शकत नाही.

## अग्निमित्र हा आदर्शभूत राजा मानतां येईल काय?

येथवर कालिदासाबद्दची जी अनुमानें अगर आक्षेप होते त्यांचें खंडन केलें आता मालविकाग्निमित्र नाटकाचें परीक्षण करताना डॉ॰ केतकरांनी त्यातील पात्राविषयी जे उद्गार काढले आहेत त्यांचा विचार करू. अग्निमित्र हा तत्कालीन राजनीतीच्या दृष्टीने व कालिदासाच्या मतेंही आदर्शभूत राजा होता असें एक विधान डॉक्टरसाहेबांनी केलें आहे. नाटकातील नायक नाटककर्त्याच्या दृष्टीने आदर्शभूत पुरुष असतो अशी डॉ॰ केतकरांची समजूत दिसते पण ती खरी नाही तसें असतें तर कालिदासाने अग्निमित्र, पुरूरवस् व दुष्यन्त हे निरनिराळ्या स्वभावाचे पुरुष एकाच विषयात आदर्श मानले होते असें होईल कारण तिघांचेंही नाट्यविषयक चरित्र प्रेमकथात्मकच आहे. कार्यांवरल्या मुलाचा बाप अन्त पुरात अनेक स्त्रिया असता आणखी एका—तारुण्यात जिने नुकतेंच पदार्पण केलें आहे अशा—बालिकेवर अनुरक्त होतो, तिच्याशी चोरून लगट करताना पकडला गेल्यावर आपल्या स्त्रीच्या पाया पडतो, पण पुनः आपला नाद सोडत नाही, बापाने अश्वमेध यज्ञ आरंभिला असून दिग्विजय करण्याकरिता अश्व सोडला असता त्याच्या मागे स्वतः जाऊन त्याचें रक्षण करण्याचें स्वतःचें कर्तव्य सोडून आपल्या अल्पवयस्क कुमारास तें कार्य करण्यास पाठवितो, विदर्भ देशावरहि स्वतः स्वारी करीत नाही तर त्यावेळीं अतःपुरात प्रेमचेष्टा करण्यात दंग असतो, अशा विलासी व कर्तव्यशून्य राजाला, आपल्या इतर ग्रंथात

दिलीप, रघु, राम इत्यादि राजर्षींचीं उदात्त चरित्रें रसाळ वाणीनें वर्णन करणारा व परकी क्षत्रप राजांचा पाडाव करून उत्तर हिंदुस्थानांत हिंदूंचें एकच्छत्री साम्राज्य चालविणाऱ्या द्वितीय चंद्रगुप्त-विक्रमादित्याचा आश्रित कालिदास आदर्श मानील असें आम्हास वाटत नाही. अग्निमित्राचें चित्र पाहून तत्कालीन लोकास 'राजकारणासाठी नवीन बायको करण्यात राजाची वैषयिक वृत्ति व्यक्त होत नसून सोशिकपणा व्यक्त होत आहे' असें वाटे, असें जें डॉ. केतकर म्हणतात तें वाचून आम्हास तर फार हसूं येतें. आधी अग्निमित्रानें राजकारणासाठी लग्न केलें असा कोठे निर्देश नाही. माधवसेन आपल्या बहिणीस घेऊन विदिशेस तिचें अग्निमित्राशीं लग्न लावण्यासाठी जात होता असें पहिल्या अंकावरून दिसतें हें खरें. पण तें लग्न राजकारणासाठी कसें हें समजत नाही. माधवसेन विदर्भाच्या कोणत्याहि भागावर राज्य करीत होता असें नाटकावरून दिसत नाही. विदर्भाच्या गादीवर तो हक्क सांगत असावा, पण त्याचें काही न चालून ती गादी दुसऱ्यासच मिळाली. तेव्हा तो अग्निमित्राचें साहाय्य मागण्याकरिता व त्यासाठी त्या विलासी राजाला आपली बहीण अर्पण करण्याकरिता जात होता; तेव्हा त्याच्या दृष्टीनें तें लग्न राजकारणासाठी झालें खरें, पण अग्निमित्राला त्यापासून राजकारणविषयक फायदा झालेला दिसत नाही. नाही म्हणावयाला त्याला विदर्भावर स्वारी करावयास पाहिजे होती ती सबब मात्र मिळाली. आपल्या शेजारच्या राजास आपला शत्रु मानावें ही पुरातन नीति आहे व यामुळे अग्निमित्र 'विदर्भराजा माझा स्वाभाविक शत्रु (प्रकृत्यमित्र) आहे व त्यामुळे त्याच्यावर स्वारी करून त्याचा उच्छेद करण्याचें मी पूर्वीच ठरविलें होतें, तेव्हा त्यावर चालून जाण्यास वीरसेनास आज्ञा कर' असें अमात्यास सांगत आहे. विदर्भ जिंकण्यांत त्याला माधवसेनाचें साह्य झालेलें दिसत नाही व तो जिंकल्यावर माधवसेनास राज्य न देतां दुसऱ्या कोणाहि आपल्या हस्तकास त्यास तें देतां आलें असतें. तेव्हा राजकारणासाठी अग्निमित्रानें लग्न केलें असें दिसत नाही. आता मालविकाग्निमित्र नाटकावरून कालिदास-कालीहि वृद्ध राजानें राजकारणासाठी लग्न केलें असावें असें डॉक्टर-

साहेब म्हणतात त्याचा विचार करतां असें दिसतें की कालिदासकालीं राजकारणाकरितां चन्द्रगुप्ताने आपली मुलगी विदर्भाधिपति वाकाटक राजास दिली होती हें खरें, पण स्वतः चन्द्रगुप्ताने आपल्या वृद्धापकाळीं दुसऱ्या राजाच्या अगदी तरुण मुलीशीं लग्न केलें होतें यास पुरावा नाही. तेव्हां अशीं अनुमानें काढण्यात वेळ सर्व करणें व्यर्थ आहे. अशीं लग्नें करण्यात राजे लोक सोशिकपणा दाखवितात हें डॉ. केतकरांचें विधान इतकें हास्यास्पद आहे की, त्याचें खंडण करण्याचा आवश्यकता नाही.

## इरावतीचें सुरापान

कालिदासाने इरावतीस मद्य पिऊन झिंगलेल्या स्थितींत स्टेजवर आणलें त्यात राणीची चेष्टा करून लोकांत हंशा पिकवावा व राणीसद्धि दारू पिण्यास ऐतिहासिक आधार आहे असें भासवावें व दोहींकडून शाबासकी मिळवावी असा कालिदासाचा उद्देश होता असें डॉ. केतकर म्हणतात पण तें सयुक्तिक दिसत नाही. संस्कृत कवि तरुण पुरुष व स्त्रिया मद्यप्राशन करून विलास करतात असें वर्णन करतात हें खरें आहे. स्त्रियाच्या बाबतींत मद्य (अर्थात् माफक प्रमाणातच) पिण्याने नेत्र चंचल होतात, भाषण मधुर व वक्रोक्तिपूर्ण होतें, गति विलासी दिसते व मुख आरक्त होतें–सारांश सौंदर्य जास्त खुलून दिसतें असा एक कविसंप्रदाय होऊन गेलेला दिसतो (काव्यप्रकाशांतील 'मीलित' अलंकाराचें उदाहरण पहा) व असें वर्णन कालिदासाच्या व इतर कवींच्याहि काव्यात आढळतें. जें श्रव्यकाव्यात वर्णन दिसतें तेंच दृश्यकाव्यात म्हणजे नाटकात कालिदासाने आणलें आहे यात दुसराहि कालिदासाचा उद्देश असावा. धारिणी व इरावती या दोन राण्यांच्या स्वभावामध्ये फार फरक कालिदासाने दाखविला आहे एक मध्यम वयाची व म्हणून पतीचे प्रेमविषयक चाळे पसंत नसताहि मालविकेबद्दल जिला मत्सर वाटत नाही 'न मे एष मत्सरस्य काल ' असें म्हणणारी अशी, तर दुसरी तरुण, नृत्यगायनादि शिकणारी व राजाचें प्रेम आपल्यावरून उडून जाऊ नये म्हणून थोरल्या राणीला सांगून मालविकेला बंदिवासात टाकणारी अशी दाखविली आहे व हा त्याच्या वयातील व स्वभावातील फरक दिसून येण्याकरिता मद्यप्राशन केलेल्या इरावतीस रंगभूमीवर आणलें आहे. ज्याचें तारुण्य

उलटून गेलें आहे त्या स्त्रिया मद्यप्राशन करीत असत असा कोठेहि उल्लेख नाही. तथापि इरावती झिंगलेल्या अवस्थेंत होती असें डॉक्टर-साहेबांचें म्हणणें अतिशयोक्तीचें आहे तिच्या अंकातील तिच्या भाषणांत अगर वर्तनांत असंबद्धता दिसत नाही झिंगलेल्या माणसाचें भाषण व वर्तन कसें असतें, हें व्यवहारांत रोज दिसणाऱ्या दृश्यावरून कोणासहि कळेल व संस्कृत नाटकांत हें चित्र पहावयाचें असल्यास तें इ. स. च्या सातव्या शतकाच्या प्रथमार्धांत होऊन गेलेल्या पल्लवनृपति महेंद्रविक्रम-वर्म्याच्या मत्तविलासप्रहसनांत दिसून येईल मालविकाग्निमित्रांतील इरावतीच्या वारुणीमदाचें दृश्य प्रेक्षकांना दाखविण्याइतकें उत्तान नाही व कालिदासकालीन राणीला मद्य प्यावयाचें होतें तर कालिदासाच्या नाटकांत प्राचीन आधार दिसेपर्यंत ती थांबली असेल असें आम्हांस वाटत नाही तेंव्हा या बाबतींतही डॉक्टर केतकरांचें अनुमान चूक आहे.

## समारोप

डॉ० केतकर विद्वान् गृहस्थ आहेत त्यांनी केलेल्या ज्ञानकोशाच्या प्रचंड कामाबद्दल प्रस्तुत लेखकास त्यांच्याबद्दल अतिशय आदर वाटतो त्यांनी प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासाचें जें अत्यंत महत्त्वाचें व दीर्घ परिश्रमाचें काम अंगावर घेतलें आहे त्याबद्दल ते सर्वांच्या स्तुतीस व साहाय्यास पात्र आहेत त्या कामांत त्यांस निरुत्साह करावें अगर विघ्नें आणावीं असा प्रस्तुत लेखकाचा उद्देश नाही पण येन केन प्रकारेण नवीन संशोधन करण्याची सवय व थोर पुरुषांवर पुरेशीं कारणें नसताहि शिंतोडे टाकण्याची आपली वृत्ति त्यांनी टाकली नाही, तर ते सध्या लिहीत असलेला प्राचीन महाराष्ट्राचा इतिहास अत्यंत विकृत रुपाने बाहेर पडण्याचा संभव आहे याबद्दल त्यांस वेळींच सूचना देणें आपलें कर्तव्य आहे असें प्रस्तुत लेखकास वाटत असल्यामुळे त्याने ही विस्तृत लेखमाला लिहून वाचकास शीण दिला आहे यांत परीक्षणाच्या ओघांत अधिकउणा शब्द येऊन गेला असल्यास डॉक्टरसाहेबांनी त्यास क्षमा करावी शेवटीं या प्रसंगानें कविकुलगुरूच्या कृतींचें जास्त परिशीलन करण्याचा योग डॉ० केतकरांनी आणून दिला याबद्दल त्यांचे आभार मानून लेखणी खालीं ठेवतो.

# कालिदास आणि अश्वघोष*

## श्री. अ. ज. करंदीकर यांस उत्तर

दृष्टपूर्वा अपि ह्यर्थाः काव्ये रसपरिग्रहात् ।
सर्वे नवा इवाभान्ति मधुमास इव द्रुमाः ॥ '

आनन्दवर्धन, ध्वन्यालोक, ४, ४.

कालिदास आणि अश्वघोष यांच्या पौर्वापर्याचा विचार करणारा श्री. अ ज. करंदीकर यांचा लेख 'सह्याद्री'च्या गेल्या जून महिन्यात (१९४८, पृष्ठ २८२) प्रसिद्ध होऊन अनेक महिने झाले. पण तेव्हापासून अनेक कार्यांत व्यग्र असल्याने हें काम मागे पडलें; तथापि 'अकरणान्मन्दकरणं श्रेयः' असें वाटून येथे थोडक्यात उत्तर देत आहें.

### उचलेगिरी कां म्हणतां ?

कालिदास किंवा अश्वघोष यांपैकी कोणीहि दुसऱ्याची नक्कल केली असली किंवा त्याचे काही शब्दप्रयोग घेतले असले, तरी त्या प्रकाराला 'उचलेगिरी' किंवा 'वाङ्मयचौर्य' म्हणणें योग्य होणार नाही. नाही तर या उचलेगिरीचा आरोप अनेक महनीय संस्कृत ग्रंथकारावर लागू होईल. योगायोगाची गोष्ट ही की, श्री. करंदीकर यांचा वरील लेख 'सह्याद्री'त प्रसिद्ध झाला याच सुमारास प्राध्यापक पी. एस्. शास्त्री यांचा 'मॉडर्न् रिव्ह्यू' (मे, १९४८)च्या अंकात 'संस्कृत वाङ्मयातील उचलेगिरी' ( *Plagiarism in Sanskrit Litera-*

* सह्याद्रि' पुणें, मार्च १९४९, पृ. ३०–३३

ture ) या शीर्षकाखाली एक लेख प्रकाशित झाला. त्यामध्ये त्यांनी यास्काच्या 'निरुक्ता'तून 'महाभाष्य'कार पतंजलि व पूर्वमीमांसासूत्रकार जैमिनि यांनी काही भाग घेतल्याचें दाखविलें आहे. याशिवाय कालिदासाचें भारवीने, भारवीचें माघाने, भारवि व माघ यांचें श्रीहर्षाने, अनुकरण केल्याचें त्यांनी सांगितलें आहे तसेंच शास्त्रीय वाङ्मयांत मधुसूदनसरस्वतीने आपल्या भगवद्गीताटीकेंत विद्यारण्याच्या जीवन्मुक्तिविवेकांतून व नागोजीभट्टाने आपल्या काव्यप्रकाशटीकेंत रसगंगाधरांतून कित्येक उतारे उचलून घेतलेले अभ्यासकांना आढळतात. हे सर्व ग्रंथकार आपापल्या ग्रंथनिर्मितीने आपणास आदरणीय झाले आहेत त्यांना 'वाङ्मयचोर' म्हणणें योग्य होणार नाही यासारखे समान उतारे आम्ही आपल्या विद्यागिरदर्शेत गुरुवर्य म म श्रीधरशास्त्री पाठक यांस दाखविले तेव्हा ते म्हणाले, "ग्रन्थस्य ग्रन्थान्तर टीका". याच आशयाचें 'सर्वोऽपि परेभ्य एव व्युत्पद्यते' असें राजशेखराचें वचन आम्ही आपल्या ग्रंथांत दिलें होतें संस्कृत ग्रंथकारांना तात्त्विक विचारांचा किंवा कल्पनांचा मक्ता मान्य नव्हता. किंबहुना मूळ कल्पना तीच असली तरी तिला रसभावादिकांच्या योजनेने नवीनता प्राप्त होते असें सुप्रसिद्ध साहित्यशास्त्रकार सहृदयमूर्धन्य आनन्दवर्धन याने या लेखाच्या आरंभीं दिलेल्या कारिकेंत म्हटलें आहे व त्याचीं अनेक उदाहरणहि त्याने आपल्या 'ध्वन्यालोका'त दिलीं आहेत त्यांपैकी एक तर खुद्द कालिदासाच्या ग्रंथांतील 'एववादिनि देवर्षौ पार्श्वे पितुरधोमुखी । लीला-कमलपत्राणि गणयामास पार्वती ॥' (कुमारसंभव, ६, ८४) हा सुप्रसिद्ध श्लोक असून त्यांत तत्पूर्वीची कल्पना व्यङ्ग्यार्थामुळे अभिनव झाल्याचें दाखविलें आहे आनन्दवर्धन म्हणतो 'कवींच्या काव्यामध्ये कल्पना-संवाद असणारच, पण त्यामुळे सर्वत्र त्या कल्पना एकच आहेत, असें शहाण्यांनी मानूं नये ' संवाद किंवा कल्पनासाम्य हे तीन प्रकारचें असतें—

(१) बिंबप्रतिबिंब रूपाचें, (२) वस्तु व तिचें चित्र या प्रकारचें, व (३) सारख्या दिसणाऱ्या भिन्न व्यक्तींचें यांपैकी पहिलीं दोन त्याज्य असून तिसरें मात्र ग्राह्य आहे त्या तऱ्हेचें कल्पनासाम्य कवीने टाळूं नये असा उपदेश आनंदवर्धनाने स्पष्ट शब्दांत केला आहे.

आनन्दवर्धन पुढे म्हणतो—

> यदपि तदपि रम्यं यत्र लोकस्य किञ्चित्
> स्फुरितमिदमितीयं बुद्धिरभ्युज्जिहीते ।
> अनुगतमपि पूर्वच्छायया वस्तु तादृक्
> सुकविरुपनिबध्नन् निन्द्यतां नोपयाति ॥
>
> ध्वन्यालोक, ४, १६.

[ कवीने पूर्वीची कल्पना ग्रंथात घेतली असली तरी त्याच्या वर्णनामध्ये रम्य प्रतिभास्फुरणाची प्रतीति सहृदयांना होत असेल तर तो कवि दोषी होत नाही. ] आनन्दवर्धनाचें स्पष्ट मत असें आहे आम्ही आपल्या ग्रंथात अन्य पुराव्यांनी अश्वघोषाचें कालिदासपूर्वगामित्व सिद्ध केल्यावर अश्वघोष व कालिदास यांच्या काव्यांतील काही समान स्थळें दिलीं आहेत त्यावरून 'कालिदासाने अश्वघोषाच्या काव्याचा चांगलाच अभ्यास केलेला दिसून येईल या अभ्यासामुळे रमणीय कल्पना व काही शब्दसमूह याप्रमाणेच अश्वघोषाच्या काही विशिष्ट लकबाहि कालिदासाच्या काव्यांत आलेल्या दिसतात,' असें म्हणून त्यांचीं काही उदाहरणेंहि दिलीं होतीं व 'अश्वघोषाचे दोष टाळून व मधुकर वृत्तीने त्याच्या काव्यांतील सुंदर असाच भाग घेऊन कालिदासाने आपले ग्रंथ रचले' असें म्हटलें होतें यामुळे त्या कविवर्याची निंदा कशी होते तें आम्हांस समजत नाही

## अश्वघोष व कालिदास यांच्यात फरक कोणता ?

पण 'असा कल्पना व शब्दसमूह घेण्याची सवय परोपजीवि अश्वघोषाला होती, कालिदासाला नव्हती,' असें श्री करंदीकर म्हणतात व तें सिद्ध करण्याकरिता 'ललितविस्तर' व 'बुद्धचरित' यांतील कल्पनासाम्य पुढे करतात. कालिदासाने मात्र व्यासवाल्मीकि वगळून दुसऱ्या कवींच्या उक्तींची उचलगिरी केलेली दाखवा असें आव्हान देतात. 'ललितविस्तर' व 'बुद्धचरित' यांचा विषय एकच असल्याने त्या दोन ग्रंथांत अनेक ठिकाणीं कल्पनासाम्य दिसलें तर नवल नाही तसाच

प्रकार 'वाल्मीकिरामायण' व 'रघुवंश' या ग्रंथांत दिसतो. या दोन ग्रंथांतील विविध साम्य संशोधकांनी दाखविलें आहे व तें श्री. करंदीकरांनाहि मान्य आहे, म्हणून त्याचीं उदाहरणें येथें देत नाही. या विषयावर एक उत्कृष्ट लेख प्राच्यविद्यापरिषदेच्या नागपूरच्या अधिवेशनांत वाचला होता. त्यांत याचीं अनेक उदाहरणें जिज्ञासूंस सापडतील. कालिदासानें वाल्मीकीच्या ग्रंथांतून 'उक्तींची उचलेगिरी' केली तरी चालते, अश्वघोषानें मात्र 'ललितविस्तरा'तून अशी उसनवारी करणें अक्षम्य, हा कोठला न्याय! पण 'याशिवाय डॉ. विमलाचरणांनी भगवद्गीता, श्वेताश्वतर उपनिषद्, मज्झिमनिकाय, महानिद्देस, थेरीगाथा, दिव्यावदान इत्यादि ग्रंथांतून अश्वघोषानें केलेल्या उचलेगिरीची भरपूर उदाहरणें दाखवून दिलीं आहेत. तेव्हां अश्वघोष हा परोपजीवी लेखक होता हें सिद्ध करीत बसण्याची आतां काहीच आवश्यकता उरली नाही' असें श्री. करंदीकर म्हणतात. 'आमचा कालिदास त्या मानानें फारच सोज्ज्वळ! त्यानें फक्त दोनच पूर्वगामी कवींच्या उक्तींची उचलेगिरी केली आहे' असें त्यांचें म्हणणें आहे. तें खरें आहे काय हें आपण पाहू.

कालिदासानें उपनिषदें व भगवद्गीता यांचा चांगलाच अभ्यास केला होता. त्यामुळें त्याच्या ग्रंथांत त्यांतील पारिभाषिक संज्ञा व तत्त्वज्ञानाच्या कल्पना आढळतात हें आम्ही सविस्तरपणें 'कालिदास' ग्रंथांत (पृ. ७७ व २६५) दाखविलें होतें. याशिवाय कौटिल्याचें अर्थशास्त्र व वात्स्यायनाचें कामसूत्र यांतूनही काही कल्पना व शब्दप्रयोग त्यानें घेतले आहेत; असें संशोधकांनी दाखविलें आहे. उदाहरणार्थ, खालील उतारे पाहा—

### कौटिल्य व कालिदास

(१) कौटिल्य–नवस्तु राजा···प्रकृतिष्वरूढः सुखमुच्छेत्तुं भवति ।
अर्थशास्त्र, ८, २.

कालिदास—अचिराधिष्ठितराज्यः शत्रुः प्रकृतिष्वरूढमूलत्वात् ।
नवसंरोपणशिथिलस्तरुरिव सुकरः समुद्धर्तुम् ॥ मालविकाग्निमित्र, १.

(२) कौटिल्य—तेजो हि सन्धानकारणम् । नातप्तं लोहं लोहेन सन्धत्त इति । अर्थशास्त्र ७, ३.

कालिदास—तप्तेन तप्तमयसा घटनाय योग्यम् ।
विक्रमोर्वशीय, ३, १६.

(३) कौटिल्य—आपन्नसत्त्वायां कौमारभृत्यो गर्भभर्मणि प्रजनने च वियतेत । अर्थशास्त्र, १, १६.

कालिदास—कुमारभृत्याकुशलैरनुष्ठिते भिषग्भिराप्तैरथ गर्भभर्मणि ॥ रघुवंश, ३, १२.

(४) कौटिल्य—स्थिरकर्मा नासमाप्य कर्म उपरमते ।
अर्थशास्त्र, ७,८.

कालिदास—न नवः प्रभुराफलोदयात् स्थिरकर्मा विरराम कर्मणः ॥
रघुवंश, ८, २२.

(५) कौटिल्य—पुत्रीयं वा कर्म राजा साधयतीति अपदेशेन... प्रकृतीना दर्शयेत् । अर्थशास्त्र, ५, ६

कालिदास—बाढमेषु दिवसेषु पार्थिवः कर्म साधयति पुत्रजन्मने ।
रघुवंश, १९, ५२.

### वात्स्यायन व कालिदास

वात्स्यायन—श्वश्रूश्वशुरपरिचर्या तत्पारतन्त्र्यमनुत्तरवादिता ।... भोगेष्वनुत्सेकः । परिजने दाक्षिण्यम् । .. नायकापचारेषु किञ्चित्कलुषिता नात्यर्थं निर्वदेत् । कामसूत्र, पृ २३९–२३६.

कालिदास—शुश्रूषस्व गुरून् कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने
भर्तुर्विप्रकृताऽपि रोषणतया मा स्म प्रतीपं गमः ।
भूयिष्ठं भव दक्षिणा परिजने भोगेष्वनुत्सेकिनी
यान्त्येवं गृहिणीपदं युवतयो वामाः कुलस्याधयः ॥
शाकुन्तल, ४, १७.

वरील उताऱ्यातील कल्पनासाम्य व उक्तिसाम्य श्री. करंदीकरांनी दाखविलेल्या अश्वघोष व कालिदास यांच्या काव्यांतल्या साम्यापेक्षा कमी आश्चर्यकारक आढळणार नाही. अर्थशास्त्र व कामसूत्र यांचे विषय अनुक्रमें राजनीति व स्त्रीपुरुषव्यवहार असल्याने त्या ग्रंथांच्या कर्त्यांनी कालिदासाच्या ग्रंथांतून त्या कल्पना व उक्ति घेतल्या असें कोणी ग्रंथ वाचक सहसा म्हणणार नाही. शिवाय यांपैकी कौटिल्य हा खिस्तपूर्व चौथ्या शतकात होऊन गेला असें 'हिंदुनिंदक' पाश्चात्य विद्वान् म्हणत नसून भारतीय पंडित म्हणतात, तेव्हा हें 'देशी' संशोधकाचें म्हणणें श्री. करंदीकर मान्य करतीलच. वात्स्यायन इ. स. २५० च्या सुमारास होऊन गेला, हेंहि 'देशी' संशोधकांचेंच म्हणणें आहे तेंहि मान्य केल्यास कालिदास गुप्तकाळातील अर्थात् अश्वघोषानंतरचा ठरेल.

### भास व कालिदास

पण, कौटिल्य व वात्स्यायन हे काही झालें तरी कवि नव्हत तेव्हा कालिदासाने व्यास–वाल्मीकि वगळून दुसऱ्या कवींच्या उक्तींची उचलेगिरी केली नाही, या आमच्या विधानाला वरील साम्यस्थळांनी बाध येत नाही, असें श्री. करंदीकर कदाचित् म्हणतील; तेव्हा त्यांना भास व कालिदास यांच्या ग्रंथांतील खालील साम्यस्थळें पाहण्याची विनंती करतो.

भास—कालक्रमेण जगतः परिवर्तमाना चक्रारपंक्तिरिव गच्छति भाग्यपंक्तिः ॥ स्वप्नवासवदत्त, १, ४.

कालिदास—कस्यैकान्तं सुखमुपनतं दुःखमेकान्ततो वा नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ॥ मेघदूत, ११४

भास—विस्रब्धं हरिणाश्चरन्त्यचकिता देशागतप्रत्ययाः ।
स्वप्नवासवदत्त, १, १२.

कालिदास—विश्वासोपगमादभिन्नगतयः शब्दं सहन्ते मृगाः ।
शाकुन्तल, १, १४.

भास—सकाम इदानीमार्ययौगंधरायणो भवतु । स्वप्न १.

कालिदास—काम इदानीं सकामो भवतु येनासत्यसंधे जने सखी पदं कारिता। शाकुन्तल ४.

त्रिवेंद्रम् ग्रंथावलींतील इतर नाटकांच्या भासकर्तृकत्वाविषयी विद्वानांमध्ये ऐकमत्य नसलें तरी 'स्वप्नवासवदत्त' हें भासाचेंच याविषयी आता कोणी संशय घेत नाही. भास आपणापूर्वी पुष्कळ काळ होऊन गेला, असें स्वतः कालिदासानें आपल्या मालविकाग्निमित्रांत म्हटलें आहे, तेव्हा वरील उताऱ्यांतील उसनवारीबद्दल संशय राहूं नये.

आपल्या ग्रंथांतील कल्पनास्वातंत्र्याविषयी स्वतः कालिदासाची साक्ष घेतली तर तो काय सांगेल पहा—

> अथवा कृतवाग्द्वारे वंशेऽस्मिन् पूर्वसूरिभिः।
> मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवास्ति मे गतिः॥ रघु. १, ४.

या श्लोकावरून कालिदासानें आपलें रघुवंश काव्य केवळ वाल्मीकीच्या रामायणावरून रचलें असें दिसत नाही. त्याला इतरहि प्राचीन ग्रंथांचे आधार असावेत. याविषयी विवेचन 'कालिदास' ग्रंथात (पृ. १२६–२७) केलें आहे तें पाहावें.

### *अशा कल्पना कितीशा आहेत?*

पण 'काही झालें तरी कालिदासानें उचलेगिरी केली ती हिंदु-ग्रंथांतून. अश्वघोषानें तशी बौद्ध ग्रंथांतून केली असती तर आम्ही क्षम्य मानली असती. पण त्यानें हिंदुग्रंथांतून उसनवारी केली हें अत्यंत गर्ह्य!' असें कदाचित् श्री. करंदीकर म्हणतील. शिवाय अश्वघोषानें काही केलें असलें तरी '*आमचा हिंदु कालिदास* अश्वघोषासारख्या बौद्ध भिक्षूच्या दाराशीं तिष्ठत होता, ही कल्पना तरी आमच्या विश्वविद्यालयांतील आचार्यांस करवते कशी?' असें श्री. करंदीकर विचारतात! पण बौद्ध झाले तरी भारतीयच ना? प्राचीन काळीं बौद्ध व हिंदु हे अत्यंत भिन्नरशी

व परस्पराचे शत्रु अशी द्विराष्ट्रवादाची कल्पना प्रचलित नव्हती. बुद्धाला 'सर्वश्रेष्ठ हिंदु' असें एका विद्वानाने म्हटलें आहे तें खोटें नाही. त्याने प्रतिपादिलेली अहिंसा जातिभेदोच्छेद इत्यादि तत्त्वें आता बहुजनसमत झाली आहेत प्राचीन काळीं हिंदु राजानी बौद्ध मठास व बौद्ध राजानी ब्राह्मणास अनेक दानें दिलेलीं आढळतात. तेव्हा कालिदासाने अश्वघोषाचीं काव्यें वाचून त्यातील काही कल्पना व उक्ति आपल्या ग्रथात घेतल्या असल्यास आपण 'अब्रह्मण्यम्' म्हणू नये! शिवाय या अशा कल्पना तरी कितीशा आहेत, की त्या निर्विवादपणे उसनवारीच्या ठरतील? त्याशिवाय या दोन कवींच्या काव्यात काही उत्कृष्ट भाग आहे किंवा नाही? असल्यास या तथाकथित 'उचलेगिरी'बद्दल इतकी गळबळ कशाला!

अश्वघोषाच्या काव्यात एकदोन ठिकाणीं रघुवंश व कुमारसभव यातील उपमा व प्रसग—उदाहरणार्थ, श्रीशकराच्या कटाक्षाने स्तभित झालेला इंद्राचा बाहू (रघु., २, ४२) व मदनाच्या बाणामुळे झालेलें त्याच्या चित्ताचें चचलत्व (कुमार., ३, ६७)—उल्लेखिले आहेत, असें श्री. करंदीकरानी दाखविलें आहे व त्यावरून अश्वघोषाला हीं काव्यें अवगत होतीं असें अनुमान केलें आहे. पण या उदाहरणावरून उसनवारीचा आरोप सिद्ध होत नाही. 'बुद्धचरिता'त प्रसगोपात्त इतके विविध प्राचीन कथासदर्भ आले आहेत, की त्यावरून अश्वघोषाला अशा अनेक प्राचीन कथाची माहिती होती (बुद्धचरित, ४, १६–२०; ४, ७२–८०; ९, ६९–७०) याचा प्रत्यय येतो. तेव्हा दोन–चार सदर्भाकरिता त्याला कालिदासाचा ऋणी मानणें योग्य होणार नाही.

### स्वतत्र ऐतिहासिक प्रमाणें पाहिजेत

वास्तविक अश्वघोष व कालिदास यांचें पौर्वापर्यत्व अशा उताऱ्यातील साम्यावरून निश्चितपणें ठरविता येणें अशक्य आहे. त्याकरिता स्वतत्र ऐतिहासिक प्रमाणाची आवश्यकता आहे. अशीं काही प्रमाणें 'कालिदास' ग्रथात दिलीं आहेत. कालिदास गुप्तकालात होऊन गेला

असें सिद्ध करणारा निर्विवाद तत्कालीन पुरावा अद्यापि मिळाला नसला—व तो कधीकाळीं मिळेल काय याची शंका आहे—तरीहि त्या मताला उपोद्बलक असा पुरावा दिवसेंदिवस जास्त उपलब्ध होत आहे. त्यामुळे त्या मताला अधिकारी विद्वानांत मान्यता मिळत आहे. हे सर्व विद्वान् परप्रत्ययनेय बुद्धीचे आहेत असें म्हणणें धाष्टर्याचें आहे. वास्तविक या बाबतींत पुणेरी व इतर विद्वान् असा भेद नसून परंपरावादी व ऐतिहासिक दृष्टीचे असा भेद आहे. उपलब्ध पुराव्याचें ऐतिहासिक दृष्टीने परीक्षण केल्यास त्याचें योग्य महत्त्वमापन होतें. नाहीं तर ज्योतिर्विदाभरण व कथासरित्सागर यांतील भाकडकथा तत्कालीन प्राचीन कोरीव लेखांच्या पुराव्यापेक्षा जास्त विश्वसनीय वाटूं लागतात. तेव्हा या दृष्टीने निर्विकार मनाने या प्रश्नाचा विचार करावा अशी श्री. करंदीकरास विनंती करून हा लांबलेला लेख पुरा करतों.

---

# कालिदास आणि अश्वघोष*

## प्रा. कृ. मो. शेंबवणेकर यांस उत्तर



'प्रसाद' मासिकाच्या गेल्या फेब्रुवारीच्या अंकात प्रा. कृ. मो. शेंबवणेकर यांचा वरील विषयावर लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यात आमच्यावर टीका असल्याने त्याला लागलीच उत्तर देणें जरूर होतें. पण इतर महत्त्वाच्या कामामुळे व आमच्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे तें लांबणीवर पडलें. पण विलंब झाला तरी सत्यान्वेषणाकरिता प्रा. शेंबवणेकरांनी उपस्थित केलेल्या मुद्द्यास उत्तर देणें अवश्य असल्यामुळे तें येथे थोडक्यात देत आहों.

प्रा. शेंबवणेकर म्हणतात की, 'अश्वघोषाचें काव्य किंवा नाटक बौद्ध लोकांपेक्षा इतर लोकांस माहीत असावें असें दिसत नाही. किंबहुना कोणत्याहि ब्राह्मण पंडिताने कोणत्याहि जैन किंवा बौद्ध कवीच्या काव्याचा अभ्यास केल्याचा यत्किंचितहि पुरावा नाही.' याला प्रमाण म्हणून त्यांनी असें म्हटलें आहे की, संस्कृत अलंकारशास्त्रकर्ते व सुभाषितसंग्रहकार यांच्या ग्रंथांत अश्वघोषाचें किंवा त्याच्या ग्रंथाचें नावहि आढळत नाही किंवा त्यांनी त्याच्या ग्रंथातून काहीसुद्धा उदाहरण दिलेलें नाही.' हें प्रमाण त्यांना इतकें 'रामबाण' वाटतें की, 'प्रा. मिराशी जर या अडचणीचा समाधानकारक खुलासा करतील तरच त्यांच्या एतद्विषयक मताला काही किंमत राहील' असें त्यांनी म्हटलें आहे. तेव्हा त्याचा जरा विस्तारपूर्वक विचार करूं.

---

*'प्रसाद', पुणे, जुलै, १९५०, पृ. २५–२८

प्रा. शेंबवणेकरांचें वरील विधान खरें असतें (तें तसें नाही हें आम्ही पुढे दाखविणार आहों) तरी त्यापासून अश्वघोषाचे ग्रथ बौद्ध लोकांपेक्षा इतरांस माहीत नव्हते हें अनुमान काढतां आलें नसतें हें प्रमाण अभावात्मक (argumentum ex silentio) आहे. वरील ग्रथकारांनी अश्वघोषाचा किंवा त्याच्या ग्रंथाचा निर्देश केलाच पाहिजे होता असें दाखविल्याशिवाय या अभावात्मक प्रमाणावरून कोणतेंहि निश्चित अनुमान काढणें योग्य होणार नाही कालिदासाचा नामनिर्देश इ. स.च्या सातव्या शतकापूर्वी आढळत नाही तेव्हा तो त्यापूर्वी होऊन गेला नव्हता असें म्हणण्याइतकेंच वरील विधान हास्यास्पद होईल

आम्हीं आपल्या लेखात दाखविल्याप्रमाणे हिंदु व बौद्ध ग्रंथकार हे परस्परद्वेषे नसून एकमेकांचे ग्रथ अभ्यासीत असत व त्यावर क्वचित् टीकाहि लिहीत सुप्रसिद्ध साहित्यशास्त्रकार आनंदवर्धन याने बौद्ध धर्मकीर्तीच्या प्रमाणविनिश्चय नामक ग्रंथावरील धर्मोत्तमा टीकेवर विवृत्ति लिहिली होती, अमरकोशकार बौद्ध होता तरी त्याच्या ग्रंथावर अनेक हिंदु टीकाकारांनी टीका लिहिल्या आहेत व्याकरणशास्त्र, अलंकारशास्त्र, इत्यादि इतर शास्त्रांतील ग्रंथावरूनहि हीच गोष्ट दिसून येते. अशी परिस्थिति असता बौद्ध काव्यनाटकादिकांवर मात्र हिंदु कवि, आलंकारिक व सुभाषितकार यांनी कडकडीत बहिष्कार घातला असेल हें संभवनीय नाही असेंच कोणाहि म्हणेल

पण या बाबतीत केवळ अनुमानावर अवलंबून राहण्याचें कारण नाही कारण अश्वघोषाच्या ग्रंथांतील उतारे उत्तरकालीन ग्रंथकाराच्या ग्रंथात थोडयाबहुत प्रमाणात आढळतात त्यावरून प्रा शेंबवणेकरांचें विधान निखालस खोटें आहे हें दिसून येईल

'कवींद्रवचनसमुच्चय' या सध्या उपलब्ध असलेल्यापैकी अत्यंत प्राचीन श्लोकसंग्रहात खालील श्लोक **अश्वघोषाच्या नावावर** दिला आहे —

आबाहूद्गतमण्डलाग्ररुचय सनद्धवक्ष स्थला
सोष्माणो व्रणिनो विपक्षहृदयप्रोन्माथिन कर्कशा ।

उत्सृष्टाम्बरदृष्टविग्रहभरा यस्य स्मरप्रेरिता
मारा वारवधूस्तनाश्च न दधुः क्षोभं स बोऽव्याज्जिनः ॥

'कवीन्द्रवचनसमुच्चय'कार हा स्वतः बौद्ध असल्याने त्याने आपल्या ग्रंथारंभी बुद्धवर्णनपर श्लोक दिले आहेत, त्यांत हा प्रथम दिला असून तो अश्वघोषाने रचला असें स्पष्ट म्हटलें आहे. या श्लोकात बुद्धाला मोह पाडण्याकरिता माराने पाठविलेल्या सैनिकांचें व वेश्यास्तनांचें श्लेषमय शब्दात वर्णन केलें आहे. हा श्लोक अश्वघोषाच्या सध्या उपलब्ध असलेल्या काव्यात सापडत नसला तरी त्याने रचलेल्या इतर काव्यातून किंवा सुभाषितातून तो घेतला असणें असंभवनीय नाही.

अश्वघोषाचा हा बुद्धस्तुतिपर श्लोक हिंदु आलंकारिकांच्या ग्रंथात व सुभाषितसंग्रहात घेतलेला आढळतो. उदाहरणार्थ, इ. स. च्या आठव्या शतकात होऊन गेलेल्या वामनाच्या 'काव्यालंकारसूत्रवृत्ती'त (अधि. ४, अ ३, सू ७) व त्यानंतरच्या वल्लभदेवाच्या 'सुभाषितावली'त (श्लो ७४) तो किंचित् पाठभेदाने (उदाहरणार्थ, शेवटच्या पादातील 'मारा' बद्दल 'योधा' घालून) दिला आहे हे दोन्ही ग्रंथकार हिंदु किंवा, शेंबवणेकर म्हणतात त्याप्रमाणे, ब्राह्मणमतानुयायी होते, हें त्यांच्या ग्रंथारंभींच्या श्लोकावरून स्पष्ट दिसतें वल्लभदेवाने तर हा श्लोक 'भदन्त अश्वघोषाचा' आहे असें स्पष्ट म्हटलें आहे.

याशिवाय आणखी पाच श्लोक–कदर्थितस्यापि हि धैर्यवृत्ते इ. (५२८), जयन्ति जितमत्सरा॰ इ. (१९८), जातश्च नाम न विनङ्क्ष्यति इ. (५२९), नैवाकृतिः फलति इ. (३१००), व्यायच्छन्नपि कश्चिद् (३१४२) –'भदन्त अश्वघोषा'च्या नावावर वल्लभदेवाच्या सुभाषितावलींत दिले आहेत त्यावरून हिंदु सुभाषितकारानी बौद्ध कवींच्या काव्यांवर बहिष्कार घातला होता हें प्रा. शेंबवणेकरांचें म्हणणें लटकें पडतें.

पण किती झालें तरी वरील श्लोक अश्वघोषाच्या उपलब्ध ग्रंथात सापडत नसल्यामुळे अश्वघोषाचे ग्रंथ बौद्धाखेरीज इतर लोकात प्रचलित नव्हते या आमच्या म्हणण्यास बाध येत नाही, असें प्रा. शेंबवणेकर

कदाचित् म्हणतील, म्हणून अश्वघोषाच्या 'बुद्धचरित' व 'सौन्दरनन्द' या उपलब्ध काव्यांतील उतारे हिंदु ग्रंथकाराच्या ग्रंथांत घेतलेले आता दाखवितों—

बुद्धचरितांत (सर्ग ८, श्लो. २५) खालील श्लोक सिद्धार्थ अरण्यात निघून गेल्यावर अन्तःपुरांतील स्त्रियांच्या शोकवर्णनांत आला आहे.—

> हतत्विषोऽन्याः शिथिलांसबाहव-
> स्त्रियो विषादेन विचेतना इव ।
> न चु शुर्नाश्रु जहुर्न शश्वसु-
> र्न चेलुरासुर्लिखिता इव स्थिताः ॥

हा श्लोक राजशेखराच्या 'काव्यमीमांसें'त ( गायकवाड संस्कृत सीरीज, पृ १८ ) 'आख्यातकवी'च्या काव्याचें उदाहरण म्हणून थोड्या पाठभेदानें आला आहे. राजशेखर हा ब्राह्मण कवि इ. स. च्या दहाव्या शतकांत होऊन गेला. त्या काळापर्यंत तरी अश्वघोषाचे ग्रंथ केवळ बौद्ध लोकांच्याच नव्हे तर ब्राह्मण पंडितांच्याही वाचनांत येत होते हें यावरून स्पष्ट होईल.

पण वरील श्लोक राजशेखराच्या अलंकारग्रंथांत आला असला तरी तो अश्वघोषाच्या 'बुद्धचरिता'तूनच घेतला असें त्यांत म्हटलें नाहीं. तेव्हां राजशेखराला तो कोणा हिंदु कवीनें रचला असावा असें वाटून त्यानें त्याचा अंतर्भाव आपल्या ग्रंथांत केला असावा, असें प्रा. शेवणेकर कदाचित् म्हणतील; तेव्हां अश्वघोषाच्या ग्रंथांतून नामनिर्देशपूर्वक घेतलेले कांहीं उतारे दाखवितों—

अमरकोशावर वन्द्यघटीय-सर्वानन्द याची 'टीकासर्वस्व' नावाची टीका प्रकाशित झाली आहे. तींत—

> शाकवृक्षप्रतिच्छन्नं वासं यस्माच्च चक्रिरे ।
> तस्मादिक्ष्वाकुवंश्यास्ते भुवि शाक्या इति स्मृताः ॥

हा श्लोक **सौन्दरनन्द** काव्यांतील म्हणून दिला आहे व तो त्या काव्याच्या प्रकाशित आवृत्तींत (सर्ग १, श्लो. २४) आढळतो. याशिवाय त्या टीकेंत बुद्धचरितांतून नामनिर्देशासह दोन श्लोकार्ध घेतले आहेत. अमरकोशांत (२, २, ५) पुलाक याचा 'संक्षेप' असा एक अर्थ दिला

आहे. त्याचें उदाहरण म्हणून "तथा च बुद्धचरिते 'निबोध किञ्चित्तु पुलाकमात्रं वाक्यं मुनेर्वाक्यविदां वरस्य' इति" असें दिलें आहे. तसेंच अमरकोश ( १, १, ) यांत दिलेल्या दिवोकस् या शब्दाची व्युत्पत्ति देताना द्यौरोकः स्थानं येषां ते दिवोकसः अकारान्तोऽपि दिवशब्दोऽस्ति तदा च दिवौकस इत्यपि स्यात्। तथा हि बुद्धचरिते 'न शोभते तेन हि नो विना पुरं मरुत्वता वृत्रवधे यथा दिवम्।' असा श्लोकार्ध दिला आहे व तो बुद्धचरितांत (८, १३) आढळतो. हाच श्लोकार्ध मल्लिनाथानेहि रघुवंश (सर्ग १०, श्लो.७) या श्लोकावरच्या टीकेंत बुद्धचरितांतील म्हणून दिला आहे. बुद्धचरिताचा बौद्धेतर लोकांत प्रचार नसता किंवा त्यातील शब्दप्रयोगाला महत्त्व नसतें तर हे श्लोकार्ध सर्वानन्द व मल्लिनाथ या हिन्दु टीकाकारांनी आपापल्या टीकांत उद्धृत केले नसते. तेव्हा अश्वघोषाच्या वरील ग्रंथाचा निदान सर्वानन्दाच्या काळापर्यंत ( इ. स. चें बारावें शतक ) तरी चांगलाच सूक्ष्म अभ्यास होत असे, हें स्पष्ट होईल.

'कालिदासानें व्यास–वाल्मीकि वगळून इतर कोणाचेंही अनुकरण केलें नाही' हें श्री. करंदीकरांचें विधान कसें असत्य आहे हें दाखविण्याकरिता आम्ही कालिदासाच्या ग्रंथांतील काही उताऱ्याचें कौटिल्याचें 'अर्थशास्त्र', वात्स्यायनाचें 'कामसूत्र' व भासाचें 'स्वप्नवासवदत्त' यांतील समानार्थक उताऱ्यांशी कसें शब्दसाम्य व अर्थसाम्य आहे हें सविस्तर दाखविलें होतें ('सह्याद्रि', मार्च १९४९, पृ.१८४ पहा). त्यावर प्रा. शेवडेकरांचें उत्तर मासलेवाईक आहे, व तें त्यांच्या सत्यान्वेषणप्रवृत्तीवर उत्कृष्ट प्रकाश पाडतें. अर्थशास्त्रांतील उताऱ्यांत दिसणाऱ्या विलक्षण शब्दार्थसाम्याविषयी ते म्हणतात, 'अहो, तें व्युत्पत्तिप्रदर्शन आहे!' पण व्युत्पत्तिप्रदर्शन असलें तरी तें त्याच शब्दांत असलें पाहिजे असा कोठे नियम आहे? अशा ठिकाणीं पूर्वीच्या ग्रंथांतील शब्दरचना अभावितपणें कालिदासाच्या ग्रंथांत आली असेल, तर त्यामध्ये अश्वघोषाच्या काव्यांतूनही ती तशी क्वचित् ठिकाणीं आली असल्यास तिजबद्दल इतकी खळखळ कशाला!

वात्स्यायनाच्या कामसूत्रांतहि वरील प्रकारचेंच विलक्षण शब्दार्थसाम्य आढळतें. त्याविषयीं प्रा. शेवडेकर म्हणतात, 'वात्स्यायनानें

पूर्वीच्या ग्रंथकारांचीं वचनें व परिभाषा जशींच्या तशींच घेतली असावी-पण वात्स्यायनाचीं उल्लिखित वचनें वरीं घेतलीं होतीं हें सिद्ध करण्याची जबाबदारी वॅवरणेकरावर असूनही ते अशी पळवाट काढून ती टाळत आहेत हें सूक्ष्मदृष्टि वाचकांच्या लक्षांत आल्याशिवाय राहिलें नसेल

भासाच्या स्वप्नवासवदत्तातीलहि अनेक विलक्षण शब्दसाम्य व अर्थसाम्य असलेले कांहीं उतारे आम्ही दाखविले होते. भास आपणापूर्वी होऊन गेला हें स्वतः कालिदासानेंच म्हटलें असल्याने या बाबतींत पौर्वापर्याचाहि वाद नव्हता. तेव्हा या उताऱ्यात कालिदासाने केलेलें अनुकरण मान्य करणें कठीण जाऊ नये. पण तसें केलें तर वॅवरणेकरांचें मत कसें खरें ठरेल ! म्हणून ते म्हणतात, 'सध्याचें स्वप्नवासवदत्त हें भासाच्या मूळ नाटकाची संक्षिप्त किंवा छाटाछाट केलेली आवृत्ति असावी !' छाटाछाट केलेल्या आवृत्तींत मूळच्या आवृत्तींतील काही भाग गाळला जातो, जास्त भाग जोडला जात नाही, ही साधी गोष्टहि प्रा. वॅवरणेकराच्या लक्षात आलेली दिसत नाही.

प्रा. वॅवरणेकरानी अनेक ठिकाणीं 'लघुकवि महाकवींचें अनुकरण करतात. अश्वघोष हा लघुकवि म्हणून त्याने कालिदासाचें अनुकरण केलें असावें' असें म्हटलें आहे. त्यांना डॉ. सुशीलकुमार दे यांचें पुढील मत नजर करतों—'To argue that Ashvaghosha is later than Kalidasa is to presume without sufficient reason a retrogressive phase in literaray evolution'. (History of Sanskrit Literature, p. 124.) (कालिदासानतर अश्वघोष होऊन गेला असें म्हणण्यास वाङ्मयीन उत्क्रांतींत पुच्छप्रगति झाली असें पुरेसें कारण नसताहि मानावें लागेल )

येथवर प्रा वॅवरणेकर यांच्या लेखनातील प्रमुख मुद्यास उत्तर दिलें. त्यांच्या लेखात इतरही अनेक विवाद्य विधानें आहेत पण त्यांचा प्रस्तुत विषयाशी साक्षात् संबंध नसल्यानें त्यांचा विचार न करता हा लांबलेला लेख येथेच पुरा करतों.

---

# 'मेघदूतां'तील रामगिरि*

कविकुलगुरु कालिदासाने आपल्या मेघदूत नामक सुप्रसिद्ध खंडकाव्यात शापित यक्ष अलकेतून निर्वासित झाल्यावर रामगिरीच्या आश्रमात येऊन राहिला असें वर्णिलें आहे. मेघदूताच्या आरंभीच्या काही श्लोकात तसेंच अलकेला जावयाच्या मार्गाच्या वर्णनात जी काही थोडीबहुत माहिती मिळते, तिच्यावरून या रामगिरीचें स्थान निश्चित करणें शक्य आहे. तथापि या बाबतींत पद्धतशीर प्रयत्न कोणी केलेला आमच्या पाहण्यांत आला नाही. या वर्षी विक्रमसंवताचीं दोन हजार वर्षे पूर्ण होत असल्याने हिंदुस्थानात ठिकठिकाणीं विक्रमद्विसहस्राब्दीचे उत्सव होणार आहेत कालिदासाचें नांव विक्रमादित्याशी संलग्न असल्याने या प्रसंगी त्या काव्यश्रेष्ठाच्या ग्रंथांचें पुनर्मुद्रण, चर्चा वगैरे होत आहेत. या निमित्ताने रामगिरीच्या स्थलनिश्चयाची चर्चा प्रस्तुत लेखात करण्याचें योजिलें आहे.

शाकुंतल, विक्रमोर्वशीय, रघुवंश वगैरे आपल्या इतर ग्रंथातील कथानकें कालिदासाने प्राचीन वाङ्मयातून घेतलीं असल्यामुळे त्यातील स्थळांचा निश्चय करण्यास त्या त्या संस्कृत ग्रंथांची मदत होते. पण मेघदूताचें कथानक पडलें सर्वस्वीं काल्पनिक! तेव्हा येथे आपणास प्राचीन संस्कृत ग्रंथांचें साह्य होणें शक्य नाही. रामगिरीचा स्थाननिश्चय करण्यास मुख्यत्वेंकरून मेघदूतातील वर्णनावरच आपणास विसंबून राहिलें पाहिजे. तेव्हा मेघदूत काव्यावरून आपणास रामगिरीविषयी काय माहिती मिळते तें पाहू

## मेघदूतांतील माहिती

रामगिरी हा पर्वत फार पवित्र मानला जात असे वनवासात असता तेथील जलाशयात सीतादेवीने स्नान केल्यामुळे त्याचें जल पावन

---

* 'सह्याद्रि', पुणें, एप्रिल, १९४४, पृ. १९-२४.

झालें होतें (श्लो. १). त्या पर्वताच्या मेखलाभागावर काही ठिकाणीं सर्व जनांना वंद्य अशीं श्रीरामचंद्राचीं पावलें उमटलीं होतीं (श्लो १२). अशा त्या पुण्यक्षेत्री ऋषींचे अनेक आश्रम होते. रामगिरि पर्वत बराच उंच असल्यामुळे वर्षा ऋतूंत त्यावर मेघ आले असता वप्रक्रीडा (टक्कर देणें) करण्याकरिता वाकलेल्या हत्तीसारखे ते दिसत (श्लो २). त्यावर घनदाट छायेचे अनेक वृक्ष होते तेथे सुंदर निचुल नामक स्थलवेतस होते (श्लो. १४). अशा त्या रामगिरीवर आपले शापाचे दिवस कंठीत असता यक्षाला आषाढाच्या प्रथम दिवशीं एक मेघ दिसला तेव्हा त्याला प्रियेचा विरह दु:सह झाला आपल्या प्रियेचीहि तशीच अवस्था झाली असेल असें वाटून, तिच्या मनाला धीर देण्याकरिता त्या मेघालाच दूत म्हणून अलकेला आपल्या प्रियेकडे पाठविण्याचें त्याने ठरविलें. त्याने त्याला ताजीं कुटज पुष्पें अर्पण केलीं (श्लो. ४); व त्याची स्तुति करून अलकेचा मार्ग सांगण्यास सुरुवात केली. तो म्हणाला, "मेघा! येथून उत्तरेला जाताना प्रथम तुला जेथील शेतें नुकतीच नांगरल्यामुळे सुगंधित झालीं आहेत असें माल नामक पठार लागेल. तें ओलांडल्यावर तू किंचित् पश्चिमेला वळून पुनः उत्तरेचा मार्ग आक्रमावा (श्लो १६). नंतर प्रवासाने खिन्न झालेल्या तुला आम्रकूट नामक सानुमान् म्हणजे पर्वत आपल्या शिखरावर धारण करील (श्लो. १७) त्या पर्वतावर पक्व फलांनी शोभणारीं अशीं रानआंब्याचीं झाडें असल्याने त्यावर कृष्णवर्ण असा तू आला असता भूमीच्या स्तनासारखा दिसशील. तेथे जलवर्षाव केल्यावर तुला आपला मार्ग जलद आक्रमता येईल पुढे विंध्य पर्वताच्या पायथ्याशीं खडकाळ प्रदेशातून वाहणारी नर्मदा हत्तीच्या अंगावर काढलेल्या वेलबुट्टीसारखी दिसेल (श्लो. १९). नंतर तुला दशार्ण देश लागेल त्या देशाच्या सर्वत्र प्रसिद्ध असलेल्या विदिशा नामक राजधानीला पोचल्यावर तुला तेथील वेत्रवती नदीचें मधुर जल प्राशन करता येईल (श्लो. २४). त्या ठिकाणीं नीचैर्गिरि नामक टेकडीवर विश्रांतीकरिता तू वसावें तेथील गुहांत वेश्यांनी उपयोग केलेल्या सुगंधि द्रव्याच्या परिमलावरून तेथील नागर लोकांचें उद्दाम यौवन उत्कृष्ट रीतीने व्यक्त होत असतें (श्लो. २५)" यापुढचा मार्ग

आपल्या प्रस्तुत विवेचनाला उपयुक्त नसल्यामुळे तो देण्याची आवश्यकता नाही.

रामगिरीपासून विदिशेपर्यंत मेघमार्ग वर वर्णिला आहे. त्याचें उत्तर टोक जी विदिशा नगरी तिचें स्थान निश्चित आहे. ग्वाल्हेर संस्थानांतील भेलसा नामक गावाजवळ बेसनगर नांवाचें लहानसें खेडें सध्या दिसतें. ती प्राचीन विदिशा नगरी. हिच्या जवळच वेत्रवती किंवा बेटवा नदी वाहत आहे. उत्तरेस सुमारें दोन मैलांवर एक उदयगिरि नावाची लहानशी टेकडी आहे तो प्राचीन नीचैर्गिरि. या टेकडीवर प्राचीन गुहा असून, त्यात गुप्तकालीन शिल्पें व कोरीव लेख अद्यापि विद्यमान आहेत. तेव्हा विदिशा नगरीच्या स्थानाबद्दल संदेह नाही. हिच्या दक्षिणेस कोठे तरी रामगिरि असला पाहिजे. रामगिरी-पासून विदिशेच्या मार्गावर प्रथम माल नामक पठार, नंतर आम्रकूट पर्वत व नर्मदा नदी लागते असें मेघदूतातील वर्णनावरून स्पष्ट दिसतें. या भौगोलिक उल्लेखावरून रामगिरीचें स्थान निश्चित करावयाचें आहे. नंतर मेघदूतातील वर्णन त्याला कितपत लागू पडतें हेंहि पाहिलें पाहिजे.

## प्राचीन टीकाकारांचें म्हणणें

प्रथम या बाबतींत आपल्या प्राचीन टीकाकारांचें काय म्हणणें आहे तें पाहू. मेघदूताचा सर्वांत प्राचीन टीकाकार वल्लभदेव हा दहाव्या शतकाच्या आरंभीं होऊन गेला. यानें मेघदूताच्या पहिल्या श्लोकावरच्या आपल्या टीकेंत म्हटलें आहे की, 'रामगिरिरत्र चित्रकूटः। न तु ऋष्यमूकः तत्र सीताया वासाभावात्।' म्हणजे रामगिरि हा चित्रकूट होय. तो ऋष्यमूक असणें शक्य नाही. कारण त्या ठिकाणीं सीतेचा वास झाला नव्हता. वल्लभदेवाचा जवळ जवळ समकालीन असलेल्या स्थिरदेव नामक टीकाकारानें 'रामगिरिर्दण्डकान्तः प्रसिद्धः।' (रामगिरि हा दण्डकारण्यातील प्रसिद्ध पर्वत आहे ) असें म्हणून त्याचें स्थान निश्चितपणें सांगितलें नाही. त्यानंतरच्या दक्षिणावर्तनाथानें निचुल, दिङ्नाग याच्याविषयी दंतकथा विस्तृतपणें दिल्या असल्या, तरी राम-

गिरीच्या स्थानाविषयी मूग गिळले आहेत. दक्षिणावर्तनाथानंतरचा सुप्रसिद्ध टीकाकार मल्लिनाथ याने रामगिरि म्हणजे चित्रकूट या वल्लभदेवाच्या मताचीच री ओढली आहे. यानंतरच्या विद्युल्लतादि टीकाकारांनी प्रायः मल्लिनाथाच्या विधानाचाच अनुवाद केला आहे. तेव्हा बहुधा सर्व संस्कृत टीकाकारांना रामगिरि म्हणजे चित्रकूट हें मत मान्य होतें असें दिसतें. या टीकाकारांच्या ठिकाणीं चोकस बुद्धि नसल्याने त्यांनी या प्रश्नाचा खोल विचार केला नसावा. रामगिरि हा चित्रकूट असावा असें त्यांना वाटणेंहि साहजिक आहे. कारण संबंध रामायणात रामगिरीचा कोठेच उल्लेख आला नाही. मेघदूतातील वर्णनावरून या गिरीवर श्रीरामचंद्र सीतेसह काही काळ राहत होते, अशी कालिदासकाळीं परंपरागत समजूत होती असें स्पष्ट दिसतें. रामायणात मुख्यतः दोनच पर्वतावर श्रीरामचंद्राचें काही काळ वास्तव्य होतें असें वर्णिलें आहे. भरद्वाजाश्रमातून निघाल्यावर रामचंद्र चित्रकूट पर्वतावर सीता व लक्ष्मण यांच्याबरोबर काही काळ राहिले असें अरण्यकांड, सर्ग ५६ मध्ये म्हटलें आहे. पुढे दंडकारण्यातून रावणाने सीताहरण केल्यावर तिच्या शोधार्थ रामचंद्र ऋष्यमूक पर्वतावर आले. तेथे त्यांचें हनुमान् व सुग्रीव यांच्याशीं सख्य जमून त्या ठिकाणीं त्यांनी काही काळ वास केला, असें किष्किंधाकांडात वाल्मीकीने वर्णिलें आहे. या वेळीं सीतादेवी जवळ नसल्याने 'जनकतनयास्नानपुण्योदकेषु' इत्यादि मेघदूतातील वर्णन ऋष्यमूक पर्वतास जमत नाही, हें उघड आहे. तेव्हा चित्रकूट हाच रामगिरि असें टीकाकारास वाटलें तर त्यांत आश्चर्य नाही. तथापि हें मत बरोबर असणें शक्य नाही, हें थोड्या विचाराअंती स्पष्ट होईल. भरद्वाजाश्रम प्रयागला होता. तेथे आल्यावर रामचंद्रांनी भरद्वाज ऋषीला प्रार्थना केली की, 'भगवन्, आम्हाला भेटूं इच्छिणारे लोक येथे येऊं लागतील. म्हणून या आश्रमात राहणें मला प्रशस्त वाटत नाही. तेव्हा एकान्त असें एखादें आश्रमस्थान आम्हाला सांगा.' त्यावर भरद्वाज ऋषि म्हणाले, 'रामा, येथून दहा कोसांवर महर्षींनी सेविलेला चित्रकूट नामक पर्वत आहे. तें एकान्त स्थान असल्यामुळे तेथे तूं आपला वनवासाचा काळ

घालवावा.' त्यानंतर त्या संगमापासून निघून यमुना नदीच्या काठाने रामचंद्र सीता व लक्ष्मण यांसह काही अंतर गेले व नंतर ती नदीपार करून ते पुढे चित्रकूट पर्वताला पोचले, असें रामायणांत वर्णिलें आहे. या वर्णनावरून चित्रकूट हा यमुनेपासून फार दूर नसावा, असें स्पष्ट दिसतें. हा चित्रकूट म्हणजे कामताजवळचा चित्रकूट होय* असें आता विद्वानांनी ठरविलें आहे. चित्रकूट व कालंजर हे प्राचीन काळीं दुर्भेद्य असे किल्ले गणले जात असत व ते आपल्या ताब्यात ठेवण्याविषयी बलाढ्य राजांमध्ये अहमहमिका लागून राहत असे. दक्षिणेच्या राष्ट्रकूट राजानीहि उत्तर हिंदुस्थानात आपलें वर्चस्व राहावें म्हणून हे कोट आपल्या ताब्यात ठेवले होते, असें कोरीव लेखावरून दिसतें.† कालंजर हा बांदा जिल्ह्यातील किल्ला सुप्रसिद्ध आहे. चित्रकूट त्याच्या उत्तरेस थोड्याच अंतरावर आहे. पुण्यस्थान म्हणून अद्यापि याची प्रसिद्धि आहे. येथे राम, सीता व लक्ष्मण यांच्या पादुकाहि दाखवतात. हें स्थान प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे, यांत संशय नाही. तथापि हा चित्रकूट रामगिरि असणें शक्य नाही; कारण रामगिरीहून उत्तरेस जातांना लागणारी नर्मदा, विदिशा, उज्जयिनी इत्यादि नद्या व नगरें चित्रकूटाच्या दक्षिणेस आहेत, उत्तरेस नाहीत. तेव्हां रामगिरि म्हणजे चित्रकूट हें मत बरोबर नाही.

---

* हा चित्रकूट पर्वत प्रयागापासून सुमारें ६५ मैलांवर आहे. त्यामुळे रामायणात वर्णिलेला पर्वत हाच काय अशी शंका येते, तिचें निराकरण दोन प्रकारांनी करता येतें. रामायणातील अंतर अदमासानें दिलें असावें किंवा पार्जिटरसाहेब म्हणतात त्याप्रमाणें चित्रकूट ही एखादी विशिष्ट टेकडी नसून दोन नद्यांपासून प्रयागाच्या पश्चिमेस सुमारें २० मैलांपर्यंत पसरणारी पर्वतराजि असेल. यांपैकी पहिलें निराकरण जास्त संभवनीय दिसतें.

† राष्ट्रकूट सम्राट् तृतीय कृष्ण यांच्याविषयी देवळीच्या ताम्रपटात आलेला खालील श्लोक पाहा 'यस्य परपेक्षितालिखदक्षिणदिग्दुर्गविजयमाकर्ण्य । गलिता गुर्जरहृदयात्कालंजरचित्रकूटाशा ॥' एपिग्राफिया इंडिका, पु. ५, पृ. १९४

## आधुनिक विद्वानांचीं मतें

यानंतर आपण आधुनिक विद्वानांच्या मतांकडे वळूं. एकशेंतीस वर्षांपूर्वी सन १८१३ सालीं होरेस हेमन विल्सन या सुप्रसिद्ध आंग्ल विद्वानाने मेघदूताची पहिली आवृत्ति इंग्रजी भाषांतरासह प्रसिद्ध केली. तिला जोडलेल्या टिप्पणींत "रामगिरि म्हणजे नागपूरच्या उत्तरेस कांहीं अंतरावर असलेलें रामटेक असावें. कारण तेथे रामचंद्राचीं अनेक देवालयें आहेत व यात्रेकरिता मधून मधून अनेक लोक येतात" असें त्याने म्हटलें आहे. हेंच मत पुढे मेघदूताच्या अनेक टिप्पणीकारांनी स्वीकारलें होतें. त्यांमध्ये सुप्रसिद्ध पुरातत्त्वज्ञ कै. प्रो. काशिनाथ बापुजी पाठक हेहि होते. त्यांनी मेघदूताच्या आपल्या प्रथमावृत्तींत (सन १८९४) याच मताचा अनुवाद केला आहे. पण पुढे मध्यप्रांताच्या सरगुजा संस्थानांतील रामगढ टेकडीवरील सीताबेंगा व जोगीमारा या गुहांतील प्राचीन लेखाकडे विद्वानांचें लक्ष गेलें. हे लेख खिस्तपूर्व दुसऱ्या तिसऱ्या शतकातले आहेत. त्यावरून सरगुजा संस्थानांतील रामगढ हें स्थान प्राचीन काळीं प्रसिद्ध होतें यांत संशय नाही. येथे राम, लक्ष्मण व सीता यांच्या नांवाने गुहा आहेत. त्यांमध्ये भग्नावस्थेंत असलेल्या काही मूर्तीहि दिसतात. पण त्या फार प्राचीन नसाव्यात. एका ठिकाणीं भिंतीवर दोन पावलांच्या आकृति दिसतात. या रामाच्या पादुका आहेत, अशी तेथील लोकांची समजूत आहे. या स्थानाचें वर्णन मॉडर्न् रिव्ह्यु (सन १९१५, पृ. ३७६–३८७) मध्ये प्रसिद्ध झालें. तें वाचून रामगढ हाच रामगिरि असावा, असें प्रो. पाठक ह्यांचें मत झालें व तें त्यांनी मेघदूताच्या आपल्या द्वितीयावृत्तींत (सन १९१६) नमूद केलें आहे. या मताचा उल्लेख त्यानंतर प्रकाशित झालेल्या काही मेघदूताच्या आवृत्तींत आढळतो. तेव्हा त्याचें आपण परीक्षण करूं.

'सरगुजा संस्थानांतील रामगढ हाच रामगिरि' या मतावरील मुख्य आक्षेप हा की, हें स्थान मेघदूतांतील वर्णनाप्रमाणे आम्रकूट (अमरकंटक) व नर्मदा नदी यांच्या दक्षिणेस नसून ईशान्येस आहे. येथून अलकेस जातांना आम्रकूट, नर्मदा, विदिशा इत्यादि ठिकाणें

मार्गावर लागणार नाहीत. त्या ठिकाणी मेघास न्यावयाचें असल्यास 'किंचित्पश्चाद्व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण' (श्लो. १६) असें न म्हणतां 'तू प्रथम उत्तरेस न जातां नैऋत्येस जा' असें यक्षाला मेघास सांगावें लागलें असतें. शिवाय हें ठिकाण अत्यंत विकट ठिकाणीं निर्जन अशा प्रदेशात आहे. तेथे हत्तीवरून जाताना आपणास किती श्रम पडले याचें सविस्तर वर्णन प्रसिद्ध बंगाली चित्रकार श्रीयुत असित हलदार यानी मॉडर्न रिव्ह्यूच्या वरील अंकात केलें आहे. अशा ठिकाणीं यक्षाला राहावयाला लावण्यांत कालिदासाचा कोणता हेतु होता, हेंहि ध्यानात येत नाही. तेव्हा रामगड हा रामगिरि असणें शक्य दिसत नाही.

### सर्वांत सयुक्तिक मत

आता राहिलेलें तिसरें मत, रामगिरि हें नागपूरच्या उत्तरेस २८ मैलांवर असलेलें प्रसिद्ध क्षेत्र रामटेक होय, याचा विचार करूं. हें मत सर्वांत सयुक्तिक दिसतें. रामटेकाहून अलकेला जाण्याचा मार्ग कोणी सांगूं लागेल, तर तो त्याला मेघदूतातल्याप्रमाणेच सांगावा लागेल. येथून उत्तरेस जाताना प्रथम माल नामक पठार लागतें, असें मेघदूतांत म्हटलें आहे. रामटेकच्या जवळच सातपुड्याचें पठार सुरू होतें. या पठाराला पूर्वी माल देश म्हणत असावें; किंबहुना या बाबतींत अनुमान करण्याचीहि जरूरी नाही, कारण उत्तर चालुक्याच्या द्वितीय थाञ्जिग नामक मांडलिकानें माल देश जिंकून डाहलाधिपतीचा म्हणजे जबलपूरजवळच्या त्रिपुरीच्या हैहयाचा पराभव केला, असा एका कोरीव लेखात* उल्लेख आहे तेव्हा या पठाराला माल हें नाव होतें हें उघड आहे यानंतर आम्रकूटाचें वर्णन मेघदूतात आलें आहे. हा आम्रकूट म्हणजे अमरकटक असें काही लोक मानतात, पण तें बरोबर दिसत

* एपिग्राफिया इंडिका, पु १९, पृ २२७ पहा विलसनसाहेबानी आम्रकूट हा अमरकटक पर्वत असावा असें वाटत असल्यानें त्यानी 'माल' हे छत्तीसगडातील रतनपूरच्या उत्तरेस असलेला मालडा असावे असे म्हटले आहे पण तें बरोबर दिसत नाही

नाही. कारण अमरकंटक पर्वत ईशान्येस दूरवर राहतो; शिवाय अमरकंटकाचें प्राचीन नांव आम्रकूट नसून मेकल असें होतें. नर्मदा नदीचा उगम अमरकंटकला होतो व तिला मेकलसुता म्हणतात हें प्रसिद्ध आहे. तेव्हा अमरकंटक प्राचीन आम्रकूट असणें शक्य नाही. आमचे एक स्नेही डॉ. कठाळे हे आम्रकूट म्हणजे छिंदवाडा जिल्ह्यातील अमरवाडा गाव असावें असें सुचवितात. अमरवाडा हें त्याच नावाच्या तहसिलीचें मुख्य ठिकाण असून, रामटेकच्या उत्तरेस नागपूर व नरसिंगपूर यांना जोडणाऱ्या मुख्य रस्त्यावर आहे. आम्र याचा अपभ्रंश अमर होणेंहि शक्य आहे; तथापि अमरवाडा हें एक गाव आहे, पर्वत (सानुमान्) नाही. प्राचीन आम्रवाटकाचें तें अपभ्रष्ट रूप असावें. याच्या उत्तरेस सात–आठ मैलांवर सातपुड्याची रांग लागते. तिला आम्रकूट असें नाव प्राचीन काळीं असावें, असें अनुमान केल्यास बहुधा चूक होणार नाही. कै. डॉ. हिरालाल यांनी आपल्या एका लेखांत सातपुड्याच्या शिखरांना प्राचीन काळीं 'कूट' शब्दांत नावें असत, असें दाखविलें आहे. उदाहरणार्थ, शालकूट म्हणजे बालाघाट जिल्ह्यातील साले टेकडी व मधुकूट म्हणजे छिंदवाडा जिल्ह्यातील मोहतूर. तेव्हा आम्रकूट हेंहि अमरवाड्याजवळचें सातपुड्याचें त्या काळीं प्रसिद्ध असलेलें एक शिखर असावें,असें मानण्यास हरकत नाही.*

त्यानंतर लागणाऱ्या नर्मदा नदीचें वर्णन जबलपूर ते नरसिंगपूर या भागांत वर्षाकालारंभीं त्या नदीचें जें दृश्य दिसतें त्यासारखेंच आहे. ग्रीष्मऋतूंत पाणी आटल्यामुळे नर्मदा नदीचा प्रवाह अरुंद होऊन खडकाळ प्रदेशांतून वाहत असतो. तो पाहून कालिदासासारख्या प्रतिभासंपन्न कवीला हत्तीच्या अंगावर काढलेल्या विचित्रविचित्र वेलबुट्टींची उपमा सुचली तर त्यांत आश्चर्य नाही. नर्मदा नदीचें हें दृश्य अमर-

---

* रामटेक हें नागपूर जबलपूर रस्त्यावर आहे अमरवाडा हें रामटेकच्या थेट उत्तरेस नसून, किंचित् पश्चिमेस नागपूर–नरसिंगपूर रस्त्यावर आहे. म्हणून माल देश ओलांडल्यावर 'किंचित् पश्चाद्व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण' असे यक्षाने मेघास सांगितलें असावें.

कंटकाजवळ दिसणार नाही; शिवाय आम्रकूट पर्वत ओलांडून द्रुततर गतीने काही अंतर गेल्यावर नंतर विंध्य पर्वताच्या पायथ्याशीं मेघाला नर्मदा नदी लागेल, हें मेघदूतातील वर्णनहि नदीचें उगमस्थान जें अमर-कंटक त्याला लागू पडणार नाही, हें उघड आहे.

पुण्यक्षेत्र म्हणून रामटेकची प्रसिद्धि आज निदान दीड हजार वर्षे अव्याहत आहे. सुप्रसिद्ध गुप्त-सम्राट् द्वितीय चंद्रगुप्त-विक्रमादित्य हा इ. स. च्या चौथ्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला. याची मुलगी प्रभावतीगुप्ता ही विदर्भनृप द्वितीय रुद्रसेन यास दिली होती. वऱ्हाडात उमरावतीजवळ ऋद्धपूर येथे प्रभावतीगुप्तेचा एक ताम्रपट सापडला आहे. तो तिने कार्तिक शुक्ल द्वादशीस रामगिरिस्वामीच्या पादुकाजवळून (रामगिरिस्वामिनः पादमूलात्) दिला असें म्हटलें आहे.* वाकाटकाचें राज्य विदर्भावर होतें. प्राचीन विदर्भांत सध्याचा वऱ्हाड व मध्यप्रांताचे मराठी जिल्हे यांचा समावेश होत असे. वाकाटकाचे काही ताम्रपट रामटेकच्याहि पूर्वेस बालाघाट व भंडारा जिल्ह्याच्या पूर्वसीमेपर्यंत सापडले आहेत. या प्रांतात रामगिरि या नावाचें दुसरें कोणतेंहि प्राचीन ठिकाण नाही. तेव्हा वाकाटकाच्या काळीं ही टेकडी रामगिरि या नावाने प्रसिद्ध होती व तेथे श्रीरामचंद्राची पादुकारूपाने पूजा होत असे, असें स्पष्ट दिसतें कालांतराने तेथे राम व सीता यांच्या मूर्ति बसविल्या व लक्ष्मणाचेंहि स्वतंत्र देऊळ बांधण्यांत आलें; तथापि अजूनहि श्रीरामचंद्राच्या देवळात रामाच्या मूर्तीसमोर पादुका असून त्यांची पूजा होत असते

वाकाटकाच्या काळापूर्वीहि रामटेक प्रसिद्ध असावें. कारण तेथून जवळच मनसर येथे एका विशाल स्तूपाचा अवशेष अद्यापि विद्यमान असून, उत्खननाची वाट पाहत आहे कधी काळीं त्याचें उत्खनन झाल्यास या स्थानाची प्रसिद्धि यापूर्वीहि जाईल याविषयी आम्हास संशय वाटत नाही. त्यानंतर यादवाच्या काळींहि रामटेकाची पुण्यक्षेत्र म्हणून प्रसिद्धि होती. रामटेकवरच्या लक्ष्मणाच्या देवळांत रामदेवराव

* भारत इतिहास संशोधक मंडळाचें त्रैमासिक', पु ३, पृ ९३ पाहा.

यादवांच्या काळचा एक भग्न शिलालेख अद्यापि विद्यमान आहे, तो आम्ही इतरत्र प्रसिद्ध केला आहे.* त्यावरून तेराव्या शतकात रामटेक-वर व त्याच्या सभोवार सध्याप्रमाणेच अनेक तीर्थे होतीं, हें स्पष्ट दिसतें.

मेघदूतातील रामगिरीचें सर्व वर्णन रामटेकास लागू पडतें. तेथे अद्यापि सीतेची न्हाणी म्हणून एक कुंड दाखवतात. प्राचीन काळीं तेथे रामाच्या पादुका बसविल्या होत्या, हें मागे दाखविलें आहेच. वर्षाऋतूत मेघ याच्या शिखरावर आला असता एखाद्या कल्पनाचतुर कवीस तो वप्रक्रीडापरिणत गजाप्रमाणें दिसला असला, तर त्यात आश्चर्य नाही या पर्वतावर अद्यापि घनदाट छायेचे वृक्ष आहेत व वर्षाऋतूच्या आरंभीं येथे कुटजाचीं (कुडयाचीं) फुलें मुबलक आढळतात. या पर्वतावर सर्वत्र तांबुस रंगाचे दगड दिसत असल्याने यक्षाला आपल्या प्रियेचें चित्र शिलेवर काढण्याकरिता धातुराग मिळविण्यास मुळीच प्रयास पडले नसतील असो.

रामटेक हाच रामगिरि मानल्यास रामायणांत कोठेंहि याचा उल्लेख कसा आला नाही, अशी शंका उत्पन्न होईल. पण तिचें समाधान करणें कठिण नाही. रामायणाच्या अरण्यकांडात (सर्ग ११, श्लोक १४–२७) वर्णिलें आहे की, दण्डकारण्यात असताना निरनिराळ्या ऋषींच्या आश्रमात कोठे तीन महिने, कोठे चार महिने, कोठे दहा महिने, कोठे वर्ष, याप्रमाणे राहत राहत रामचंद्रानी दहा वर्षे घालविलीं. या आश्रमांचीं सविस्तर वर्णनें रामायणात आलीं नसल्यामुळे या अवधींत ते रामगिरीच्या आश्रमात येऊन राहिले नसतीलच, असें म्हणता येणार नाही. रामगिरीचें नांव रामायणात आलें नाही हें खरें; पण तें येणेंहि शक्य नव्हतें, हें सहज ध्यानात येईल कारण हें नांव श्रीरामचंद्र तेथे राहिल्यामुळे काही काळाने प्राप्त झालें असावें. या टेकडीचें प्राचीन नांव शैवलगिरि होतें असें रामटेक माहात्म्यावरून दिसतें. हा शैवलगिरि शम्बूकाच्या तपश्चर्येचें स्थान म्हणून रामायणाच्या उत्तरकांडात (सर्ग ७९) उल्लेखिला आहे रामटेकास शम्बूक तपश्चर्या करीत होता, अशी

* सरदेसाई स्मारक ग्रंथ, पृ. ११५-१२४

आख्यायिका आहे. ज्या ठिकाणीं त्याचा शिरच्छेद झाला, त्या ठिकाणीं शिवलिंग स्थापित करण्यात आलें व तें अद्यापि धूम्रेश्वर* या नावानें रामटेकवर प्रसिद्ध आहे. त्या प्रसंगीं शम्बूकानें प्रार्थना केल्यावरून श्रीरामचन्द्रानीं या गिरीवर वास केला व तेव्हांपासून या टेकडीस रामटेक म्हणू लागले असें म्हणतात. रामायणातील शम्बूकाच्या तपश्चर्येच्या स्थानाचें वर्णन रामटेकास जुळेल असेंच आहे. तेव्हा रामवनवासाच्या वर्णनात रामगिरीचा उल्लेख नाही, या आक्षेपांत काही तथ्य राहत नाही.

## कालिदासानें रामटेकच कां स्वीकारलें ?

शेवटीं कालिदासानें आपल्या विरही यक्षास रामटेकासच का राहावयास लावलें याचा विचार करूं. पुष्कळ विद्वानांच्या मतें कालिदास हा इ. स. च्या चौथ्या शतकांत द्वितीय चन्द्रगुप्त-विक्रमादित्याच्या दरबारीं होऊन गेला. गुप्त व वाकाटक घराण्यांचा अत्यंत घनिष्ठ संबंध चन्द्रगुप्ताच्या काळीं आला होता, कारण चन्द्रगुप्तानें आपली कन्या प्रभावतीगुप्ता वाकाटकनृपति द्वितीय रुद्रसेन यास दिली होती. या वाकाटक शाखेचा† सर्वांत प्राचीन ताम्रपट प्रभावतीगुप्तेचा असून, तो तिनें नन्दिवर्धनाहून दिला होता. त्या वेळीं ती आपल्या पतीच्या निधनामुळें अल्पवयी मुलाच्या नावानें राज्य करीत होती. त्यानंतर तिचा मुलगा द्वितीय प्रवरसेन हा गादीवर बसला. त्याचे दोन ताम्रपट गेल्या पाच-सहा

*वर उल्लेखिलेल्या रामदेवरावाच्या काळच्या शिलालेखांतहि याचा उल्लेख धूम्राक्ष या नावानें आला आहे. सरदेसाई स्मारक ग्रंथ, पृ. १२८ पहा. भवभूतीनें आपल्या उत्तररामचरितांत शम्बूकाच्या तपश्चर्येचें स्थान पंचवटीजवळ होतें असें दाखविलें आहे. पण मूळ रामायणकर्त्यांनें इतर ठिकाणीं फेरफार केले आहेत. तसेंच याहि बाबतींत केलें असावें.

† वाकाटकाची दुसरी एक शाखा वत्सगुल्म (सध्याचे अकोला जिल्ह्यांतील वाशीम) येथें राज्य करीत होती, असें अलीकडील संशोधनावरून सिद्ध झालें आहे.

वर्षात सापडले आहेत तेहि नन्दिवर्धनाहून दिले आहेत. हे ताम्रपट त्याच्या कारकीर्दीच्या आरंभीचे—एक दुसऱ्या वर्षाचा व दुसरा अकराव्या वर्षाचा असे—आहेत. यापुढचे मात्र त्याचे बहुतेक सर्व ताम्रपट प्रवरपुराहून दिले आहेत. त्यावरून नन्दिवर्धन ही वाकाटकांची आरंभीची राजधानी होती व पुढे आपल्या कारकीर्दीच्या अकराव्या वर्षानंतर प्रवरसेनाने आपल्या नावाने प्रवरपुर नामक शहर वसवून तेथे ती नेली, असें स्पष्ट दिसतें. रामटेकजवळ सध्या नगरधन नावाने ज्ञात असलेलें खेडें हेंच प्राचीन नन्दिवर्धन होय* अशी तेथे परंपरागत समजूत आहे. रामटेकमाहात्म्यांतहि ह्या ठिकाणाचा नन्दिवर्धन म्हणून उल्लेख आहे. नन्दिवर्धन राजधानी होती तेव्हा रामटेकला राजधानीच्या सानिध्यामुळे फार महत्त्व आलें असावें. वाकाटक व गुप्त यांचा संबंध लक्षांत घेतां कालिदास वाकाटक राजधानी नन्दिवर्धन येथे आला असावा असें अनुमान केल्यास तें बहुधा चूक होणार नाही त्या वेळीं त्याचें रामटेकास सहजच जाणें झालें असेल. त्या टेकडीवर हिंडत असतां त्याला मेघदूत काव्याची कल्पना सुचली असावी व त्याने तें काव्य तेथेच लिहून पुरें केलें असावें. कालिदास काही काळ वाकाटक दरबारीं राहिला असावा, असें दुसऱ्याहि एका आख्यायिकेवरून दिसतें. सेतुबंध नामक प्राकृत काव्य प्रवरसेनाच्या नावावर आज जवळ जवळ दीड हजार वर्षे प्रसिद्ध आहे. या काव्याच्या कित्येक सर्गांच्या शेवटीं तें कालिदासाने रचलें असा उल्लेख आहे व त्याच्या एका टीकाकारानेहि हें काव्य कालिदासाने विक्रमादित्याच्या आज्ञेने प्रवरसेनाकरिता रचलें, असें म्हटलें आहे तेव्हा कालिदासाने तें स्वतः रचलें असावें किंवा प्रवरसेनाला तें रचण्यात पुष्कळ मदत केली असावी, असें दिसतें तसें असल्यास या प्राकृत महाकाव्याकरितांहि तो कित्येक महिने या भागांत राहिला असावा

*नन्दिवर्धनाचा उल्लेख राष्ट्रकूट-नृपति तृतीय कृष्णाच्या देवळीच्या ताम्रपटात आला आहे भोसल्यांच्या काळीं नन्दिवर्धन हेंच तहसिलीचे मुख्य ठिकाण होतें अठराव्या शतकात नागपुरात रचलेल्या मुरञ्जनचरित नामक संस्कृत नाटकातहि नन्दिवर्धनाचा उल्लेख आला आहे सरदेसाई स्मारक ग्रंथ, पृ १४८ पहा

# कालिदासाचें 'कुन्तलेश्वरदौत्य'*

कविकुलगुरु कालिदासाचे सात ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. त्यामध्ये ऋतुसंहार, कुमारसंभव, मेघदूत व रघुवंश या चार काव्यांची आणि मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय व शाकुंतल या तीन नाटकांची गणना होते. याशिवाय सेतुबन्ध किंवा रावणवहो हें प्रवरसेनाच्या नावावर प्रसिद्ध असलेलें प्राकृत काव्यहि विक्रमादित्याच्या आज्ञेवरून त्याने रचलें, अशी आख्यायिका आहे. हा प्रवरसेन वाकाटकवंशी द्वितीय प्रवरसेन मानल्यास या आख्यायिकेची उपपत्ति लावता येते. कारण तो प्रवरसेन सुविख्यात गुप्तसम्राट् द्वितीय चन्द्रगुप्त-विक्रमादित्य याचा दौहित्र असून त्याच्या काळीं वाकाटकांच्या दरबारीं गुप्तांचें फार प्रस्थ होतें, हें वाकाटकांच्याच कांही ताम्रपटावरून स्पष्ट दिसतें. द्वितीय चन्द्रगुप्ताचा आश्रित कालिदास हा गुप्तांच्या इतर अधिकाऱ्यांप्रमाणे विदर्भात आला असावा व वाकाटकांच्या नन्दिवर्धन नामक तत्कालीन राजधानी-च्या जवळच असलेल्या रामगिरीवर (नागपूरजवळच्या हल्लीच्या रामटेकावर) त्याने आपलें 'मेघदूत' काव्य रचलें असावें हें मी 'सह्याद्री'-च्या एप्रिल १९४४ च्या अंकांत दाखविलें होतें. त्या प्रसंगाने कालिदास कांही काळ विदर्भात राहिला असल्यास, त्याने 'सेतुबंध' काव्य रचलें असणें किंवा द्वितीय प्रवरसेनास तें रचण्यांत मदत केली असणें अशक्य नाही.

याशिवाय 'कुन्तलेश्वरदौत्य' नामक आणखीहि एक ग्रंथ कालि-दासाने रचला होता असें दिसतें. हा ग्रंथ सध्या उपलब्ध नाही. त्यामुळे त्याची पूर्ण माहिती आपणांस देतां येत नाही. तथापि प्राचीन संस्कृत ग्रंथांतील कांही उताऱ्यावरून व तत्कालीन ताम्रपटादि ऐतिहासिक साधना-वरून त्याचें स्वरूप अजमावतां येतें. तसा प्रयत्न प्रस्तुत लेखांत केला आहे.

* 'सह्याद्रि' पुणे, जुलै, १९४५, पृ. ४२-४८.

या ग्रंथाचा स्पष्ट उल्लेख काश्मीरचा सुप्रसिद्ध संस्कृत कवि क्षेमेन्द्र याने आपल्या 'औचित्यविचारचर्चा' नामक ग्रंथात केला आहे. काव्यामध्ये औचित्याचें अत्यंत महत्त्वाचें स्थान असतें व तें औचित्य विविध प्रकारचें असतें, हें क्षेमेन्द्राने उदाहरणें देऊन स्पष्ट केलें आहे. त्या प्रसंगाने अधिकरणौचित्याचें उदाहरण म्हणून खालील श्लोक क्षेमेन्द्राने कालिदासाच्या कुन्तलेश्वरदौत्यांतून* उद्धृत केला आहेः—

> *इह निवसति मेरुः शेखरः क्ष्माधराणा-*
> *मिह विनिहितभाराः सागराः सप्त चान्ये।*
> *इदमहिपतिभोगस्तम्भविभ्राजमानं*
> *धरणितलमिहैव स्थानमस्मद्विधानाम्॥*

या श्लोकांतील स्थानवर्णनाच्या औचित्याचें विवेचन करतांना क्षेमेन्द्र म्हणतो—' महाराजाचा दूत माण्डलिक राजाच्या दरबारीं गेला असतां त्याला आपल्या प्रभूच्या पदवीला अनुरूप अशी मानाची जागा मिळाली नाहीं. [तेव्हा तो कार्यवशात् जमिनीवरच बसला व ( इतर मानकऱ्यांनी चेष्टा केली तेव्हा ) धीरगंभीर स्वराने म्हणतो—' हें धरणितल शेषरूपी स्तंभांनी निश्चल झालेलें असें आसन आहे व हेंच आमच्या सारख्यांना योग्य असें स्थान आहे. कारण पर्वतश्रेष्ठ मेरु व सात महासागरहि याच आसनावर बसले आहेत व त्यांच्यासारखीच माझी योग्यता आहे.' अर्थात् हें आसन सामान्य प्रतीचें नसून माझ्यासारख्या सम्राट् प्रतिनिधीला योग्य असेंच तें आहे असा त्या दूताचा आशय आहे.

हा दूत कोण व तो कोणत्या सामन्ताच्या दरबारीं गेला होता याविषयी क्षेमेन्द्राने उल्लेख केला नाहीं. तेव्हा इतर संस्कृत ग्रंथांतील उल्लेखांवरून याविषयी काय माहिती मिळते तें आपण पाहूं.

---

* 'औचित्यविचारचर्चा' निर्णयसागर प्रेसने काव्यमाला, प्रथम गुच्छ (पृ. ११५-१६०), मध्यें छापली आहे. यामध्यें पृ. १३९ वर कालिदासाच्या ग्रंथाचें नांव 'कुन्तेश्वरदौत्य' असें दिलें आहे. पण तें मुद्रणदोषामुळें असावें.

राजशेखराच्या 'काव्यमीमांसा'* आणि भोजाच्या 'शृंगारप्रकाश'† व 'सरस्वतीकण्ठाभरण'‡ या ग्रंथात खालील श्लोक आला आहे—

अकलहसितत्वात्क्षालितानीव कान्त्या
मुकुलितनयनत्वाद्व्यक्तकर्णोत्पलानि।
पिबति मधुसुगन्धीन्याननानि प्रियाणा
त्वयि विनिहितभारः कुन्तलानामधीशः॥

[ अर्थ-तुझ्यावर (राज्यकारभाराचा) भार टाकून कुन्तल देशाचा राजा किंचित् हास्याने ज्याच्यावर कांति पसरली आहे, नयन अर्धमीलित झाल्यामुळे ज्यांच्या कर्णावरचीं कमलें स्पष्ट दिसत आहेत अशीं सुरापानाने सुगन्धित झालेलीं आपल्या प्रियांचीं मुखें चुम्बीत असतो. ]

हा श्लोक विक्रमादित्याने 'कुन्तलेश काय करीत असतो' असें विचारल्यावर कालिदासाने उत्तरादाखल म्हटला असें भोजाने आपल्या शृंगारप्रकाशात स्पष्ट म्हटलें आहे.|| श्लोकाच्या अर्थाकडे लक्ष देता हाहि श्लोक कालिदासाच्या कुन्तलेश्वरदौत्यातून घेतला असावा व विक्रमादित्याने कुन्तलेश्वराकडे पाठविलेला दूत दुसरा कोणी नसून स्वतः

---

* गायकवाडाची ओरिएंटल सीरीज (प्रथमावृत्ति), पृ. ६०-६१ पाहा.

† हा समग्र ग्रंथ अद्यापि प्रकाशित झाला नाही. तथापि त्याच्या आठव्या प्रकाशातील प्रस्तुत उतारा श्रीयदुगिरियतिराजस्वामीनी शृंगारप्रकाशाच्या २२–२४ प्रकाशांच्या आवृत्तीला जोडलेल्या आपल्या संस्कृत प्रस्तावनेत दिला आहे.

‡ सरस्वतीकण्ठाभरण ( निर्णयसागर प्रत ), द्वितीय परिच्छेद, श्लोक ८४. यातील उताऱ्यात कालिदासाच्या श्लोकात 'पिबतु' असा पाठ दिला आहे. तसेच 'व्यक्तकर्णोत्पलानि' याच्या जागी 'ज्ञातकर्णोत्पलानि' असाहि पाठभेद आढळतो.

|| यथा कालिदासः 'किं कुन्तलेश्वरः करोति' इति विक्रमादित्येन पृष्ट उक्तवान् । 'असकलहसितत्वात्—' इ.

कालिदासच असावा असें स्पष्ट दिसतें. कालिदासाचा रिपोर्ट ऐकून विक्रमादित्यानेंहि त्या श्लोकाच्या द्वितीयार्धांत किंचित् फरक करून

' पिबतु मधुसुगन्धीन्याननानि प्रियाणा

मयि विनिहितभारः कुन्तलानामधीशः ॥

म्हणजे 'माझ्यावर ( राज्यकारभाराचा ) भार टाकून कुन्तलेश आपल्या प्रियांचीं सुरापानानें सुगन्धित झालेलीं मुखें चुम्बीत राहो ' असें उत्तर दिलें असें राजशेखर व भोज यांनी आपापल्या ग्रंथांत म्हटलें आहे.

वरील दोन श्लोकांवरून विक्रमादित्यानें कालिदासाला आपला दूत म्हणून स्वतःचा माण्डलिक कुन्तलेश याच्या दरबारीं पाठविलें होतें; तेथें त्याचा प्रथम अपमान झाला; तथापि त्यानें तेथें राहून व तेथील परिस्थितीचें निरीक्षण करून ' कुन्तलेश तुझ्यावर राज्याचा भार टाकून स्वतः विलास करण्यांत दंग असतो ' असा रिपोर्ट आपला प्रभु विक्रमादित्य यास केला व त्यानेंहि ' कांहीं हरकत नाहीं, मी त्याच्या राज्याचें रक्षण करण्यास समर्थ आहे ' असा जबाब दिला असें दिसतें

'कुन्तलेश्वरदौत्य' ग्रंथ सध्या उपलब्ध नसल्यानें त्याविषयीं अधिक माहिती मिळत नाहीं. तथापि वरील उताऱ्यावरून तो नाटकरूपाचा असावा व त्यांत कालिदासाचें थोडेंबहुत आत्मचरित्र आलें असावें असें दिसतें. अशा तऱ्हेचीं ऐतिहासिक नाटकें प्राचीन काळीं संस्कृतांत लिहिलीं जात. याचें ठळक उदाहरण विशाखदत्ताचें 'मुद्राराक्षस' हें होय. याशिवाय याच लेखकाचें 'देवीचन्द्रगुप्त' नामक ऐतिहासिक नाटक होतें. त्यांत कांहीं महत्त्वाच्या गुप्तकालीन घटनांचा उल्लेख होता हें अलीकडे ज्ञात झालेल्या अलंकारग्रंथ व ताम्रपट यांतील उल्लेखांवरून सिद्ध झालें आहे. तशाच प्रकारचें हें कुन्तलेश्वरदौत्य नाटक असावें.* आमच्या ऐति-

* कदाचित् कालिदासाच्या इतर नाटकांप्रमाणे हेंहि नाटक शृंगार-प्रधान असून मालविकाग्निमित्रातल्याप्रमाणें त्याला फक्त ऐतिहासिक घटनेची पार्श्वभूमि दिली असेल. राजशेखराची विद्धसालभञ्जिका, बिल्हणाची कर्णसुन्दरी, इत्यादि संस्कृत नाटकांतहि तत्कालीन ऐतिहासिक घटनांची पार्श्वभूमि आढळते.

शास्त्रिक ग्रंथांविषयीच्या अनास्थेमुळे हीं नाटकें पुढे नष्ट झालीं. म्हणून उपलब्ध असलेल्या अन्य साधनावरून त्याचें स्वरूप अजमाविलें पाहिजे.

कुन्तलेश्वरदौत्यात निर्देशिलेले विक्रमादित्य व कुन्तलेश्वर कोण याचा आता विचार करूं. कालिदास विक्रमादित्याचा आश्रित होता अशी परंपरागत आख्यायिका आहे व ती सर्व विद्वानानी मान्य केली आहे. तथापि हा विक्रमादित्य कोण याविषयी मात्र विद्वानात ऐकमत्य नाही. या बाबतींत मुख्य असे दोनच पक्ष आहेत. काहींच्या मतें हा विक्रमादित्य सध्या विक्रम संवत् या नावाने प्रचलित असलेल्या शकाचा संस्थापक होय. याच्या उलट दुसरे काही विद्वान म्हणतात की तो गुप्तवंशी विख्यात सम्राट् द्वितीय चन्द्रगुप्त-विक्रमादित्य असावा. यापैकी पहिल्या पक्षाचें साहाय्य आपला प्रश्न सोडविण्यात मिळणें शक्य दिसत नाही. कारण या विक्रमादित्याच्या काळाची आपणास फारशी माहिती नाही. किंबहुना असा कोणी विक्रमादित्य ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकात होऊन गेला होता काय याविषयीहि निश्चित पुरावा मिळत नाही दुसऱ्या पक्षाची मात्र मदत मिळणें शक्य आहे. कारण गुप्तकालाविषयी आता बरीच माहिती उपलब्ध झाली आहे. तेव्हा चन्द्रगुप्त-विक्रमादित्याचा कोणा कुन्तलेशाशीं संबंध आला होता काय याचा विचार करूं.

या बाबतींत आतापर्यंत दोन मतें व्यक्त झालीं आहेत. मुंबईच्या सेंट झेवियर कॉलेजचे प्रोफेसर हेरास यानी हा कुन्तलेश्वर कदम्बवंशी काकुत्स्थवर्मन् असावा असें मत प्रतिपादलें आहे.* कारण त्या काळीं कदम्ब हे कुन्तलदेशावर राज्य करीत होते. दक्षिण महाराष्ट्र, मुंबई इलाख्याचे कानडी जिल्हे व म्हैसूरचा उत्तर भाग या प्रदेशाला पूर्वी कुन्तल अशी संज्ञा होती. कदम्बांची राजधानी वैजयन्ती ( सध्याची वनवासी ) ही या भागातच उत्तर कानडा जिल्ह्यात आहे. शिवाय कदम्बांच्या एका लेखात काकुत्स्थवर्मन् या राजाने आपली मुलगी देऊन गुप्तराजांच्या मुळाला प्रसिद्ध केलें असें म्हटलें आहे. तेव्हा द्वितीय चन्द्रगुप्ताने या कदम्ब राजाची मुलगी आपल्या मुलाकरिता स्वीकारिली

* बिहार आणि ओरिसा सोसायटीचे जर्नल्, पु १२, भाग ४ पाहा.

असावी व तो विवाहसंबंध जुळवून आणण्याच्या कामावर कालिदासाची योजना झाली असावी असें अनुमान प्रो. रेप्सन यांनी केलें आहे. पण तें बरोबर दिसत नाही. कारण हा काकुत्स्थवर्मन् इ. स. ४५० च्या सुमारास म्हणजे चन्द्रगुप्ताच्या कालानंतर सुमारें पन्नास वर्षांनी होऊन गेला असावा असें इतिहासज्ञांचें मत आहे. शिवाय कदम्बांचें राज्य चन्द्रगुप्ताच्या तन्त्राने चाललें होतें याचाहि काही पुरावा नाही.

दुसरें मत प्रो. कृष्णस्वामी ऐयंगार यांचें. त्यांनी आपल्या लेखात हा कुन्तलेश वाकाटकवंशी द्वितीय प्रवरसेन असावा असें प्रतिपादिलें आहे.* चन्द्रगुप्ताच्या काळीं गुप्त व वाकाटक या घराण्यांचा वैवाहिक संबंध आला होता, कारण चन्द्रगुप्ताने आपली मुलगी प्रभावती गुप्ता ही वाकाटकवंशी द्वितीय रुद्रसेन यास दिली होती. हा रुद्रसेन विवाहानंतर थोड्याच वर्षांनी वारला. तेव्हा प्रभावती गुप्ता आपल्या अल्पवयी मुलाच्या नावाने राज्य करू लागली. तिला मदत करण्याकरिता चन्द्रगुप्ताने आपल्या पदरचे अनुभवी अधिकारी व मुत्सद्दी विदर्भात पाठविले होते असें दिसतें. कारण प्रभावती गुप्तेच्या ताम्रपटात वाकाटकाच्या वंशावळीला प्राधान्य दिलें नसून गुप्तांच्या वंशावळीला दिलें आहे.† या प्रसंगीं राजकवि कालिदास हाहि विदर्भात आला असावा व त्याने तेथे असताना मेघदूत काव्य रचलें व द्वितीय प्रवरसेनास सेतुबन्ध काव्य रचण्यात मदत केली असें अनुमान करता येतें. कालिदासाचा वाकाटकांशीं असा संबंध आल्यामुळे कुन्तलेश हा वाकाटक द्वितीय प्रवरसेनच असावा असें मत प्रो. ऐयंगार यांनी प्रतिपादिलें. 'या प्रवरसेनाचें कुन्तलदेशावर राज्य नव्हतें. तेव्हा त्याला कुन्तलेश्वर कसें म्हटलें?' असा आक्षेप या मतावर येण्याजोगा होता. पण त्याचें निराकरण प्रो. ऐयंगार यांनी पुढील प्रकारें केलें. अजठ्याच्या एका लेखात या प्रवरसेनाचा आजा पहिला पृथ्वीषेण याने कुन्तलाधिपतीचा पराभव केला होता असें म्हटलें

* प्रो ऐयंगार यांचे समग्र लेख ( ओरिएंटल् बुक् एजन्सीनें प्रकाशित केलेले ), भाग १, पृ २७१-२७४ पाहा

† प्रभावती गुप्तेचा पुण्यास सापडलेला ताम्रपट पाहा एपिग्राफिया इंडिका, पृ १५, पृ ३९ इ.

आहे. त्यानंतर वाकाटकानी कुन्तलेश ही पदवी धारण केली असावी. याला उपोद्बलक असा पुरावा श्रीकृष्ण कवीच्या भरतचरित काव्यात आढळतो. या काव्याच्या आरंभीं प्राचीन कवींची स्तुति करताना श्रीकृष्ण कवीने प्रवरसेनाचा कुन्तलेश म्हणून निर्देश केला आहे.* या सर्व प्रमाणावरून द्वितीय प्रवरसेन हाच कुन्तलेश असावा असें मत प्रो. ऐयगार यानी प्रतिपादिलें व त्या वेळीं उपलब्ध असलेल्या पुराव्यावरून तेंच सयुक्तिक भासत असल्याने इतरहि काही संशोधकानी त्याला पुष्टि दिली. याच मताचा पुरस्कार दहा वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या माझ्या 'कालिदास' पुस्तकात मी केला होता. तथापि प्रो ऐयगार यांच्या मतावर काही ठिकाणीं आक्षेप घेता येण्याजोगा होता गुप्त व वाकाटक यांचा इतका घनिष्ठ संबंध असतां प्रथम प्रसगीं कालिदासाचा असा अपमान वाकाटकाच्या दरबारीं झाला असेल हें संभवनीय वाटत नव्हतें. शिवाय वाकाटकानी कुन्तलनृपतीचा पराभव केला होता हें खरें असलें तरी त्यानी स्वत. 'कुन्तलेश' ही पदवी धारण केली होती असें त्यांच्या कोरीव लेखावरून दिसत नाही. उलट बालाघाट येथे सापडलेल्या त्यांच्या अगदी शेवटच्या ताम्रपटातहि वाकाटक नृपति नरेन्द्रसेन याचा कुन्तल राजकन्येशीं विवाह झाल्याचा उल्लेख आहे, त्यावरूनहि वाकाटक व कुन्तलेश हे भिन्न होते हें उघड आहे. श्रीकृष्ण कवि निश्चित कोणत्या काळीं होऊन गेला हें माहीत नाही, तथापि त्याचें काव्य बरेंच अलीकडचें दिसतें. तेव्हा त्यातील विधानाचा पुरावा या विवादास्पद बाबतींत निर्णायक मानता येत नाही.

---

* तो श्लोक येणे प्रमाणे--'जलाशयस्यान्तरगाधसत्त्वमलब्धवन्धं गिरिचौर्यवृत्त्या । लोकेष्वलं कान्तमपूर्वसेतु बबन्ध कीर्त्या सह कुन्तलेश ॥' भरतचरित, सर्ग १, श्लो ४. यांत अनेक शब्दावर श्लेष आहे भावार्थ-- 'श्रीरामचद्राने समुद्रात मोठमोठया पर्वतप्राय शिला जोडून तयार झालेला व लकेपर्यंत जाणारा असा सेतु बांधला, पण कुन्तलेशाने त्याच्यावरहि ताण केली कारण त्याने मन्दबुद्धीना आकलन न होणारा, अन्य ग्रंथांतून काही चोरून न घेता रचलेला, जगांत सुप्रसिद्ध व सुन्दर असा अपूर्व सेतु ( सेतुबन्ध काव्यग्रंथ ) आपल्या कीर्तीसह निर्माण केला '

प्रस्तुत लेखकाच्या अलीकडच्या संशोधनावरून या प्रश्नावर आस्ते प्रकाश पडत आहे. सातारा,* कोल्हापूर,† गोकाक,‡ व गोवें|| या ठिकाणी गेल्या दहा पधरा वर्षांत चार ताम्रपट सापडले आहेत त्यांचा छाकल्याने विचार करतां इ. स. च्या चौथ्या शतकापासून दक्षिण-महाराष्ट्रांत मानपूर येथे एक राष्ट्रकूट-घराणें राज्य करीत होतें असें स्पष्ट दिसतें. या घराण्याचा मूळ पुरुष मानाङ्क हा असून त्याने आपल्या नांवें मानपुर नामक नगर स्थापून तेथें आपली राजधानी केली होती. वर उल्लेखिलेल्या ताम्रपटांपैकी कोल्हापूर जवळ सापडलेल्या ताम्रपटांत मानाङ्काला 'श्रीमत्कुन्तलानां प्रशासिता'—'समृद्ध अशा कुन्तल देशाचा अधिपति'—असें म्हटलें आहे. या ताम्रपटाचे संपादक म्हैसूर युनिव्हर्सिटीतील डॉ. कृष्ण यांनी या ठिकाणीं 'श्रीसात्कुन्त घरा नः प्र ईंषिता' असें काहीं तरी वाचून व सात्कुन्त म्हणजे सातपुडा असा शोध लावून हें घराणें वऱ्हाड-मध्यप्रांतांत राज्य करीत होतें असें म्हटलें आहे ! पण तें चूक आहे. वर दिलेल्या शुद्ध वाचनावरून मानाङ्क हा कुन्तल देशावर राज्य करीत होता, हें स्पष्ट दिसेल. कुन्तल देशांत कृष्णा नदीचें खोरें व त्याच्या दक्षिणेचा महाराष्ट्र यांचा समावेश होत असे. 'विख्यातकृष्णवर्णे तैलस्नेहोपलब्धसरलत्वे। कुन्तलविषये नितरां विराजते मल्लिकामोदः ॥' हा उत्तर चालुक्यांच्या एका ताम्रपटांतील§ चालुक्यनृपति जयसिंह उर्फ

* भारत इतिहास संशोधक मंडळ त्रैमासिक, पु. ८, पृ. १६२ इ.

† म्हैसूर आर्किऑलॉजिकल सर्व्हे रिपोर्ट, सन १९२९, पृ १९७ इ.

‡ एपिग्राफिया इंडिका, २१, पृ. २८९ इ.

|| ए. इं., पु २४, पृ १४३ इ.

§ ए. इं., पु १२, पृ. १५३. या श्लोकाचे श्लेषामुळे दोन अर्थ होतात—(१) कृष्णवर्णाबद्दल प्रख्यात असलेल्या व तेलाच्या स्निग्धतेनें सरळ झालेल्या (युवतींच्या) केशपाशांत मोगरीचा सुवास अतिशय खुलतो. (२) ज्यामध्ये कृष्णवर्णा नामक प्रसिद्ध नदी आहे व तैलप राजाविषयींच्या निष्ठेनें ज्यांतील लोक सद्वर्तनी झाले आहेत अशा कुन्तल देशांत (तैलपाचा नातू) मल्लिकामोद उर्फ जयसिंह अतिशय शोभतो -

मल्लिकामोद याविषयी आलेला श्लेषपूर्ण सुंदर श्लोक पाहा यात कुन्तल-देशात कृष्णवर्णा ऊर्फ कृष्णा नदी वाहते असा स्पष्ट निर्देश आहे. कोल्हापूरच्या ताम्रपटात अने नदीच्या तीरावरील काम्यक व जावल या वाड्यासहित पाडरगपल्ली नामक गाव एका ब्राह्मणास दान दिल्याचा उल्लेख आहे. यातील अने नदी ही कृष्णा नदीस मिळणारी येन्ना नदी किंवा वेणा नदी असावी. जावल तर जावळीचें प्राचीन रूप दिसतें. काम्यक गाव जावळीच्या आसपास सापडतें काय पाहिलें पाहिजे. तथापि एवढ्या निर्देशावरून सातारा जिल्हा राष्ट्रकूट मानाकाच्या राज्यांत अंतर्भूत होत होता यात संशय नाही. वरील ताम्रपटातील कुन्तल देशाचा उल्लेख आतापर्यंत वाचला न गेल्यामुळे हें राष्ट्रकूट घराणें कोठें राज्य करीत होतें याविषयी संशोधकानी अनेक तर्कवितर्क केले होते; पण या चार ताम्रपटाच्या प्राप्तिस्थानांवरून व त्यात उल्लेखिलेल्या ग्रामनामाच्या शोधावरून दक्षिण महाराष्ट्रात सातारा, कोल्हापूर, सोलापूर या भागावर या राष्ट्रकूटाचें राज्य होतें असें स्पष्ट दिसतें. त्याची राजधानी मानपुर हें सातारा जिल्ह्यातील माण तालुक्याचें मुख्य गाव माण हें असावें.

या ताम्रपटातील अक्षरवटिका व काही कालनिर्देश यावरून हें घराणें इ. स. च्या चवथ्या शतकापासून दक्षिण-महाराष्ट्रात राज्य करीत असावें असें दिसतें. त्यांचें राज्य उत्तरेस गोदावरी नदीपर्यंत पसरलें असावें. गोदावरीच्या उत्तरेस विदर्भात वाकाटकाचा अमल होता. इ. स. च्या चौथ्या शतकात वाकाटक वंशाच्या दोन शाखा गोदावरीच्या उत्तरेस राज्य करीत असलेल्या आढळतात. वडील पातीची राजधानी नागपूरजवळचें नन्दिवर्धन असून तिच्या अमलाखाली उत्तर-वऱ्हाड व मध्यप्रांताचे नागपूर, वर्धा, भंडारा, छिंदवाडा, बैतूल, बालाघाट इत्यादि जिल्हे होते. धाकट्या पातीची राजधानी वत्सगुल्म (हल्लीचें अकोला जिल्ह्यातील वाशीम) असून तिच्या राज्यांत अजंठा पर्वतराजीच्या दक्षिणेचा व गोदावरीच्या उत्तरेचा मुलूख अन्तर्भूत होत होता असें दिसतें. वाकाटकांची धाकटी पाती व राष्ट्रकूट यांचीं राज्यें एकमेकास लागून असल्यामुळे त्यांच्यामध्ये कटकटीचे प्रसंग वरचेवर

उद्भवत असले तर त्यांत आश्चर्य नाही. याचें प्रत्यंतर या दोन्ही राजवंशांच्या कोरीव लेखांत आढळतें. वत्सगुल्माच्या वाकाटकांचा एक कोरीव लेख अजंठा येथील १६ नंबरच्या गुहेंत कोरला आहे. त्यांत विंध्यसेन* नामक राजानें कुन्तलेशाचा पराजय केल्याचा उल्लेख आहे. याच्या उलट राष्ट्रकूटांच्या कोल्हापूरजवळ सापडलेल्या ताम्रपटांत मानाङ्कनृपतीनें विदर्भ व अश्मक देश जिंकल्याचें नमूद केलें आहे. अश्मक हें गोदावरीच्या तीरावरील प्रदेशाचें नाव होतें, दुसरा देश विदर्भ हा वत्सगुल्म वाकाटकांच्या अमलाखालचा दक्षिण विदर्भ असावा. येथे हे दोन राजवंश समकालीन मानण्यांत कांहीच हरकत नाही.

द्वितीय चंद्रगुप्त-विक्रमादित्याचा वाकाटकांना आश्रय होता तसा या राष्ट्रकूटांनाहि होता असें दिसतें. कदाचित् वाकाटकांप्रमाणे या राष्ट्रकूट घराण्याशींहि त्यानें विवाहसंबंध जोडला असेल. दक्षिणेंतील राजांशी विवाहसंबंध करून त्यांचें सख्य कायम करणें ही गुप्तांची राजनीति होती. दक्षिण-कुंतलावर राज्य करणाऱ्या कदंबांशींहि गुप्तांचा विवाहसंबंध होता हें वर दाखविलें आहे. चंद्रगुप्ताचा समकालीन राष्ट्रकूटवंशी राजा देवराज हा होता. याला राष्ट्रकूटांच्या ताम्रपटात देवराज इंद्राची उपमा दिली आहे. कदाचित् इंद्राप्रमाणे हा देवराज विलासलोलुप असेल. याच्या दरबारींच कालिदासाला चंद्रगुप्तानें आपला वकील म्हणून पाठविलें होतें असें दिसतें. कालिदासानें केलेल्या रिपोर्टांत हा कुन्तलेश विलासोपभोगात मग्न झाला असून त्यानें तुझ्यावर (म्हणजे विक्रमादित्यावर) या राज्याच्या संरक्षणाची जबाबदारी टाकली आहे असें म्हटलें आहे व चंद्रगुप्तानेंहि कालिदासाच्या श्लोकांत थोडा फरक

---

* अजठ्याचा लेख त्रुटित असल्यानें पं. भगवानलाल इंद्रजी, डॉ. बुल्हर वगैरेंनी या राजाचें नांव पृथ्वीषेण असें वाचलें होतें. कारण त्या वेळी वाकाटकांच्या दोन शाखा होत्या अशी माहिती उपलब्ध नव्हती. प्रस्तुत लेखकानें अलीकडे हा लेख हैद्राबाद आर्कियॉलॉजिकल सीरिज, न. १४ मध्यें प्रसिद्ध केला आहे.

करून 'माझ्यावर राज्याचा भार टाकून कुन्तलेश विलासमग्न होवो" असें उत्तर दिलें असें काव्यमीमांसादि ग्रंथातील उल्लेखावरून दिसतें.

वाकाटक व हे कुन्तलेश राष्ट्रकूट या दोन्ही राजवंशांना चंद्रगुप्ताचा आश्रय असल्याने त्याच्यामध्ये पुढे स्नेहसंबंध उत्पन्न झाले व त्याचेंच पर्यवसान चंद्रगुप्ताचा पणतु वाकाटक-नृपति नरेन्द्रसेन याचा विवाह कुंतलेशाची कन्या अज्झितभट्टारिका हिच्याशीं होण्यात झालें असें वाकाटकाच्या बालाघाट येथे सापडलेल्या ताम्रपटावरून दिसतें.

भरतचरित या संस्कृत काव्याचा कर्ता कृष्ण कवि याने सेतुबन्ध काव्याचा निर्माता (वाकाटक) प्रवरसेन यास कुन्तलेश म्हटलें आहे खरें, पण हा कवि प्रवरसेनानंतर कित्येक शतकानी होऊन गेलेला दिसतो. तत्कालीन कोरीव लेखांवरून वाकाटकाचें राज्य कधीकाळीं कुन्तल देशावर होतें असें दिसत नाही. उलट त्यांचीं कुन्तलेशाशीं युद्धें व विवाहसंबंध झाल्याचें कोरीव लेखात नमूद आहे. म्हणून कृष्णकवीचें विधान या विवादास्पद बाबतींत प्रमाण मानता येत नाही.

याप्रमाणे कालिदासाने 'सेतुबन्ध' व 'कुन्तलेश्वरदौत्य' हे दोन ग्रंथ रचले होते या परंपरागत व लेखनिविष्ट अशा आख्यायिकाची उपपत्ति समाधानकारक रीतीने लावता येते व त्या योगें कालिदास हा द्वितीय चन्द्रगुप्त-विक्रमादित्य याच्या काळीं इ. स. ४०० च्या सुमारास होऊन गेला या मताला पुष्टि मिळते. पुढे कधीकाळीं कुन्तलेश्वरदौत्य ग्रंथ उपलब्ध झाल्यास तत्कालीन राजकीय परिस्थितीवर व कालिदासचरित्रावरहि जास्त प्रकाश पडेल हें उघड आहे *

---

* अलीकडील संशोधनावरून गोवे येथील ताम्रपट या राष्ट्रकूट वंशाचा नव्हे असे दिसतें. ए. इ., पु. २६, पृ. ३३७ पाहा. पण याच वंशाचा आणखी एक ताम्रपट दौंड पेट्यात सापडला आहे महाराष्ट्रातील प्राचीन ताम्रपट व शिलालेख, पृ. १ पाहा. (वा. वि. मि.)

# भवभूतीचें जन्मस्थान*

पुरा यत्र स्रोतः पुलिनमधुना तत्र सरितां
विपर्यासं यातो घनविरलभावः क्षितिरुहाम् ।
बहोर्दृष्टं कालादपरमिव मन्ये वनमिदं
निवेशः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति ॥

उत्तररामचरित, २, २७.

संस्कृत वाङ्मयांत कालिदासाच्या खालोखाल सन्मानाचें स्थान ज्यानें आपल्या रम्य नाट्यकृतींनी मिळविलें आहे त्या भवभूति कवीच्या स्थलकालाविषयीहि अद्याप विद्वानांचें ऐकमत्य झालें नाही. तर्से पाहिलें तर त्यानें आपल्या नाटकांत स्वतःविषयी सर्वस्वी मुग्धता न स्वीकारता आपल्या कालाविषयी नाही, तरी जन्मस्थान, कुल व विद्वत्ता याविषयी स्पष्ट विधानें केलीं आहेत. उदाहरणार्थ—' महावीरचरित ' नाटकाच्या प्रस्तावनेंत नाटककाराविषयी माहिती देतांना सूत्रधार म्हणतो—' अस्ति दक्षिणापथे पद्मपुरं नाम नगरम्। तत्र केचित्तैत्तिरीयिणः काश्यपाश्चरणगुरवः पङ्क्तिपावनाः पञ्चाग्नयो धृतव्रताः सोमपीथिन उदुम्बरनामानो ब्रह्मवादिनः प्रतिवसन्ति। तदामुष्यायणस्य तत्रभवतो वाजपेययाजिनो महाकवेः पञ्चमः सुगृहीतनाम्नो भट्टगोपालस्य पौत्रः पवित्रकीर्तेर्नीलकण्ठस्यात्मसंभवः श्रीकण्ठपदलाञ्छनो भवभूतिर्नाम जातूकर्णीपुत्रः कविर्मित्रधेयमस्माकमित्यत्रभवन्तो विदाङ्कुर्वन्तु।' या उताऱ्यावरून भवभूतीच्या

---

* हा लेख मध्यप्रांत संशोधन मंडळ, नागपूर, या संस्थेच्या ता. १४ जानेवारी १९३५ रोजीं भरलेल्या प्रथम वार्षिक सम्मेलन-प्रसंगीं वाचला होता. नंतर 'सह्याद्रि,' पुणे, मे १९३५, पृ. १–१० मध्यें तो प्रसिद्ध झाला.

पूर्वजाचें कुलनाम उदुंबर होतें; ते तैत्तिरीयशाखेचे, काश्यपगोत्री, पंचाग्नि ठेवणारे, सोमयाग करणारे, ब्रह्मवेत्ते असे विद्वान् व सत्वशील ब्राह्मण होते; भवभूतीच्या महाकवि नामक पाचव्या पूर्वजानें वाजपेय नावाचा श्रौतयाग केला होता; हे ब्राह्मण दक्षिणापथांत पद्मपुर नामक नगरांत राहत असत. इत्यादि निश्चित माहिती आपणास मिळते. दक्षिणापथ या शब्दानें सामान्यतः नर्मदेच्या दक्षिणेचा प्रदेश समजण्यात येतो. 'नर्मदाया दक्षिणेन देशो दक्षिणापथः' असें वात्स्यायनकामसूत्राचा टीकाकार यशोधर म्हणतो. राजशेखराच्या 'काव्यमीमांसे'त (पृ. ९३) 'माहिष्मत्याः परतो दक्षिणापथ' माहिष्मतीच्या (मध्याच्या महेश्वराच्या) पलीकडचा (म्हणजे दक्षिणेचा) प्रदेश हा दक्षिणापथ असें स्पष्ट म्हटलें आहे. तेव्हां भवभूति दक्षिण हिंदुस्थानांतील कवि होता यांत संशय नाहीं. 'मालतीमाधवा'च्या प्रस्तावनेंत तर यापेक्षांहि निश्चित विधान सांपडतें. त्या नाटकांत सूत्रधाराच्या तोंडीं 'अस्ति दक्षिणापथे विदर्भेषु पद्मपुर नाम नगरम्' असे शब्द घातले आहेत, त्यावरून भवभूतीचें जन्मस्थान जें पद्मपुर तें प्राचीन विदर्भांतच होतें असें म्हणतां येतें. वास्तविक इतका स्पष्ट निर्देश असल्यावर या बाबतींत तरी संशय राहूं नये.

### पद्मपुर विदर्भांतच

पण कांहीं विद्वानांनी ही गोष्टहि संशयास्पद मानली आहे. 'मालतीमाधवा'चा प्राचीन टीकाकार जगद्धर हा पद्मपुर म्हणजे पद्मावती असें म्हणतो. भवभूतीनें आपल्या 'मालतीमाधव' नाटकाचें सविधानक पद्मावती नगरींत घडलें असें दाखविलें आहे. विदर्भांच्या राजाचा मंत्री आपल्या माधव नामक मुलास पद्मावती नगरीच्या प्रधानाच्या मुलीशीं त्याचा विवाह व्हावा या हेतूनें विद्याभ्यासाकरितां म्हणून पद्मावतीस पाठवितो, असा कथाभाग त्या नाटकांत आला आहे; त्यावरून ही पद्मावती नगरी विदर्भांत नव्हती हें उघड आहे. पद्मावती नगरीच्या आसमंताद्भागाचें, तेथील पारा, सिंधु, मधुमती व लवणा या नद्यांचें, मधुमती व सिंधु यांच्या संगमावरच्या सुवर्णबिंदु नामक शिवालयाचें, जें

वर्णन 'मालतीमाधवा'त आलें आहे तें ग्वाल्हेरपासून नैर्ऋत्येस ५० मैलांवर असलेल्या ग्वाल्हेर संस्थानांतील नरवार शहरास लागू पडतें, असें जनरल कनिंगहॅम या प्रसिद्ध पुराणवस्तुसंशोधकानें प्रथम दाखविलें. नरवार ज्या नदीवर वसलें आहे तिचें नांव सिंधु आहे. पारा नदीला सध्या पार्वती म्हणतात. मधुमती व लवणा या नद्यांचीं सध्या महुवर व नोन अशीं नांवें प्रचलित आहेत. मधुमती व सिंधु या नद्यांच्या संगमावर सध्याहि सोनबिंदु नामक शिवालय दृष्टीस पडतें. नरवारचा पुरातन व प्रेक्षणीय किल्ला इतिहासप्रसिद्ध आहे. नऊ नागराजे पद्मावतीस राज्य करीत होते असें पुराणांत म्हटलें आहे. तेथे नागराजांचीं तांब्यांचीं नाणीं सापडलीं आहेत, त्यांवरून तें नगर निदान इ. स. च्या तिसऱ्या-चौथ्या शतकाइतकें प्राचीन आहे. तेव्हा भवभूतीचें पद्मावती नगर म्हणजे हल्लीचें नरवार होय असा जनरल कनिंगहॅमने तर्क केला.* त्यानंतर ग्वाल्हेर संस्थानच्या पुराणवस्तुसंशोधन खात्याचे अधिकारी श्री. एम्. बी. गर्दे यांनी उत्खनन करून पद्मावती म्हणजे खुद्द नरवार नसून त्याच्या जवळचें पवाया (ज्याला पदमपवाया असेंहि म्हणतात तें) खेडें होय असें निश्चित ठरविलें.†

के. मा. श्यं. लेले यांनी आपल्या 'मालतीमाधव-सार व विचार' या निबंधांत (पृ. ५) पद्मावती हेंच भवभूतीचें जन्मस्थान पद्मपुर असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. भवभूति पद्मावतीचें फार बारकाईनें वर्णन करतो तेव्हा तें स्थान त्याला बालपणापासून परिचित असावें अशी त्याची विचारसरणी होती. पण हें गाव विदर्भांत नाहीं ही अडचण येत होती; तेव्हा त्यांनी 'अस्ति दक्षिणापथे पद्मपुरं नाम नगरम्' असा 'विदर्भेषु' हें पद नसलेला 'महावीरचरितां'तील पाठच प्रमाण मानला. शिवाय 'मालतीमाधवा'च्या अत्यंत प्राचीन प्रतींत

---

* Cunningham—
Coins of Mediaeval India, p. 22.

† Archaeological Survey of India Report for 1915–1916, pp. 101–109.

'विदर्भेषु' हें पद आढळत नाही व त्या नाटकाचा प्राचीन टीकाकार जगद्धर पद्मावती म्हणजे पद्मपुर असें म्हणतो या गोष्टीहि त्यांच्या तर्काला पोषक होत्या. पण पदमपवाया हें गाव दक्षिणेंत नाही ही अडचण येत होती. त्यावर त्यांनी खालील तोड सुचविली—"पद्मपुर नगर दक्षिणापथात आहे' हा उल्लेख सूत्रधाराच्या भाषणात आला आहे. भवभूतीचीं नाटकें कालप्रियनाथाच्या उत्सवप्रसंगीं प्रथम रंगभूमीवर आलीं असें त्याच्या प्रस्तावनातील उल्लेखावरून दिसतें. हा कालप्रियनाथ म्हणजे उज्जैनीचा महाकालेश्वर नसून काल्पीचा असावा. पदमपवाया हें गाव काल्पीच्या दक्षिणेस असल्याने ' दक्षिणापथांत पद्मपुर आहे ' या सूत्रधारोक्तीची उपपत्ति लावता येते. येथे दक्षिणापथ या शब्दाचा रूढार्थ न घेता ' दक्षिण दिशेचा मार्ग ' असा यौगिक अर्थ घेतला पाहिजे. " कै. लेले यांच्या वरील अनुमानात अनेक गोष्टी गृहीत धरल्या आहेत. पद्मावती शहराचें सूक्ष्म वर्णन करता येण्यास तें भवभूतीचें जन्मस्थानच असलें पाहिजे असें नाही.* दक्षिणापथ व कालप्रियनाथ यांचे त्यांनी केलेले अर्थहि तितकेसे ग्राह्य वाटत नाहीत. म्हणून भवभूतीचें पद्मपुर ग्वाल्हेर संस्थानात नसून वऱ्हाडांत असावें असा तर्क उत्तररामचरिताचे विद्वान् संपादक, डॉ. श्री. कृ. बेलवलकर यांनी केला आहे. तथापि वऱ्हाडात पद्मपुर नामक एखादें प्राचीन नगर होतें, असा स्पष्ट पुरावा त्यास उपलब्ध न झाल्यानें त्यांनी 'Pending the discovery of new data, then, we may assume that Bhavabhuti's ancestral home was in the Berars and not near the site of Narwar in Gwalior'† ( नवीन पुरावा सापडेपर्यंत भवभूतीच्या पूर्वजांचें राहण्याचें ठिकाण

* 'मालतीमाधवा'तील नायक माधव याच्याप्रमाणे भवभूतीहि विद्याभ्यासाकरिता विदर्भांतून पद्मावतीस गेला असावा असा तर्क डॉ. श्री. कृ. बेलवलकर यांनी केला आहे; तो खरा मानल्यास त्याला पद्मावतीचें सूक्ष्मज्ञान कसें प्राप्त झालें याची उपपत्ति लावतां येते.

† Rama's Later History (Harward Oriental Series), p. xxxvii.

ग्वाल्हेर संस्थानातील नरवारनजीक नसून वऱ्हाडांत होतें असें आपण गृहीत धरूं ) असे उद्गार काढले आहेत.

## नवीन पुरावा

या बाबतींत अवश्य असलेला पुरावा नुकताच उपलब्ध झाला आहे सुमारें पंधरा वर्षांपूर्वी मध्यप्रांताच्या दुर्ग जिल्ह्यांत पानाबारस जमीनदारींत मोहल्ला या गावीं एका घराचा पाया खणत असता ताम्रपटाचा एक पत्रा सापडला होता. त्या वेळीं त्याचे ठसे घेऊन ते मध्यप्रांतातील प्रसिद्ध संशोधक रायबहादूर हिरालाल यांच्याकडे पाठवले होते. ताम्रपटाचा एकच पत्रा उपलब्ध झाला होता व त्यात ज्याने तो कोरविला त्या राजाची वंशवर्णावळ किंवा नावहि आलें नसल्यामुळे यांत काही विशेष महत्त्वाचा उल्लेख नसेल असें वाटून त्याकडे त्यांचें साहजिकच दुर्लक्ष झालें. गतवर्षीच्या जानेवारी महिन्याचे अखेरीस रा. ब. डॉ. हिरालाल यांनी त्या ताम्रपटाची मला माहिती दिली. तथापि त्याच्या मालकाचें नाव त्यांना आठवत नव्हतें व स्वतःच्या जवळचा त्याचा ठसाहि त्यांस सापडत नव्हता; म्हणून त्या ताम्रपटाचा शोध लावतां येईना. पुढे काही दिवसांनी आपल्या घरचे जुने कागदपत्र चाळीत असतां त्यांना तो ठसा सापडला सुदैवाने त्यांनी त्या ठशावर त्यावेळीं ताम्रपटाच्या मालकाचें नावहि लिहून ठेवलें होतें. त्यावरून दुर्ग जिल्ह्याचे डेप्युटी कमिशनर श्रीयुत बा. अ. वैद्य्यवाले यांनी माझ्या विनंतीवरून चौकशी केली. तेव्हां तो दुर्ग येथील मुनशी अकबरखान नामक मुसलमान गृहस्थाजवळ सापडला.

या ताम्रपटावरील लेख काही कारणाने अपूर्ण राहिलेला दिसतो. हा लेख इ. स. च्या चौथ्यापासून सहाव्या शतकापर्यंत मध्यप्रांत–वऱ्हाड-मध्ये प्रचलित असलेल्या पेटिकाशीर्षक लिपींत कोरला आहे. त्यांत वाकाटक वंशातील प्रथमच्या दोन राजाचें वर्णन आलें आहे. तें वाकाटकांच्या इतर ताम्रपटांतल्याप्रमाणेच असल्याने त्यांत कांही नवीन माहिती नाही. तथापि त्यांतील एक निर्देश अत्यंत महत्त्वाचा आहे बहुतेक प्राचीन ताम्रपटात ते जेथून दिले होते त्या स्थानाचा उल्लेख असतो., प्रस्तुत

ताम्रपटानहि 'पद्मपुरात्' (पद्मपुराहून) असा स्पष्ट निर्देश लेखारंभींच आला आहे, त्यावरून तो ताम्रपट पद्मपुराहून दिला असावा किंवा देण्याचें योजिलें असावें हें उघड आहे पद्मपुर या शब्दानंतर 'वासकात्' (शिबिराहून) 'स्थानात्' (ठिकाणाहून) 'विजयस्कन्धावारात्' (विजयी शिबिरातून) यासारखा एखादा शब्द नसल्याने हा ताम्रपट देणाऱ्या राजाचा त्यावेळीं पद्मपुरीं तात्पुरता मुक्काम होता असें म्हणता येत नाही पद्मपुर हें तीर्थ म्हणूनहि प्रसिद्ध नाही तेव्हा तो ताम्रपट तीर्थक्षेत्रीं ब्राह्मणास दिला होता असेंहि वाटत नाही. म्हणून पद्मपुर ही प्रस्तुत ताम्रपट देणाऱ्या राजाची राजधानी असावी असें अनुमान करता येतें

## वाकाटकांचें साम्राज्य

विदर्भांत वाकाटकानी इ. स च्या चौथ्या शतकापासून सहाव्या शतकापर्यंत राज्य केलें उत्तर हिंदुस्थानात ज्याप्रमाणे गुप्तांचें त्याप्रमाणेच दक्षिण हिंदुस्थानात वाकाटकांचें काही काळ विस्तृत व समृद्ध असें साम्राज्य होतें, असें कोरीव लेखावरून आता सिद्ध झालें आहे विदर्भांत त्यांच्या कालपरत्वें अनेक राजधान्या झालेल्या दिसतात गुप्तवंशी विख्यात राजा द्वितीय चन्द्रगुप्त–विक्रमादित्य याची कन्या प्रभावतीगुप्ता वाकाटक नृपति द्वितीय रुद्रसेन यास दिली होती. सध्या उपलब्ध झालेल्या वाकाटकांच्या सर्व ताम्रपटांत हिचा पुणें येथे सापडलेला ताम्रपट प्राचीन आहे तो 'नन्दिवर्धनात्' म्हणजे नन्दिवर्धनाहून दिला होता नन्दिवर्धन या स्थलनामानंतर 'वासकात्' वगैरेसारखे शब्द नसल्याने तें वाकाटकांचें त्यावेळचें राजधानीचें शहर असावें असें दिसतें * त्यानंतर तिच्या द्वितीय प्रवरसेन नामक मुलाचे अनेक ताम्रपट प्रसिद्ध झाले आहेत. त्यातील कित्येक प्रवरपुराहून दिले आहेत; त्यावरून त्याने आपल्या नावाने

* हें स्थान रामटेकजवळचे नागपूर जिल्ह्यातील नन्दरधन किंवा नगरधन असावें

प्रवरपुर* नामक नगर स्थापून तेथे राजधानी नेली होती असें अनुमान होतें. प्रवरसेनानंतर नळवंशी भवदत्तवर्म्याने विदर्भावर स्वारी करून त्याचा काही भाग काबीज केला व नन्दिवर्धन ही आपली राजधानी केली असें त्याच्या पेटिकाशीर्षक लिपीत कोरलेल्या ताम्रपटावरून प्रस्तुत लेखकाने सन १९३३ च्या नागपूरच्या 'यामीनगरी' मासिकातील वाकाटकावरील लेखात दाखविलें आहे. त्यानंतर प्रवरसेनाचा नातु द्वितीय पृथ्वीषेण याने पराक्रमानें आपलें राज्य परत मिळविलें असें दिसतें. त्याचा एकच व तोहि अपूर्ण असा ताम्रपट उपलब्ध झाला आहे व तो त्याने बेण्वार गावीं आपला मुक्काम असताना (बेण्वारवासकात्) देण्याचें योजिलें होतें असें त्यातील उल्लेखावरून दिसतें. त्यावेळीं त्याची राजधानी कोठें होती हें समजत नाही. त्यानंतर देवसेन, हरिषेण इत्यादि वाकाटक नृपतींचें वर्णन अजंठ्याच्या शिलालेखांत आलें आहे त्याची राजधानी वत्सगुल्म, अकोला जिल्ह्यातील वाशीम, ही होती. तेव्हा प्रस्तुत ताम्रपट बहुधा द्वितीय पृथ्वीषेणाने किंवा त्याचा पिता नरेन्द्रसेन याने देण्याचें योजिलें होतें व त्यावेळीं त्याची राजधानी पद्मपुर होती असें वाटतें.

## भवभूतीच्या पूर्वजांस राजाश्रय

वाकाटक राजे स्वतः ब्राह्मण असून श्रौत विधींचे अभिमानी होते. पहिल्या प्रवरसेनाने अग्निष्टोम, आप्तोर्याम, उक्थ्य, षोडशिन्, अतिरात्र, वाजपेय, बृहस्पतिसव, साद्यस्क्र व अश्वमेध यज्ञ केल्याचा उल्लेख वाकाटकांच्या बहुतेक ताम्रपटात सापडतो तेव्हा त्यांचा विद्वान् व मखयाग करणाऱ्या ब्राह्मणांस आश्रय असला पाहिजे. त्याच्या ताम्रपटावरून हीच गोष्ट सिद्ध होते द्वितीय प्रवरसेनाने अनेक गावें ब्राह्मणांना दान दिल्याचें त्याच्या ताम्रपटावरून दिसतें भवभूति आपल्या नाटकांत पद्मपुरच्या आपल्या पाच पिढ्यांचा निर्देश करतो. तो आठव्या शत-

* हें स्थान वर्धा जिल्ह्यातील पवनार असावे. तेथील अवशेषांचे वर्णन पुढे एका लेखात केले आहे (वा. वि. मि.)

काच्या आरंभीं होऊन गेला असें संशोधकांनी ठरविलें आहे. प्रत्येक पिढी तीस वर्षांची मानल्यास भवभूतीचा पांचवा पूर्वज वाजपेययशकर्ता महाकवि हा सहाव्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेला असावा. वाकाटक नृपति द्वितीय पृथ्वीषेण याचा काळ संशोधकांनी इ. स. ४७० ते ४८५ हा ठरविला आहे. हे काळ अनुमानाने ठरविले असल्यामुळे त्यात पाचपंचवीस वर्षांची चूक असणें असंभवनीय नाही व पद्मपुरास भवभूतीच्या पूर्वजांच्या पिढ्याहि केवळ पाचच होऊन गेल्या असेंहि म्हणता येत नाही. एकदरीत भवभूतीचा पांचवा पूर्वज व हा वाकाटक राजा यांचे काळ जवळ जवळ येतात यांत संशय नाही. भवभूतीच्या नाटकांतील प्रस्तावनांवरून त्याचे पूर्वज तैत्तिरीय शाखेचे, पंचाग्नि राखणारे व वाजपेय यागापर्यंत यज्ञ करणारे, मीमांसक व ब्रह्मवादी ब्राह्मण होते. वाकाटक राजांनी अशा विद्वान् व सच्छील ब्राह्मणास मुद्दाम आपल्या राजधानीत बोलावून त्यांच्याकरवीं यज्ञ करविले असावे असें अनुमान केलें तर तें बहुधा चूक होणार नाही. वाकाटकानंतर मध्यप्रांत-वऱ्हाडांत प्रथम कलचुरींची व नंतर चालुक्यांची सत्ता झाली. कलचुरींची राजधानी माहिष्मती व चालुक्यांची बदामी या दोन्ही या प्रांतांत नव्हत्या. त्या वेळीं हा प्रांत एखाद्या प्रांताधिकाऱ्याकडे सोपविला असेल किंवा त्या राजांचे लहान सहान मांडलिक राजे येथे राज्य करीत असतील. त्यांचा विद्वानास व कवींस तितका आश्रय नसल्याने भवभूतीस राजाश्रयार्थ किंवा लोकाश्रयार्थ उत्तर हिंदुस्थानांत पद्मावती, कनोज इत्यादि ठिकाणीं हिंडावें लागलें असावें असें दिसतें. शेवटीं शेवटीं त्याला कनोजच्या यशोवर्म्याचा आश्रय होता हें कल्हणाच्या राजतरंगिणीवरून स्पष्ट दिसतें.

## पद्मपुराचा शोध

येथवर भवभूतीचें जन्मस्थान पद्मपुर हें उत्तर हिंदुस्थानांत नसून प्राचीन विदर्भातच होतें व तें एके काळीं वाकाटकांच्या राजधानीचें शहर होतें यासंबंधीं नुकताच उपलब्ध झालेला पुरावा आपण पाहिला.

आता हें पद्मपुर कोठें होतें याचा विचार करूं. प्राचीन विदर्भ म्हणजे सध्याचा वऱ्हाड अशी सामान्यतः समजूत असल्याने हें पद्मपुर वऱ्हाडांतच कोठेंतरी असावें असें अनेक संशोधकांनी म्हटलें आहे. पण त्यांना त्याचा पत्ता अद्यापि लागला नाही.* सध्याच्या वऱ्हाड प्रांतांतील चारहि जिल्ह्यांतील खेडेगावांच्या सरकारी याद्या मी लक्षपूर्वक चाळून पाहिल्या, पण त्यामध्ये पद्मपुर किंवा त्याला जुळेल अशा नांवाचें एकहि खेडेगाव किंवा शहर मला आढळलें नाही. वास्तविक विदर्भ म्हणजे सध्याचा वऱ्हाडच ही प्रचलित समजूत चुकीची आहे कालिदासाच्या 'मालविकाग्निमित्रा'त वर्धा नदीनें प्राचीन विदर्भाचे दोन भाग झाले होते व राज्यविषयक कलह मिटविण्याकरितां ते दोघा चुलत भावांना दिले होते, असें दाखविलें आहे. त्यावरून हल्लीप्रमाणे वर्धा नदी विदर्भाची पूर्व मर्यादा नसून, त्या नदीच्या पूर्वेस जवळ जवळ अर्धा विदर्भ पसरला होता यांत संशय राहत नाही विदर्भावर राज्य करणाऱ्या वाकाटकाची पहिली राजधानी नंदिवर्धन ही सध्याच्या वऱ्हाडांत नसून नागपूर जिल्ह्यांत रामटेकजवळ आहे. वाकाटक नृपति द्वितीय प्रवरसेन याचे ताम्रपट छिंदवाडा, शिवनी, नागपूर, भंडारा इत्यादि मध्यप्रांताच्या अनेक जिल्ह्यांत सापडले आहेत व त्यांत उल्लेखिलेलीं गावेंहि या जिल्ह्यांत सापडतात तेव्हा विदर्भाची पूर्व मर्यादा वर्धा नदी ही नसून ती पूर्वेस छत्तीसगडपर्यंत पसरला होता यांत संशय नाही. भोजकट (सध्याचा वऱ्हाड) याप्रमाणे वेणाकट (वाईनगंगेच्या तीरावरचा प्रदेश) हाहि प्राचीन विदर्भाचा एक जिल्हा होता.

---

*डॉ सर रा गो भांडारकरांनी हें पद्मपुर चांद्याजवळचे असावें असें म्हटलें आहे व भवभूति ज्या शाखेचा होता त्या तैत्तिरीय शाखेचे ब्राह्मण चांद्याच्या आसपास दिसतात, हें प्रमाण दिलें आहे इतर संशोधकांनी याचाच अनुवाद केला आहे चांद्याजवळ पद्मापुर म्हणून एक खेडें आहे; पण तें भवभूतीचे जन्मस्थान पद्मपुर असणे शक्य नाही कारण (१) त्याचें नांव निराळें आहे; (२) तें खेडें अलीकडे ५०–६० वर्षांत वसलें आहे असें सांगतात; आणि (३) तेथे महत्त्वाचे प्राचीन अवशेष दिसत नाहीत.

## आमगावाजवळचें पदमपूर

भंडारा व चांदा या मध्यप्रांताच्या मराठी जिल्ह्यांत पद्मपुर, पद्मापुर किंवा पदमपूर या नावाचीं सहा गावें मला सांपडलीं. यांपैकीं चांदा जिल्ह्याच्या चांदा, सिरोंचा व ब्रह्मपुरी तहसिलींत प्रत्येकीं एक, भंडारा जिल्ह्याच्या साकोली तहसिलींत दोन व आमगाव जमीनदारींत एक अशीं त्यांची वर्गवारी आहे. भवभूतीचें जन्मस्थान पद्मपुर हें एक नगर होतें असें तो स्वतःच सांगतो. वात्स्यायनाच्या कामसूत्राचा टीकाकार यशोधर 'नगरं अष्टशतग्राममध्ये तद्व्यवहारस्थानम्'—आठशें गावांचा व्यवहार जेथें चालतो तें नगर अशी नगराची व्याख्या करतो. तेव्हां प्राचीन पद्मपुर बरेंच मोठें असावें. शिवाय मार्गे उल्लेखिलेल्या ताम्रपटावरून तें एके कालीं वाकाटकाच्या राजधानीचें शहर होतें. तेव्हां तेथें बरेच प्राचीन अवशेष असावे अशी आपली सहजच कल्पना होते, या दृष्टीनें चौकशी करता भंडारा जिल्ह्यातील आमगाव स्टेशनजवळच्या पदमपूर या गावीं कांहीं अवशेष आहेत अशी माहिती मला मिळाली. शिवाय द्वितीय प्रवरसेनाच्या शिवनीच्या ताम्रपटानें दान दिलेलें गाव व त्याच्या चतुःसीमेच्या गावांपैकीं बहुतेक गावें पदमपुरापासून पाचवडा मैलाच्या टापूंत सांपडतात हें मी अन्यत्र दाखविलें आहे. त्यावरून त्या गावाभोंवतालचा प्रदेश वाकाटकाच्या अमलाखालीं होता यांत संशय नाहीं. तेव्हां आमगावाजवळचें पदमपूर हेंच भवभूतीचें पद्मपुर असण्याचा संभव वाटून गेल्या नाताळांत माझे स्नेही श्रीयुत ल. रा. कुळकर्णी, एम्. ए. व श्रीयुत ना. पु. पाठक यांसह मी पदमपूरला गेलों होतों तेथील अवशेषांचें वर्णन खालीं थोडक्यांत दिलें आहे.

## पदमपूरचे अवशेष

पदमपूर हें गाव भंडारा जिल्ह्याच्या आमगाव जमीनदारींत असून बंगाल-नागपूर रेल्वेच्या आमगाव स्टेशनच्या पूर्वेस अर्धाचतीन मैलावर आहे. शेतांसह त्या गावाचें क्षेत्रफळ १४६४ एकर असून लोकसंख्या सन १९११ च्या खानेसुमारींत ९२० होती ती गेल्या म्हणजे १९३१ च्या खानेसुमारींत पक्त ११२ भरली. गावाच्या पश्चिमेस एक ल्हानशी

टेकडी आहे. तिला नागमहाराजाची टेकडी म्हणतात. तिजवर काही जुन्या मूर्ति आहेत, असें समजल्यावरून आम्ही प्रथम तिजवर चढलों व तेथें आम्हास प्राचीन वाटलेल्या दोन शिळांचे फोटो घेतले. या दोन्ही शिळा सुमारें रुंदीच्या असून प्रत्येकावर एक चतुर्भुज देव व द्विभुज देवी यांच्या आकृति कोरल्या आहेत. यांची उंची २ फूट १० इंच आहे. देवाच्या वरच्या दोन्ही हातांत चक्राकारलें आयुध असून खालच्या उजव्या हातांत गदा व डाव्या हातांत कलश आहे. देवीच्या डोक्यावर छत्र असून उंच केलेल्या डाव्या हातांत कलश आहे व उजवा हात मोकळा खाली सोडला आहे या मूर्ति मध्ययुगीन कालांतल्या दिसतात.

टेकडीवरून पूर्वेस झाडींत लपलेलें पदमपूर, त्याच्या पश्चिमेचें लहानसें तळें, सभोंवार दरवळत पसरलेले उंच खडक, यांचें मनोहर दृश्य दिसतें. वर वर्णिलेल्या मूर्ति ठेवल्या आहेत त्या ठिकाणाजवळ एक नैसर्गिक रीतीनें झालेली लहानशी गुहा आहे. तिला दरवाज्याची दगडी चौकट लावून बंदिस्त करण्याची सोय केली आहे. आंत एक पाण्याचें लहानसें टाकें दिसलें या टेकडीवर माघ महिन्यांत शिवरात्रीस जत्रा भरते असें आम्हास समजलें.

नंतर टेकडीवरून खाली उतरून आम्ही पदमपूर गावाच्या वायव्य दिशेस सुमारें ७५० यार्डांवर जमिनीपासून १८ फूट उंच असलेल्या खडकावर एक मूर्ति ठेविली आहे असें समजल्यावरून तिकडे गेलों. या खडकावर जाण्यास वाट नसल्यानें आमचे ग्रामगावचे स्नेही श्री. भय्याजी जोशी यांनी गावांतून शिडी आणवून आमची वर चढण्याची सोय केली होती. या खडकावर चढल्यावर दुसऱ्या एका खडकाला टेकून ठेवलेली एक मोठी शिळा दिसली. तिजवर मध्यभागीं चतुर्भुज विष्णूची मूर्ति कोरली असून दोन्ही बाजूंनी खांब व त्यावर कमान दाखविली आहे विष्णूची मूर्ति सन्मुख आहे त्याच्या हातांत शंख, चक्र, गदा व पद्म दाखविलीं आहेत खांबाच्या बाहेर उजव्या बाजूस सेवक व डाव्या बाजूस सेविका असून त्यांच्या हातांत चवऱ्या आहेत. मूर्तीच्या शिल्प-कामावरून ती मध्ययुगीन कालाच्या शेवटीं म्हणजे दहावें ते बारावें शतक या कालातील असावी असा त्याचा तर्क आहे

नंतर आम्ही पद्मपूरच्या जवळच्या शेतांत गेलो. तेथे पाघावर तीन छिन्नविच्छिन्न मूर्तीचे अवशेष इतस्ततः पडलेले दिसले. ते एके ठिकाणी करवून आम्ही फोटो घेतले. त्यांपैकीं एक मूर्ति मूळची दोन फूट-उंचीची असावी. ती काळ्या दगडाची कोरलेली असून तिचें पॉलिश व शिल्पकाम प्रेक्षणीय आहे. या मूर्तीचा गळ्यापासून वरचा भाग तुटलेला दिसला; तो जवळच सापडल्यामुळे आम्ही तो धडावर ठेवून फोटो घेतला ही मूर्ति जैन तीर्थंकर पार्श्वनाथ याची आहे. तो कमलावर पर्यंकासन घालून ध्यानस्थ असलेला असा दाखविला आहे. त्याच्या वक्षस्थलावर श्रीवत्स आहे. त्याच्या कानाचे चाप लांब दाखविले आहेत. त्याच्या डोक्यावर सात फणांचा नाग असून त्यावर एकावर एक तीन छत्रें दिसतात. नागाच्या दोन्ही बाजूंस हातांत माला घेऊन उभे राहिलेले पूजक दाखविले आहेत. त्याच्या पलीकडे दोन्ही बाजूंस एक लहानसें देऊळ कोरलें असून त्यांत पार्श्वनाथाच्या मूर्तीसारखीच पण लहान मूर्ति कोरली आहे. छत्राच्या दोन्ही बाजूंस एक एक हत्ती आपली सोंड वर उचलून अभिषेक करीत आहे असें दाखविलें आहे. मूर्तीचे हात, गळ्याजवळचा काही भाग व सापाच्या फणा छिन्नविच्छिन्न झाल्या आहेत ही मूर्तीहि वरील विष्णूच्या मूर्तीप्रमाणेच मध्ययुगीन काळातील दिसते. याशिवाय जवळच शेतात पडलेली ऋषभदेव किंवा आदिनाथ या जैन तीर्थंकराचीहि एक मूर्ति वर वर्णिलेल्या पार्श्वनाथासारखीच ध्यानमग्न अशी कोरली आहे. मात्र हिच्या डोक्यावर नाग व दोन्ही बाजूंस हत्ती नाहीत. पायाच्या खाली याचें चिन्ह वृषभ हें कोरलें आहे

## नागपूर म्यूझियममधील मूर्ति

याशिवाय पद्मपूर गावाजवळच दोन मोठ्या देवळांचे अवशेष आम्हांस दिसले. यांपैकी एक देऊळ गावाच्या उत्तरेस सुमारें २०० यार्डांवर असावें. या देवळाच्या अवशेषांत दरवाजाच्या चौकटीची गणेशपट्टी ८ फूट लांब, १ फूट ७ इंच रुंद व १ फूट ६ इंच जाड भरली, त्यावरून त्या दरवाजाच्या रुंदीची कल्पना येईल. बाकीचे अवशेषहि याला शोभणारे

असे विशाल आकाराचें दिसले. वरील गणेशपट्टीवरील गणपतीच्या मूर्तीवरून हें देवालय हिंदु देवतेचें–बहुधा शिवालय–असावें. दुसरें देऊळ गावाला लागूनच उत्तर दिशेला होतें असें दिसतें. याचे काही दगडी खांब व देवाच्या मूर्तीमागची दगडी प्रभावळ एवढीं मात्र अद्यापि उभीं आहेत. काही खांबांचे तुकडे मातींत दबून गेलेले दिसले. वाटेवरच पडलेला एक तुकडा आम्ही मोजला. तो आरंभीं चौकोनी, नंतर अष्टकोनी, पुढे षोडशकोनी व शेवटीं वाटोळा असा घडविलेला दिसला. तळभागाची लांबी २१ इंच व रुंदी १९ व एकंदर तुकड्याची उंची ४ फूट ४ इंच भरली. प्रभावळीच्या आकारावरून तिच्यापुढील मूर्ति सुमारें पाच फूट उंचीची असावी असें वाटलें. सुमारें चाळीस वर्षांपूर्वी तेथील एक मोठी मूर्ति एका साहेबाने नागपूरच्या म्यूझियमकरिता नेली असें तेथील एका शेतकऱ्याने आम्हास सांगितलें. नागपुरास परत आल्यावर आम्ही तिचा शोध केला. पण नागपूर म्यूझियममध्ये पदमपुराहून आलेली एकहि मूर्ति आम्हास दिसली नाही. या म्यूझियममध्ये आरंभीं आरंभीं मूर्ति व कोरीव लेख यांच्या मूळ ठिकाणांचे निर्देश व्यवस्थितपणे लिहून ठेवण्याची काळजी घेतली नव्हती. म्हणून कित्येक मूर्तींचीं मूळ ठिकाणें (provenance) माहीत नाहीत असे शेरे म्यूझियमच्या यादींत मारले आहेत. म्यूझियममध्ये भंडाऱ्यास सापडलेली ५८ इंच उंचीची व उत्कृष्ट रीतीनें कोरलेली शिवाची उभी मूर्ति दृष्टीस पडते. ती खुद्द भंडाऱ्याहून आणली असेल काय याविषयी आम्हास संशय आला. कारण खुद्द भंडाऱ्यास प्राचीन देवळाचे अवशेष दिसत नाहीत. ही मूर्ति साधारणपणें पदमपूरच्या प्रभावळीइतकीच दिसल्यामुळे आम्ही आमच्या स्नेह्याकडून पदमपूरच्या प्रभावळीच्या लांबीरुंदीचीं मापें मागविलीं. व आश्चर्याची गोष्ट ही की, लांबी, रुंदी व आकृति या बाबतींत ती प्रभावळ व नागपूर म्यूझियममधील शिवाची मूर्ति ह्या अगदी एकसारख्या भरल्या. तेव्हा ती मूर्ति भंडारा शहरातून आणली नसून भंडारा जिल्ह्यातून–अर्थात् पदमपुराहून–आणली होती असें सिद्ध झालें.

या मूर्तीची पादपीठासहित उंची ४ फूट १० इंच असून ती तांबूस सैकतप्रस्तराची (sandstone) बनविलेली आहे. तिचें शिल्पकाम अत्युत्कृष्ट असून प्राचीन पद्धतीचें आहे. मूर्तीच्या डोक्यावरची कमान सर्पांची केली असून मध्ये कीर्तिमुख आहे भगवान् शंकराच्या शिरावर जटामुकुट आहे. कीर्तिमुखाकार रत्न व त्यावर चंद्रकला समोरच दिसते. त्याच्या गळ्यात अनेक अलंकार दाखविले आहेत. गळ्यात घातलेली पुष्पमाला जवळजवळ घोट्यापर्यंत खाली लोंबत असलेली दिसते. त्याच्या उजवीकडच्या वरच्या हातात त्रिशूल व खालच्या हातात रुद्राक्षमाळ आहे. डावीकडच्या वरच्या हातात फणा पसरलेला सर्प व खालच्या हातात कलश दिसतो. खालच्या उजव्या व डाव्या हाताजवळ अनुक्रमें मोरावर बसलेला कार्तिकेय व गणेश दाखविले आहेत त्याच्या पायाजवळ उजव्या बाजूस त्रिशूलधारी व डाव्या बाजूस कपालमुक्त दंड धारण करणारा सेवक कोरला आहे. त्याच्या पलीकडे दोन्ही बाजूस चवरी घेऊन एक एक सेविका उभी आहे. पादपीठावर एका बाजूस बसलेल्या स्त्रीची आकृति व तिच्या समोरच नंदी कोरला आहे

सुदैवानें या मूर्तीचा बहुतेक भाग उत्तम स्थितींत आहे. म्हणून शिल्पकाराचें कसब तींत उत्कृष्ट रीतीनें व्यक्त झालेलें दिसत आहे. भगवान् शंकराची मुद्रा प्रसन्न व गंभीर आहे. एकंदर शिल्पकाम अप्रतिम आहे नागपूरच्या म्यूझियममध्ये हिच्याइतकी उत्कृष्ट मूर्ति दुसरी नाही, असे उद्गार लखनौ म्यूझियमचे क्यूरेटर नुकतेच येथील मूर्ति पाहण्यास आले होते त्यांनी मजजवळ काढले. मूर्तीच्या शिल्पकामावरून ती दहाव्या ते अकराव्या शतकातील असावी असें वाटतें.

## प्राचीन पद्मपुर

अशा प्रकारच्या अनेक उत्कृष्ट प्राचीन मूर्ति जेथे अद्यापि सापडतात तें हें पदमपूर एके काळीं अत्यंत भरभराटीस पोंचलेलें शहर असावें याविषयीं संशय राहत नाही. पदमपूरच्या सभोवतालची वनश्रीहि प्रेक्षणीय आहे. गावाच्या सभोवार इतस्ततः पसरलेल्या टेकड्या व

त्यावरचे विविधाकृति विशाल खडक यांचीं दृश्यें मनोहर आहेत. सध्या येथे झाडी वरीच कमी झाली आहे; पण कांही वर्षांपूर्वीपर्यंत या बाजूचा भाग जंगलांत मोडत होता व त्यांत व्याघ्रादि हिंस्र पशूंची व सर्पांसारख्या विषारी प्राण्यांची वसति होती, असें गॅझेटियरमध्ये म्हटलें आहे. अशा परिसरांत भवभूतीचें बालपण गेलें असल्यास त्यास सृष्टीचें भव्य व उदात्त स्वरूप निरीक्षण करण्याची गोडी लागावी यांत आश्चर्य नाही. उत्तररामचरितांतील

> स्निग्धश्यामाः क्वचिदपरतो भीषणाभोगरूक्षाः
> स्थाने स्थाने मुखरककुभो झाङ्कृतैर्निर्झराणाम् ।
> एते तीर्थाश्रमगिरिसरिद्गर्तकान्तारमिश्राः
> संदृश्यन्ते परिचितभुवो दण्डकारण्यभागाः ॥ * (२, १४)

यासारखीं दंडकारण्यातील स्थलाचीं वर्णनें किंवा

> निष्कूजस्तिमिताः क्वचित्क्वचिदपि प्रोच्चण्डसत्त्वस्वनाः
> स्वेच्छासुप्तगभीरघोरभुजगश्वासप्रदीप्ताग्नयः ।
> सीमानः प्रदरोदरेषु विलसत्स्वल्पाम्भसो यास्वयं
> तृष्यद्भिः प्रतिसूर्यकैरजगरस्वेदद्रवः पीयते ॥ † (२, १६)

यासारखीं रोमहर्षण करणारीं अरण्यांचीं वर्णनें कवीला पद्मपुरच्या आसमंतात्भागातील निसर्गाच्या दृश्यावरून सुचलीं असलीं पाहिजेत

---

* कोठे काळंभोर तर कोठे (अरण्याच्या) भयंकर विशालतेमुळे रुक्ष दिसणारे, ठिकठिकाणी निर्झरांच्या झणाररवाने ज्यांनी दिग्भाग निनादित केले आहेत असे, व तीर्थे, आश्रम, पर्वत, नद्या, दऱ्या व अरण्यें यांनी युक्त असे हे मला परिचित असलेले दण्डकारण्याचे भाग दृग्गोचर होत आहेत.

† या दण्डकारण्याच्या प्रान्तभागात कोठे पक्ष्यांचेहि कूजन ऐकू येत नसल्याने शांतता आहे, तर कोठे श्वापदांच्या भयंकर गर्जना ऐकू येत आहेत; यथेच्छ झोप घेणाऱ्या, प्रचण्ड व भयकर सर्पांच्या श्वासोच्छ्वासाने येथील वणवे पेटले आहेत; क्वचित् दऱ्यांतील्यात थोडेसे पाणी चमकत आहे (व म्हणून) तहानलेल्या सरडयांना अजगरांचा घाम प्यावा लागत आहे

अशी कल्पना सहजच रसिक प्रेक्षकाच्या मनात येते. सध्या प्राचीन पद्मपुर नगराचें अगदी लहान अशा खेड्यात रूपांतर झालें आहे. पूर्वी जेथे नगर होतें तेथे आता शेतें झाली आहेत. या शेतातच मागे वर्णिलेल्या जैन तीर्थंकराच्या भग्न मूर्ति इतस्ततः पडलेल्या आम्हास दिसल्या. अजूनहि शेतें नांगरताना क्वचित् मातीचीं भांडीं व देवतांच्या लहान-सहान मूर्ति नांगराच्या फळाने वरती येतात. तेथील लोकांनी तशीं कांहीं प्राचीन मातीचीं भांडीं व गणपतीची १½ इंच उंचीची तांबूस सैकत-प्रस्तराची छोटी मूर्ति आम्हास दिली. एके काळीं भरभराटीस आलेल्या विस्तृत व समृद्ध अशा नगराचें हें आजचें दृश्य भवभूतीच्या दृष्टीस पडल्यास अनेक वर्षांनी दण्डकारण्याला भेट देणाऱ्या रामाप्रमाणेंच त्याच्याहि तोंडून खालील उद्गार बाहेर पडतील यांत संशय नाही—

> पुरा यत्र स्रोतः पुलिनमधुना तत्र सरिताम्
> विपर्यासं यातो घनविरलभावः क्षितिरुहाम् ।
> बहोर्दृष्टं कालादपरमिव मन्ये वनमिदं
> निवेशः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति ॥

'पूर्वी जेथे नद्यांचीं पात्रें होतीं तेथे आता वाळवंटें झाली आहेत. झाडी दाट होती तेथे विरळ झाली आहे व विरळ होती तेथे दाट झाली आहे पुष्कळ काळाने हें अरण्य दृष्टीस पडल्यामुळे तें जणू काय अगदीच निराळें असें दिसत आहे. पर्वतांच्या स्थानावरून मात्र तेंच हें स्थान अशी ओळख मनाला पटत आहे.' पद्मपुराच्या पूर्वेला सुमारें दीड मैल अंतरावर एक विशाल व सुंदर तलाव दृष्टीस पडतो. याच्या तीनहि बाजूस उंच टेकड्या असून चौथ्या बाजूस बराच उंच व लांब बांध घालून पाणी अडविलें आहे. हा तलावहि प्राचीन असावा. सुमारें तीस वर्षांपूर्वी सरकारने पंधरा हजार रुपये खर्च करून या बांधाची दुरुस्ती केली. सध्या या तलावाचें पाणी आसपासच्या जमीनदाराच्या पाटेकरिता पाटाने नेलें आहे. प्राचीन काळीं पद्मपूर हें राजधानीचें शहर असल्यास या तलावांतून त्याला पिण्याच्या पाण्याचा पुरवठा होत असावा

**आणखी एक प्रमाण**

आमगावाजवळचें सध्याचें पदमपूर हेंच भवभूतीचें जन्मस्थान व एके काळीं वाकाटकाची राजधानी झालेलें पद्मपुर होय हें सिद्ध करण्यास आणखीहि एक प्रमाण देता येईल. भवभूति हा तैत्तिरीय शाखेचा ब्राह्मण होता. वाकाटकाच्या शिवनी येथे सापडलेल्या ताम्रपटानें ब्रह्मपूरक गाव त्याला दान दिलें होतें. तो ब्राह्मणहि तैत्तिरीय शाखेचाच होता व तो गाव वाह्मनी या नावानें पदमपूरच्या ईशान्येस सुमारें सात मैलावर अद्यापि विद्यमान आहे. तेव्हां प्राचीन काळीं या भागात त्या शाखेच्या ब्राह्मणाची वस्ती होती यांत संशय नाही. सध्या पदमपुरास ब्राह्मणवस्ती मुळीच नाही; तथापि पदमपूरच्या आसपास कारंजा, लांजी वगैरे ठिकाणीं अद्यापि तैत्तिरीय शाखेचे तैलंगी ब्राह्मण दृष्टीस पडतात.

वऱ्हाड व मध्यप्रांताचा पश्चिम भाग यावर राज्य करणाऱ्या वाकाटकाची राजधानी त्याच्या राज्याच्या मध्यभागीं नसून पूर्व सरहद्दीजवळ पदमपूरसारख्या ठिकाणीं असावी याचें कदाचित् कोणास आश्चर्य वाटेल. पण वाकाटकानीं प्रवरपुराहून आपली राजधानी हलविली, त्यावेळेची राजकीय परिस्थिति लक्षात घेतल्यास सर्व आश्चर्य वाटणार नाही. वाकाटकाचा समकालीन नळवंशी भवदत्तवर्मा याचा एक ताम्रपट वऱ्हाडात उमरावती जिल्ह्यात ऋद्धपूर येथे सापडला आहे. त्यांत दान दिलेलें कदंबगिरिग्राम हें गाव वऱ्हाडच्या यवतमाळ जिल्ह्यातील कळंब असावें, हें रा. ब. रा. गुप्ते यांनी दाखविलें आहे.* हा ताम्रपट भवदत्तवर्म्यानें नन्दिवर्धनाहून दिला होता. हें नन्दिवर्धन वाकाटकाचें एके काळीं राजधानीचें शहर होतें, हें आम्ही वर दाखविलेंच आहे. तेव्हां भवदत्तवर्म्यानें वाकाटकाच्या राज्याचा पश्चिमेकडचा बराचसा भाग गिळकृत केला होता यांत संशय नाही. या अनुमानाला वाकाटकाच्या कोरीव लेखाचाहि आधार आहे. द्वितीय पृथ्वीषेणाच्या बालाघाट येथे सापडलेल्या अपूर्ण ताम्रपटात त्या राजाचें

* एपिग्राफिया इंडिका, पु. १९ पृ. १००

(पृथ्वीषेणाचें) निमग्नवंशस्योद्धर्ता-'विपत्तींत सापडलेल्या आपल्या वंशाचा उद्धार करणारा' असें वर्णन केलें आहे. त्यावरून वाकाटक वंशाला त्यावेळीं फारच अवनत-दशा आली होती असें दिसतें, व तिचें कारण वर उल्लेखिलेली भवदत्तवर्म्याची स्वारी हेंच असलें पाहिजे. या प्रसंगीं वाकाटकांचे मांडलिकहि त्यास जुमानीतनासे झाले होते. फक्त पूर्वेकडचे कोसल (छत्तीसगढ), मेकल (नर्मदा नदीच्या उगमाजवळचा प्रदेश) व मालव या देशांचे राजे द्वितीय पृथ्वीषेणाचा पिता नरेंद्रसेन याशीं राजनिष्ठ राहिले होते, म्हणून बालाघाटाच्या ताम्रपटात 'कोसल-मेकल-मालवाधिपतिभिरभ्यर्चितशासनः' (कोसल, मेकल व मालव देशांचे अधिपति ज्याची आज्ञा पाळीत असत) असेंच नरेन्द्रसेनाचें वर्णन केलें आहे. विपत्प्रसंगीं पूर्वेकडच्या या राजांचें साहाय्य झाल्यामुळे नरेन्द्रसेनाने कोसल देशालगतच आपली राजधानी नेली असली तर आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. पुढे पृथ्वीषेणाने नळवंशीयास विदर्भांतून हाकून लावलें व त्याची राजधानी पुष्करी उद्ध्वस्त केली असें नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या भवदत्तवर्म्याच्या मुलाच्या शिलालेखावरून दिसतें.* पण त्या इतिहासाशीं सध्या आपणांस काही कर्तव्य नाही.

## उत्खननाची आवश्यकता

येथवर आमगांवाजवळचें पदमपूर हेंच वाकाटकांची एके काळीं राजधानी असलेलें व भवभूतीचें जन्मस्थान पद्मपुर होय, हें सिद्ध करण्यास शक्य तो पुरावा साधार व सविस्तर विद्वानांपुढे मांडला आहे. पदमपुरास अद्यापि उत्खनन झालें नाही. मध्यप्रांत-वऱ्हाडची सांगड दूरच्या पाटणा येथील पुराणवस्तुसंशोधनखात्याच्या मध्यविभागाशीं घातली असल्याने आतापर्यंत या प्रांतांत कोठेहि उत्खनन झालें नाही. पदमपूरला मोठाल्या प्राचीन इमारतींचे अवशेष आहेत याची माहिती सरकारास आज निदान साठ वर्षें तरी आहे. पण या इमारती खेडेगावांत कशा आल्या याचें

* एपिग्राफिया इंडिका, पु. २१ पृ. १५३.

त्यास कोठें पडलें होतें.* तें वरील विवेचनानें उलगडेल व लौकरच पदमपुराला उत्खनन करण्याचें काम पुराणवस्तुसंशोधनखातें हातात घेईल अशी आशा आहे.

पण उत्खनन झालें तरी भवभूतीच्या जन्मस्थानासंबंधी वर मांडला आहे त्यापेक्षा जास्त सबळ पुरावा कधीकाळीं उपलब्ध होईल काय याची शंका आहे. कारण भवभूतीनें आपल्या मालतीमाधवात पद्मावतीच्या आसमंताद्भागाचें जसें सविस्तर वर्णन केलें आहे, तसें पद्मपुरचें कोठेंहि केलें नाही व इतरत्रहि कोठे पद्मपुरचें तसें वर्णन येत नाही. आता खुद्द भवभूतीच्या किंवा त्याच्या ज्ञात असलेल्या पूर्वजांच्या नावाचा ताम्रपट पद्मपुरास उत्खननात मिळाला तर तो यापेक्षा बलवत्तर असा पुरावा होईल यात संशय नाही. पण तसा ताम्रपट मिळणें अशक्य नसलें तरी असंभवनीय आहे. सध्या तरी या पदमपुराखेरीज मध्यप्रांतातील इतर पद्मपुरात असा तऱ्हेचे प्राचीन अवशेष मिळत नाहीत हें खरें. तेव्हा या लेखात मांडलेल्या पुराव्यावरून भंडारा जिल्ह्यातील आमगावाजवळचें पदमपूर हेंच भवभूतीचें जन्मस्थान पद्मपुर होय याविषयी विद्वानांची खात्री पटेल अशी आशा आहे.

---

* Cf. There are some curious old remains of massive stone buildings in the neighbourhood (of Amgaon) at a place called Padampur, but their origin is unknown.—Central Provinces Gazetteer (second edition), p.4.

# भवभूतीच्या नाटकांतील कालप्रियनाथ*

सुप्रसिद्ध वैदर्भ कवि भवभूति यांचीं तीनहि उपलब्ध नाटकें कालप्रियनाथाच्या उत्सवप्रसंगीं प्रथम रंगभूमीवर आलीं, असें त्यांच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. उदाहरणार्थ, त्याचें पहिलें नाटक 'महावीरचरित' याच्या प्रस्तावनेंत सूत्रधार म्हणतो—

भगवतः कालप्रियानाथस्य यात्रायामार्यमिश्राः समादिशन्ति।
(भगवान् कालप्रियानाथाच्या यात्रेमध्ये जमलेल्या सद्गृहस्थांनी मला आज्ञा केली आहे.)

त्यानंतरचें नाटक 'मालतीमाधव' याच्या प्रस्तावनेंत त्याच्या प्रथम प्रयोगाविषयी खालील उल्लेख आहे. सूत्रधार म्हणतो, 'मारिष, सुविहितानि रङ्गमङ्गलानि, सन्निपतितश्च भगवतः कालप्रियनाथस्य यात्राप्रसङ्गेन नानादिगन्तवास्तव्यो महाजनसमाजः। आदिष्टश्चास्मि विद्वज्जनपरिषदा यथा केनचिदपूर्वप्रकरणेन वयं विनोदयितव्या इति।' (मारिषा! रंगभूमीचीं मंगलकृत्यें उत्तम रीतीने पार पडलीं आहेत. भगवान् कालप्रियनाथाच्या यात्रेच्या निमित्ताने भिन्न भिन्न दिशांतील दूर देशांत वास्तव्य करणारे अनेक लोक येथे आले आहेत. तेव्हा विद्वज्जनसभेने मला आज्ञा केली आहे की, एखाद्या नवीन नाटकाने आमचें मनोरंजन करावें)

उत्तररामचरित हें तिसरें नाटकहि कालप्रियनाथाच्या यात्रेमध्ये जमलेल्या लोकांपुढे प्रथम दाखविलें गेलें, असें त्याच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. तेव्हा भवभूतीचीं नाटकें प्रथम राजदरबारी मान्यता

* 'युगवाणी', नागपूर, १९४७, पृ ३६७–३७१.

पावली नसून लोकाश्रयावर प्रसिद्धीस आली व त्याचा प्रथम प्रयोग कालप्रियनाथ नामक देवतेच्या यात्रेच्या प्रसंगी झाला, हें स्पष्ट आहे. हें कालप्रियनाथाचें देवालय फार प्रसिद्ध असून त्याच्या यात्रेकरिता हिंदुस्थानातील दूरदूरच्या भागातून लोक येत असत, असें 'मालतीमाधवा' तील वर्णनावरून दिसतें. हें कालप्रियनाथाचें देवालय कोठें होतें, हें ठरविण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखात केला आहे.

प्रथम याविषयी संस्कृत टीकाकार काय म्हणतात, तें पाहू. या देवाचें नाव 'कालप्रियानाथ' व 'कालप्रियनाथ' असें दोन प्रकारें आढळतें. दुसऱ्या नांवातहि मूळचें रूप 'कालप्रियानाथ' असेंच असून नंतर 'ङ्यापोः संज्ञाछन्दसोर्बहुलम्*' या पाणिनीच्या सूत्रानुसार 'कालप्रिया' याचें 'कालप्रिय' असें रूप झालें, असें एका टीकाकाराने म्हटलें आहे पुढे तो म्हणतो, कालप्रिया म्हणजे अम्बिका व तिचा नाथ म्हणजे शंकर. या स्पष्टीकरणात 'भवानीपतिः' या नावातल्याप्रमाणे 'विरुद्धमतिकृत्' हा दोष येतो (काव्यप्रकाश, उल्लास ७) ही गोष्ट वेगळी. कालप्रियनाथाचें देवालय कोठें होतें,- याविषयी टीकाकारांनी विशेष काही लिहिलें नाही. 'त्या क्षेत्रातील हें दैवत होतें,' 'कालप्रिया नावाची देवता तेथे होती, तिची कथा पुराणात पाहावी' इत्यादि उडवाउडवीचीं विधानें करून त्यांनी वेळ मारून नेली आहे. रामचंद्रबुधेन्द्र नामक एका टीकाकाराने मात्र कालप्रियनाथ हा विदर्भातील पद्मनगरात स्थापलेला देव होता व त्याच्या उत्सवप्रसंगीं हें 'मालतीमाधव' नाटक प्रथम दाखविलें गेलें, असें म्हटलें आहे. पण त्याच्या म्हणण्याला काही आधार दिसत नाही. भवभूति हा स्वतः विदर्भातील पद्मपुरचा राहणारा. त्याचे पूर्वजहि तेथे पाच सहा पिढ्या वास्तव्य केलेले. त्या नगरात त्याच्या नाटकाचे प्रथम प्रयोग झाले असते, तर त्याने त्यामध्ये आपले पूर्वज व स्वतःची विद्वत्ता याविषयी जी सविस्तर माहिती दिली

* वेदात व विशेषनामात समासाच्या पहिल्या अवयवाच्या स्त्रीलिंगवाचक ई व आ या प्रत्ययाचा स्वर पुष्कळदा ऱ्हस्व होतो. उदाहरणार्थ 'कालिदास.'

आहे, ती देण्याची त्याला आवश्यकता वाटली ना. शिवाय विदर्भांत कालप्रियनाथ या नावाचें विख्यात क्षेत्र होतें, असा इतरत्र कोठेंहि उल्लेख नाही. तेव्हां हें कालप्रियनाथाचें देवालय विदर्भापासून दूर अंतरावर असावें व त्या ठिकाणीं भवभूतीविषयीं लोकांस माहिती नसल्यामुळे त्याला ती आपल्या नाटकाच्या प्रस्तावनेंत देणें आवश्यक वाटलें असावें, असें अनुमान करण्यास हरकत नाही.

भवभूतीच्या नाटकाचे आधुनिक टिप्पणीकार कालप्रियनाथ हा उज्जयिनीचा 'महाकाल' होय, असें म्हणतात. उज्जयिनी हें फार पुरातन काळापासून क्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. तेथील महाकालाची द्वादश ज्योतिर्लिंगांत गणना होते व भवभूतीच्या पूर्वीच्या कालिदासादि संस्कृत कवींनी त्याचें सुंदर वर्णन केलें आहे. शिवाय कालिदासाप्रमाणे भवभूतिहि शिवोपासक होता, असा समज आहे. तेव्हां त्याचीं नाटकें महाकालाच्या यात्रेच्या प्रसंगीं प्रथम रंगभूमीवर आलीं असलीं तरी त्यांत आश्चर्य नाही या कारणामुळे कालप्रियनाथ म्हणजे उज्जयिनीचा महाकालेश्वर हें मत आतापर्यंत विद्वन्मान्य झालें आहे.

पण हें मत बरोबर आहे, असें वाटत नाही. महाकालाचा उल्लेख व वर्णन अनेक संस्कृत ग्रंथांत व पुराणांत आढळतें खरें, पण त्यांमध्ये कोठेंहि त्याचें कालप्रियनाथ असें नांव दिसत नाही. शिवाय भवभूति हा शिवोपासक होता, असेंहि दिसत नाही. तसें असतें, तर कालिदासाने आपल्या सर्व नाटकांच्या आरंभीं शिवस्तुतिपर नान्दी घातली आहे, तसा प्रकार भवभूतीच्या नाटकांतहि दिसला असता. पण भवभूतीने फक्त 'मालतीमाधवां'त आरंभीं गणपतीच्या विनोदमय वर्णनानंतर शिवस्तुतिपर श्लोक घातला आहे. 'महावीरचरिता'च्या नान्दींत स्वयंभू नित्य चैतन्य ज्योतीला म्हणजे ब्रह्माला व 'उत्तररामचरिता'त पूर्वसूरींना नमन केलें आहे व तें त्याच्या वेदान्ती मताला अनुरूप असेंच आहे. 'मालतीमाधवा'च्या प्रस्तावनेंत

> यद्वेदाध्ययनं तथोपनिषदां सांख्यस्य योगस्य च
> ज्ञानं तत्कथनेन किं न हि ततः कश्चिद्गुणो नाटके ।

—इत्यादि श्लोकांत आपण वेद, उपनिषदें, सांख्य, योग इत्यादिकांचें अध्ययन केलें होतें, असें त्यानें स्वतःच सांगितलें आहे. तेव्हां त्याचीं धार्मिक मतें उदार झालीं होतीं व सर्व देवतांत एकच महातत्त्व वास करतें, हें मत त्याला मान्य झालें होतें, यांत संशय नाहीं. अर्थात् 'तो शैव होता व कालप्रियनाथाच्या यात्रेच्या प्रसंगीं त्याच्या नाटकांचे प्रयोग झाले, म्हणून कालप्रियनाथ हा उज्जयिनीचा महाकालच असावा,' असें म्हणतां येत नाहीं.

तर मग कालप्रियनाथ कोण व त्याचें देवालय कोठें होतें, असा प्रश्न उपस्थित होतो. यासंबंधीं प्रस्तुत लेखकाच्या अलीकडील संशोधनावरून उपलब्ध झालेली माहिती पुढें दिली आहे.

भविष्यपुराण, वराहपुराण, स्कन्दपुराण इत्यादि पुराणांत कृष्णपुत्र साम्बाची कथा आली आहे. साम्बावर कृष्णाच्या अनेक स्त्रिया अनुरक्त झाल्या होत्या, असें नारदानें कृष्णाला सांगितल्यावर त्यानें त्यासंबंधीं चौकशी करून सांबाला तू कुष्ठी होशील असा शाप दिला. नंतर सांबानें भगवान् सूर्याची आराधना मूलस्थान येथें केल्यावर तो त्या रोगांतून मुक्त झाला. पुढें सूर्यानें त्याला वर देऊन लवकरच तुला माझी प्रतिमा मिळेल, तिची स्थापना कर असें सांगितलें. नंतर नेहमीप्रमाणें प्रातःकाळीं तो चन्द्रभागा नदीस स्नानार्थ गेला असतां सूर्याची तेजस्वी मूर्ति वाहात आलेली त्याला दिसली. तेव्हां त्याला सूर्यदेवाच्या सांगण्याची सत्यता पटून त्यानें ती मूर्ति प्रवाहांतून काढून घेतली व तेथील मित्रवनामध्यें स्थापिली. नंतर त्यानें त्याच मूर्तीला 'आपली ही सुंदर आकृति कोणी बनविली' असें विचारलें. त्यावर सूर्यानें सांगितलें कीं, 'विश्वकर्म्यानें हिमालयावर कल्पवृक्षांतून ही मूर्ति निर्माण केली व तुझ्याकरितां चंद्रभागेमध्यें सोडली. हे सांबा, या रम्य ठिकाणीं माझें सान्निध्य नेहमीं राहील' पुढें भगवान सूर्य म्हणाले, 'सान्निध्यं मम पूर्वाह्णे सुतीरे द्रक्ष्यते जनः । कालप्रिये च मध्याह्नेऽपराह्णे चात्र नित्यशः ॥ लोकांना माझें सान्निध्य पूर्वाह्णीं सुतीर येथें, व मध्याह्नीं कालप्रिय येथें व सायंकाळीं येथें म्हणजे चंद्रभागातीरीं मूलस्थान या ठिकाणीं नेहमी

पाहावयास मिळेल. काही ठिकाणीं 'मुंडीरें' याच्या ऐवजी 'मुंडीरें' असाहि पाठ आहे. हीं तीन स्थानें कोठे होतीं, याविषयी वराहपुराणात (अध्याय १७८, श्लोक ५५–५७) खालील वर्णन आढळतें.

> साम्बः सूर्यप्रतिष्ठां च कारयामास तत्त्ववित् ।
> उदयाचले च संश्रित्य यमुनायाश्च दक्षिणे ॥
> मध्ये कालप्रियं देवं मध्याह्ने स्थाप्य चोत्तमम् ।
> मूलस्थानं ततः पश्चाद् अस्तमानाचले रविम् ॥
> स्थाप्य त्रिमूर्तिं साम्बस्तु प्रातर्मध्यापराह्णिकम् ॥

इत्यादि. या श्लोकात साम्बाने सूर्यमूर्तीची स्थापना उदयाचलावर, म्हणजे पूर्व दिशेच्या पर्वतावर, यमुनेच्या दक्षिणेस कालप्रिय येथे व अस्तमानाचलीं किंवा पश्चिमपर्वतावर मूलस्थान येथे अशा तीन ठिकाणीं केल्याचा निर्देश आहे यापैकी पहिल्या स्थानाचा उल्लेख गंगासागरसंगम असाहि काही ठिकाणी केलेला आढळतो. काही ठिकाणीं त्याला सूर्यकानन, रविक्षेत्र किंवा सूर्यक्षेत्र म्हटलें आहे. ब्रह्मपुराणात उत्कल देशातील कोणादित्य किंवा कोणार्क यालाहि रविक्षेत्र असें नाव दिलें आहे कोणार्क हें पूर्वतीरावर बांधलेल्या अत्यंत भव्य अशा सूर्यमंदिराचें नाव आहे. हें देवालय पुरीपासून सुमारें तीस मैलावर आहे. तें ओरिसा (प्राचीन उत्कल) देशाच्या गङ्गवंशी पहिल्या नरसिंह राजाने इ. स. च्या तेराव्या शतकात बांधलें असून हिंदुस्थानातील प्राचीन काळच्या प्रेक्षणीय स्मारकात त्याची गणना होते. पुराणवस्तुसंशोधनखात्याचे माजी डायरेक्टर जनरल सर जॉन मार्शल यानी एके ठिकाणीं म्हटलें आहे की, 'जर कोणी मला हिंदुस्थानातील प्राचीन काळचीं प्रेक्षणीय स्मारकें कोणतीं असा प्रश्न केला, तर आग्र्याचा ताजमहाल, कोणार्क येथील सूर्याचें देवालय, वेरूळ येथील कैलासनामक लेणें, अजंठ्याचीं चित्रें असलेलीं लेणीं व सांचीचे स्तूप–इतक्याचा निर्देश मी निःसंशय करीन.' यावरूनहि कोणार्कच्या श्यामप्रस्तरनिर्मित देवालयाचें (Black Pagoda) महत्त्व ध्यानात येईल. हें देवालय समुद्रकाठीं वालुकामय प्रदेशात बांधलें आहे. समुद्रावरच्या क्षारमिश्रित

वायूने त्याच्या शिलाखंडावर परिणाम होऊन ते खडबडीत होतात. म्हणून पुराणवस्तुसंशोधनखातें तें देऊळ गोड्या पाण्याने धुण्यात दरवर्षी पुष्कळ खर्च करतें. आठ वर्षांपूर्वी कलकत्त्यास अखिल-भारतीय इतिहास परिषदेला आम्ही गेलों होतों, त्यावेळीं हें कोणार्काचें देऊळ पाहिलें. आम्ही तेथे गेलों त्यावेळीं हें धुण्याचें काम चालू होतें अशा ठिकाणीं हें अत्यंत भव्य देवालय बांधण्याचें कारण तें स्थान प्राचीन काळापासून सूर्यक्षेत्र म्हणून प्रसिद्ध होतें हें होय.

पश्चिमेकडील मूलस्थान हें सध्याचें मुलतान होय मुलतान चन्द्रभागा (सध्याच्या चिनाब) नदीवर वसलें आहे या ठिकाणीं एका टेकडीवर सूर्याचें सुप्रसिद्ध देवालय होतें अरब इतिहासकारांनी या देवळाचें व त्यातील मूर्तीचें वर्णन केलें आहे त्यावरून त्यातील सूर्याची प्रतिमा लाकडाची होती* व तिच्या डोळ्यांच्या ठिकाणीं दोन माणकें बसविलीं होतीं, असें दिसतें मागे भविष्यपुराणातील या मूर्तीचें वर्णन दिलें आहे, त्यातही मूर्ति चन्द्रभागा नदीच्या प्रवाहांतून वाहत आली, असें म्हटलें आहे त्यावरून पुरींतील जगन्नाथाच्या मूर्तीप्रमाणे मूलस्थानमध्येही लाकडी मूर्तीची पूजा होत असे, असें दिसतें

मूलस्थानच्या सूर्याच्या यात्रेला सिंधमधून व हिंदुस्थानांतील दूरदूरच्या प्रदेशांतून लोक जमत असत, असें अरब इतिहासकार सांगतात त्यामुळे तेथील देवस्थानाला मोठें उत्पन्न होई. महम्मद कासीमनें मुलतान काबीज केलें, तेव्हा त्याला या देवळांत तेरा हजार दोनशें मण सोनें मिळालें, असें 'चचनामा' ग्रंथांत वर्णन आहे अरब हे मूर्तिभंजक होते, तथापि या ठिकाणच्या यात्रेच्या उत्पन्नाच्या लोभानें त्यांना ही मूर्ति भग्न केली नाही व तिची पूजा पूर्वीप्रमाणे चालू दिली. त्याकाळीं कनोजचे प्रतिहार हे उत्तर हिंदुस्थानात अत्यंत प्रबळ होते. त्यांनी व इतर राजांनी मुलतानचें पवित्र क्षेत्र मुसलमानांच्या ताब्यांतून सोडविण्याचा अनेकदा प्रयत्न केला. पण जेव्हा जेव्हा मुसलमानांस

* 'चचनाम्या'त ही मूर्ति सोन्याची होती असं म्हटलें आहे

त्याच्याशीं सामना करणें कठीण वाटे तेव्हा तेव्हा ते ही सूर्याची मूर्ति भग्न करण्याचा घाक घालीत आणि हिंदु लागलीच माघार घेत, असें अरब इतिहासकार अल् मसूदी याने लिहून ठेवलें आहे.

मुलीर किंवा कोणार्क, आणि मूलस्थान किंवा मुलतान, येथे सूर्याचीं सुप्रसिद्ध देवालयें होतीं व तेथे दूरदूरचे लोक यात्रेच्या निमित्ताने जमत असत हें आपण पाहिलें. काल्प्रियाच्या बाबतींतहि तशीच स्थिति होती असें मानण्यास हरकत नाही वरील दोन क्षेत्रें हिंदुस्थानच्या पूर्व व पश्चिम टोंकाना होतीं, तर काल्प्रिय हें त्याच्या मध्यभागी होतें व म्हणून त्या ठिकाणीं सूर्याचें सान्निध्य मध्याह्नी असे, असें पुराणात म्हटलें आहे. काल्प्रिय हें कनोजच्या दक्षिणेस होतें, असें राजशेखराच्या काव्यमीमांसे-वरून दिसतें. राजशेखर म्हणतो, 'अनियतत्वाद्दिशामनिश्चितो दिग्विभाग इत्येके। तथाहि यो गाधिपुरस्य दक्षिणः स काल्प्रियस्य उत्तरः।' यावरून गाधिपुर किंवा कनोज व काल्प्रिय यामध्ये फारसें अंतर नसावें, असें दिसतें. काल्प्रिय हें यमुनेच्या काठीं होतें, हें आपण मागे पाहिलेंच आहे. तेव्हा काल्प्रिय हें सध्याचें यमुनेच्या काठचें काल्पी असावें, असें वाटतें.*
काल्प्रिय व काल्पी यातील नामसादृश्यहि ध्यानात घेण्यासारखें आहे. सध्याच्या काल्पी शहराच्या बाहेर पश्चिमेच्या बाजूस अद्यापि जुने अव-शेष दिसतात. तेथील जुन्या पडक्या इमारतींच्या अवशेषाना चौऱ्याशी घुमट अशी संज्ञा आहे. काल्पी येथे अद्यापि उत्खनन झालें नाही.

काल्प्रिय हें यमुनेच्या काठीं असून तेथे एक विस्तृत आवार असलेलें भव्य देवालय होतें, हें कोरीव लेखावरुनहि दाखविता येतें. इ. स. च्या दहाव्या शतकाच्या आरंभीं दक्षिणेंत मान्यखेट ( सध्याचें

* काल्प्रिय हें काल्पी असावें असें अनुमान प्रथम कै माधव व्यंकटेश लेले यानी आपल्या 'माल्तीमाधव सार व विचार' (पृ. ९८) या लेखात केले होतें. पण 'तूर्त या अनुमानाला शब्दसादृश्यावाचून दुसरा आधार नाहीं', असें त्यानीच म्हटले आहे. त्याच्या बरोबरच 'विदर्भदेश म्हणजे ( ग्वाल्हेर संस्थानातील ) नरवारच्या आसपास [illegible] प्रदेश होय.' असेंहि चमत्कारिक विधान त्यानी केलें आहे।

निजामच्या राज्यातील मालखेड ) येथे राष्ट्रकूटवंशी महाप्रतापी राजा तृतीय इन्द्र हा राज्य करीत होता. हा इ. स. ९१५ मध्ये-गादीवर आला त्यानंतर लौकरच त्याने उत्तरेंत कनोजच्या प्रतिहार राजाच्या मुलखावर स्वारी केली व कनोजपर्यंत चाल करून तें राजधानीचें शहर उध्वस्त केलें. या स्वारींत त्याला वाटेंत कालप्रिय येथे देवळाच्या परिसरात आपल्या सेनेसह काही काळ थांबावें लागलें व नंतर त्याने यमुना पार केली, याचें सुंदर वर्णन खालील श्लोकात केलें आहे. हा श्लोक त्याचा मुलगा चतुर्थ गोविंद याच्या खंबायत व सांगली या ठिकाणीं सापडलेल्या दोन्ही ताम्रपटात आला आहे

> यन्माद्यद्द्विपदन्तघातविषमं कालप्रियप्राङ्गणं
> तीर्णा यत्तुरगैरगाधयमुना सिन्धुप्रतिस्पर्धिनी ।
> येनेदं हि महोदयारिनगरं निर्मूलमुन्मूलितं
> नाम्नाद्यापि जनैः कुशस्थलमिति ख्यातिं परां नीयते ॥

भावार्थ—तृतीय इन्द्राच्या मदोन्मत्त हत्तींच्या दंतांच्या आघातानें कालप्रियाचें प्राङ्गण उचखळ झालें, त्याच्या घोड्यांनी सागराशीं विशालत्वात स्पर्धा करणारी यमुना नदी पोहून पार केली. त्याने समूळ उध्वस्त केल्यामुळे ही महोदय ( कनोज ) नामक शत्रूची राजधानी अद्यापि कुशस्थल या नावाने प्रसिद्ध झाली आहे ( पूर्वीच्या सुसमृद्ध शहरात सध्या गवत उगवलें आहे असा अर्थ )

या श्लोकावरून कालप्रिय देवाचें अंगण अत्यंत विस्तृत होतें-इतकें की, त्यामध्ये हत्ती, घोडे, पायदळ इत्यादि इंद्र नृपतीची चतुरंग सेना सामावली. तें शहर यमुनेच्या काठीं होतें. कारण त्यानंतर इंद्र-राजाला यमुना पार करून कनोजवर चाल करता आली-इत्यादि माहिती मिळते. इंद्राजाच्या दरबारच्या कवींनी आपल्या प्रभूच्या उत्तर हिंदुस्थानातील स्वारीच्या वर्णनात दुसऱ्या कोणत्याहि शहराचा उल्लेख केला नाही. कालप्रियाचा उल्लेख करण्याचें कारण तेथील देवालयामुळे त्याला भरतखंडभर प्रसिद्धि प्राप्त झाली होती व तेथून विशाल यमुनेचें पात्र ओलांडल्यावर लौकरच इंद्राला कनोजवर हल्ला करता आला, हें

असावें हें उघड आहे. सध्याचें काल्पी हें मान्यखेट ( मालखेड ) पासून कन्नोजला जाणाऱ्या प्राचीन मार्गावर आहे. काल्पीहून कन्नोज उत्तरेस सुमारें ७५ मैलावर आहे. कालप्रिय येथील देवालयात कोणत्या देवतेची स्थापना केली होती, याचा या कोरीव लेखात उल्लेख नाही. पण त्या शहराचें बारीकें वर्णन राजशेखराची काव्यमीमांसा व भविष्य, वराह, साम्ब इत्यादि पुराणें यातील वर्णनाला धरूनच आहेत, हें दिसून येईल.

तेव्हा कालप्रिय (सध्याची काल्पी) येथे सर्व भरतखंडात सुविख्यात झालेलें असें सूर्याचें विशाल देवालय होतें, तेथे यात्रेच्या निमित्तानें दूरदूरच्या प्रदेशातून लोक येत व त्या यात्रेच्या प्रसंगीं भवभूतीचीं नाटकें प्रथम रंगभूमीवर आलीं हें स्पष्ट होईल. ही माहिती ध्यानात घेतली असता भवभूतीने मालतीमाधवात सूर्यस्तुतिपर खालील श्लोक का घातला, याचें स्वारस्य ध्यानात येईल. सूत्रधार म्हणतो—

> कल्याणानां त्वमसि महसां भाजनं विश्वमूर्ते
> धुर्यां लक्ष्मीमथ मयि भृशं धेहि देव प्रसीद।
> यद्यत्पापं प्रतिजहि जगन्नाथ नम्रस्य तन्मे
> भद्रं भद्रं वितर भगवन्भूयसे मङ्गलाय ॥

[ भावार्थ—हे विश्वमूर्ते ! तू मंगल अशा तेजाचा निधि आहेस. मजवर कृपा करून वरिष्ठ अशी समृद्धि मला दे. मी तुजपुढे नम्र झालों आहें. माझीं सर्व पापें नष्ट करून मङ्गलप्राप्तीकरिता सर्व कल्याणप्रद वस्तु प्राप्त करून दे. ]

कालप्रिय येथे भवभूतीच्या नाटकाचे प्रयोग झाल्यावर लौकरच त्याची कीर्ति कन्नोजचा सम्राट् यशोवर्मा याच्या कानावर गेली व नंतर त्याने त्याला सन्मानाने बोलावून आपल्या दरबारी ठेवून घेतलें, असें कल्हणाची राजतरंगिणी व वाक्पतिराजाचें गउडवहो, या ग्रंथावरून दिसतें.

वरील विवेचनावरून भवभूतीच्या नाटकात उल्लेखिलेलें कालप्रियनाथाचें देवालय हें सूर्याचें असून तें उज्जयिनीस नव्हतें, तर यमुनेच्या काठीं काल्पीस होतें, हें दिसून येईल.

# 'गाथासप्तशती'चा काळ*

अविनाशिनमग्राम्यमकरोत्सातवाहनः ।
विशुद्धजातिभिः कोशं रत्नैरिव सुभाषितैः ॥

[एखादा राजा अत्यंत शुद्ध जातीच्या रत्नांनी खेडेगावांत न होणारा असा अक्षय्य निधि करतो, त्याप्रमाणे सातवाहन राजाने अत्यंत निर्दोष अशा व जातिछंदांत रचलेल्या सुभाषितांनी अविनाशी व सोज्वळ असा कोश रचला.]

प्राकृत वाङ्मयात 'गाथासप्तशती' किंवा 'सत्तसई' हें काव्य फार प्राचीन गणलें जातें या ग्रंथात सातशें प्राकृत गाथांचा संग्रह आहे. याचा कर्ता हाल किंवा सातवाहन होता, अशी प्रचलित समजूत आहे. पुराणात तीस (काही पाठांत एकतीस) आन्ध्र राजांची वंशावळ काल-निर्देशासह आली आहे, तिजमध्ये हालाचें नाव आहे. तेव्हा हाल हा आन्ध्र राजवंशातील असावा असें मानतात. पुराणातील निर्देशावरून आन्ध्रांनी सुमारें साडेचारशें वर्षें राज्य केलें असें दिसतें. हा काळ खरा असल्यास, सुमारें खिस्तपूर्व २०० पासून खिस्तोत्तर २५० पर्यंत आन्ध्रांनी दक्षिणेंत राज्य केलें असावें. कारण आन्ध्रांनंतर आभीर राजे उदयास आले, असें पुराणें सांगतात. आभीरांनी आपला स्वतंत्र शक चालू केला होता. त्याचा आरंभ इ. स. २५० च्या सुमारास होतो. तत्पूर्वी साडेचारशें वर्षे आन्ध्रांनी राज्य केलें असल्यास त्यांचा उदय खिस्तपूर्व २०० च्या सुमारास झाला असला पाहिजे, हें उघड आहे.

पुराणांच्या वंशावळींत हालाचें नांव सतरावें आहे. पुराणांत प्रत्येक राजाच्या कारकीर्दीचीं वर्षें दिलीं आहेत. त्या बाबतींत सर्व

* 'युगवाणी', नागपूर, मार्च, १९४६.

पुराणाची एकवाक्यता नाही. तथापि त्यातल्या त्यात उत्तम असे पाठ घेऊन गणना केली, तर हाल हा आन्ध्र साम्राज्य स्थापनेनंतर २८१ वर्षांनी*—म्हणजे खिस्तोत्तर ८१ वर्षांच्या सुमारास—गादीवर आला, असें दिसतें. त्यानें फक्त पाच वर्षे राज्य केलें, असें पुराणात म्हटलें आहे.

तेव्हा गाथासप्तशती इ. स. च्या पहिल्या शतकात झाली असावी. काही विद्वान् संशोधक, आन्ध्राचा उदय काण्व राज्याच्या नंतर खिस्तपूर्व पहिल्या शतकात झाला, असें मानतात. राजाच्या कारकीर्दीच्या वर्षांतहि काही मतभेद आहेत. त्यामुळे काहींच्या मतें हाल हा इ. स. च्या दुसऱ्या शतकात होऊन गेला असावा.

गाथासप्तशतींत अनेक महत्त्वाचे उल्लेख आले आहेत. मंगळवाराचा अनिष्ट वार म्हणून उल्लेख, विक्रमादित्याच्या दातृत्वाचें वर्णन, राधाकृष्ण व कृष्णगोपी यांच्या लीला, गजाननाचा पराक्रम इत्यादिकांचें वर्णन सप्तशतींत आलें असल्यामुळे व तिचा काळ सामान्यतः निश्चित असल्यामुळे यादप्रस्त विषयाच्या विवेचनात सप्तशतींतील गाथांचा पुरावा कालनिर्णयार्थ दिला जातो; व अमुक एका देवतेचा, व्यक्तीचा किंवा प्रसंगाचा उल्लेख सप्तशतींत आला आहे, तेव्हा ती देवता व व्यक्ति किंवा तो प्रसंग इ. स. च्या पहिल्या-दुसऱ्या शतकापूर्वी लोकप्रसिद्ध होता, असें अनुमान करण्यात येतें. उदाहरणार्थ, अलीकडे विक्रमद्विसहस्राब्दी महोत्सवाच्या प्रसंगानें लिहिलेल्या लेखात 'संवाहण-सुहरसतोसिएण—' इत्यादि ४६४ व्या गाथेंत† वर्णन केलेला विक्रमादित्याच्या दातृत्वाचा उल्लेख अनेक लेखकांनी केला होता. व त्यावरून

---

* पार्जिटरकृत कलियुगातील राजवंश (इंग्रजी), पृ. ३८-४१ पाहा.

† गाथांच्या पाठात व अनुक्रमात हस्तलिखित प्रतींत, निर्णयसागराच्या आवृत्तींत व श्री. जगदीशलाल यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या आवृत्तीत पुष्कळ फरक आढळतो. निर्णयसागरप्रत सर्वांस सहज उपलब्ध असल्यानें प्रस्तुत लेखात उल्लेखिलेल्या गाथांचे अनुक्रमांक त्या आवृत्तीप्रमाणे दिले आहेत.

'कालिदासाचा आश्रयदाता सुप्रसिद्ध विक्रमादित्य नृपति हा इ. स. च्या पहिल्या दुसऱ्या शतकापूर्वी होऊन गेला असला पाहिजे; त्यानेच खिस्तपूर्व ५८ व्या वर्षी आपल्या नांवें सवत्सर सुरू केला; तो विक्रमादित्य खिस्तोत्तर चौथ्या शतकांत होऊन गेलेला विख्यात गुप्तसम्राट् द्वितीय चन्द्रगुप्त असणें शक्य नाही' इत्यादि अनुमानें काढलीं होतीं. तसेंच, गजानन ही देवता किती जुनी आहे, याविषयी मागे 'सरस्वतीमंदिर' व 'विविधज्ञानविस्तार' या मासिकांत वादविवाद झाला होता, त्यातहि सप्तशतीच्या ४०३ या गाथेंतील गजाननाच्या वर्णनाचा निर्देश करून 'गजानन ही देवता निदान पधरावें ते अठरावें वर्षांइतकी जुनी आहे' असें प्रतिपादण्यांत आलें होतें. या विवेचनाच्या प्रसगानें विद्याभूषण पं. कृष्णशास्त्री घुले यानी 'वागीश्वरी' मासिकाच्या पहिल्या वर्षाच्या प्रथमांकात गाथासप्तशतीच्या कालासबधानें एक विद्वत्तामधुर लेख लिहिला होता. त्यात त्यानी सप्तशतीचा कर्ता हाल हा राजा नसून गोदावरीतीरींचा एक गरीब खेडवळ ब्राह्मण होता आणि तिच्यांत आलेल्या अनेक उल्लेखांवरून तिचा काळ सहाव्या शतकापूर्वी जाऊ शकत नाही, असें प्रतिपादिलें होतें. पुढे घुले शास्त्र्यांच्या प्रमाणांचें परीक्षण नागपूर येथील विद्वान् संशोधक श्री. अप्रबुद्ध यानी 'वागीश्वरी'च्या तिसऱ्या वर्षाच्या पहिल्या अंकात सविस्तर व निर्भीडपणें करून 'सप्तशतीच्या गाथाना बेधडक दुसऱ्या शतकांत ठेवता येईल', असा आपला सिद्धांत मांडला होता व त्याला प. घुले शास्त्र्यांचें उत्तर त्याच मासिकाच्या त्या वर्षाच्या सहाव्या अंकात आलें होतें हा वाद मूळ गजानन ही देवता किती जुनी आहे, या प्रश्नाच्या निमित्तानें झाला होता. त्या प्रश्नाशीं सध्या आपणास काही कर्तव्य नाही. तथापि अशा वादग्रस्त प्रश्नाच्या निर्णयार्थ सप्तशतींतील गाथांचा पुरावा दिला जातो, तेव्हा सप्तशतीचा काळ निश्चित करता आल्यास त्या व तत्सम इतर प्रश्नाच्या निर्णयास मदत होईल, असें वाटून त्याचें विवेचन प्रस्तुत लेखात केलें आहे

गाथासप्तशती किंवा सत्तसई या प्राकृत ग्रथाचा कर्ता हाल होता, ही गोष्ट सर्वांस मान्य आहे या ग्रथाच्या तिसऱ्या गाथेंत कविवत्सल

हालाने एक कोटी गाथांमधून सातशें गाथा निवडून काढून रचल्या,- असें म्हटलें आहे. या गाथेंत 'विरइआइं'* (विरचितानि) या पदाचा उपयोग केला असला, तरी या सर्व गाथा हालाने स्वतः रचल्या नसून, त्या त्याने अनेक गाथांतून निवडून ग्रथित केल्या, हें या गाथेंतील वर्णनावरूनच स्पष्ट आहे. या ग्रंथावर झालेल्या तेरा टीका सध्या उपलब्ध आहेत. त्यांत कित्येक गाथांच्या संबंधांत तत्कर्त्या कवींचीं नांवें आलीं आहेत. आरंभीं प्रत्येक गाथेशीं तिच्या कर्त्याचें नांव सलग्न होतें, असें दिसतें. पण कालांतराने त्यांतील काहीं नांवें लुप्त झालीं व काहींच्या बाबतींत घोटाळा झालेला दिसतो. शिवाय हस्तलिखित प्रतींवरून या ग्रंथाचे निदान सहा पाठ झाले आहेत, असें दिसतें. सर्व पाठांत ४३० गाथाच समान आहेत. बाकीच्या फक्त काहीं पाठांतच दिसतात. हाल हा राजा होता, असें सप्तशतींत कोठें म्हटलें नाहीं खरें, पण तशी परंपरागत समजूत होती, यांत संशय नाहीं. कारण संस्कृत व प्राकृत कवींनी त्याच्या स्तुतिपर जे अनेक श्लोक केले, त्यांत तसा उल्लेख आहे. उदाहरणार्थ, सोड्ढलाच्या 'उदयसुन्दरी'तील खालील श्लोक पाहा—

हाले गते गुणिनि शोकभरान्द्मूकुब्जिशयाळयजडाः कृतिनस्तयामी।
यत्तस्य नाम नृपतेरनिशं स्मरन्तो हेत्यक्षर प्रथममेव परं विदन्ति ॥

यांत हाल हा नृपति होता, असें स्पष्ट म्हटलें आहे. हालाचा कवींना उदार आश्रय होता. कवींचा सुभाषितसंग्रह प्रकाशांत यावा म्हणून त्याने आपला कोश भरला होता, असें अभिनन्द कवीने स्वतःच्या आश्रयदात्या हारवर्ष राजाची स्तुति करतांना म्हटलें आहे.

नमः श्रीहारवर्षाय येन हालादनन्तरम्।
स्वकोषः कविकोषाणामाविर्भावाय संभृतः ॥

या कवींमध्ये,श्रीपालित नावाचा कवि प्रमुख होता व तो हालाच्या दरबारीं राजकवि होता, असें दिसतें. कारण अभिनन्द कवि म्हणतो—

---

* सत्त सताइं कइवच्छलेण कोडीअ मज्झआरम्मि ।
हालेण विरइआइं सालवाहण णाहाणं ॥

हालेनोत्तमपूजया कविवृषः श्रीपालितो लालितः
ख्यातिं कामपि कालिदासकृतयो नीताः शकारातिना।
श्रीहर्षो वितार गद्यकवये बाणाय वाणीफलं
सद्यः सत्क्रिययाभिनन्दमपि च श्रीहारवर्षोऽग्रहीत् ॥

त्यात वर्णिलेल्या शकारि, विक्रमादित्य, श्रीहर्ष व हारवर्ष या राजाप्रमाणे हाल हाहि राजा होता, यात संशय नाही. पालित कवीच्या काही गाथा *सप्तशतीत येतलेल्या आढळतात. त्याने हालनृपतीस गाथांचा संग्रह व* निवड करण्यास मदत केली असावी. हा हाल राजा गोदावरी तीरीं प्रतिष्ठान येथे राज्य करीत होता, हें 'वज्जालग्गम्' नामक एका प्राकृत ग्रंथातील खालील गाथेवरून दिसून येईल.

पुरिसविसेसेण सइत्तणाइं न कुलक्कमेण महिलाणं।
सग्गं गए वि हाले न मुयइ गोला पइट्ठाणं ॥

वज्जालग्गम्, ४६८

[उत्तम पुरुषाच्या संगतीमुळे स्त्रिया सती होतात; केवळ कुलक्रमामुळे नव्हे. कारण हाल स्वर्गाला गेला, तरी गोदावरी काही प्रतिष्ठान (पैठण) नगर सोडत नाही.] या हालाचेंच सातवाहन (प्राकृत सालाहण) असें दुसरें नाव होतें, असें हेमचन्द्राने आपल्या कोषात सांगितलें आहे. 'हालः सातवाहनपार्थिवे' (हेमकोष) व 'सालाहणम्मि हालो' (*देशीनाममाला*) हीं वचनें पाहा. बाणाने *आपल्या हर्षचरिताच्या* आरंभीं एका श्लोकात सातवाहनाच्या सुभाषितसंग्रहाची स्तुति केली आहे. तो श्लोक प्रस्तुत लेखाच्या आरंभीं दिला आहे. हा सुभाषितसंग्रह म्हणजे गाथासप्तशतीच होय असें समजलें जातें. प्रसिद्ध संस्कृत कवि राजशेखर याने प्राचीन संस्कृत व प्राकृत कवींच्या स्तुतिपर अनेक श्लोक रचले होते. त्यांमध्ये सातवाहनाविषयी पुढील श्लोक आला आहे.

जगत्यां प्रथिता गाथाः सातवाहनभूभुजा।
व्यधुर्धृतेस्तु विस्तारमहो चित्रपरम्परा ॥

(या जगात सातवाहनाने गाथा अनेक ठिकाणाहून जमवून एकत्रित केल्या; पण त्यायोगें लोकाचा आनंद संकुचित न होता विस्तार पावला ! काय ही आश्चर्याची परंपरा !)

यात उल्लेखिलेल्या गाथाहि सप्तशतींतीलच असल्या पाहिजेत. 'ग्रथिता' या पदाने राजशेखराने सूचित केले आहे की, सातवाहनाने सर्व गाथा रचल्या नसून त्याने त्यांची निवड करून संग्रह केला; व हेंच सप्तशतींतील तिसऱ्या गाथेंतहि म्हटलें आहे, हें वर दाखविलें आहेच.

तेव्हा हाल सातवाहन याने गाथासप्तशती ग्रथित केली होती, असें म्हणावयास हरकत दिसत नाही. पुराणात हालाचें नाव आन्ध्रराजाच्या वंशावळींत दिसतें, तेव्हा तो आन्ध्र होता असेंहि म्हणता येतें.

हाल, सातवाहन व आन्ध्र याचें जें तादात्म्य वर दाखविलें आहे, तें प. कृष्णशास्त्री घुले यास मान्य नाही. ते म्हणतात 'हालाने सप्तशती केली, हें कबूल. पण तो सातवाहन राजा होता हें कशावरून ? हेमचंद्राने हालाला सालाहण म्हटलें आहे खरें, पण सातवाहनाचें सालाहण असें प्राकृत रूप होत नाही शिवाय आन्ध्रराजाच्या प्राकृत लेखातहि सातवाहन हेंच रूप आढळतें. पुराणात आन्ध्र राजाची वंशावळ दिली आहे, तीमध्ये किंवा आन्ध्राच्या शिलालेखांतहि या सातवाहन राजाचें नाव येत नाही. नाशिकच्या एका कोरीव लेखात आन्ध्रनृपति गौतमीपुत्राला 'सातवाहनकुलयशःप्रतिष्ठापनकरस्य'— सातवाहनकुलाच्या यशाची प्रतिष्ठापना करणारा—असें विशेषण लावलें आहे. पण पुढे त्याला 'कुलविपुयश्रीकरस्य'* 'कुलाची अभिवृद्धि करणारा' असें म्हटलें आहे. यातील पुनरुक्ति टाळावयाची असल्यास सातवाहनकुल हें गौतमीपुत्राच्या मातृकुलाचें नाव मानावें लागतें. तेव्हा हाल हा सातवाहन नव्हे. अर्थात् बाणाने प्रशंसिलेला सातवाहनाचा सुभाषितसंग्रह हाहि हालाच्या गाथासप्तशतीहून भिन्न ठरतो. या सातशें गाथात अशा एकहि शब्द नाही की, ज्यावरून तिचा कर्ता राजा किंवा

---

* याचा खरा प्राकृत पाठ 'कुलविपुलसिरिकरस' असा आहे.

राजसभेतील पंडित असावा, असें निश्चयाने म्हणतां येईल सप्तशतीतील सर्व वर्णन खेडेगावातील दृश्यांचेंच आहे. तेव्हा सप्तशतीचा कर्ता गोदातीरचा एखादा गरीब खेडवळ ब्राह्मण असावा. शिवाय त्या ग्रंथांतील अनेक उल्लेख इ. स. च्या पहिल्या-दुसऱ्या शतकानंतरचे दिसतात. २६१ व्या गाथेंत मंगळवाराचा उल्लेख असल्याने, सप्तशती याज्ञवल्क्य स्मृतीनंतरची-अर्थात् खिस्तोत्तर तिसऱ्या शतकानंतरची असावी. ४६४ व्या गाथेंत विक्रमादित्याच्या दातृत्वाचा उल्लेख आहे. तो विक्रमादित्य कालिदासाचा आश्रयदाता असावा. कालिदास इ. स. च्या सहाव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेला, असें डॉ. भांडारकरांनी म्हटलें आहे. ४०३ या गाथेंत गजाननाने आपल्या शुंडाग्राने समुद्राचें सर्व पाणी शोषून घेतल्याचें वर्णन आहे. गजानन ही देवता इ. स. च्या पांचव्या शतकापासून आठव्या शतकापर्यंतच्या काळांत होऊन गेली, असें डॉ. भांडारकरांनी आपल्या 'वैष्णव, शैव व इतर धर्मपंथ' या ग्रंथात दाखवून दिलें आहे. या सर्व प्रमाणावरून गाथासप्तशतीचा काळ सहाव्या शतकापूर्वी जाऊं शकत नाही, हें निर्विवाद आहे.'

पं. कृष्णशास्त्री घुले यांच्या प्रमाणांचें परीक्षण श्री. अनिरुद्ध यांनी 'वागीश्वरी'त केलें आहे. त्याची पुनरुक्ति करीत नाही. पण या प्रश्नाविषयी प्रस्तुत लेखकाच्या अलीकडील संशोधनावरून कांही महत्त्वाचा पुरावा उपलब्ध झाला आहे. तो पुढे मांडतो.

पुराणांतील आंध्र नृपतींची वंशावळ व शिलालेखांतील राजनामें यांचें सादृश्य दिसत असल्यामुळे, शिलालेखांतील राजवंश हा पुराणांतील आंध्रवंश होय, असें कबूल करण्यास घुलेशास्त्री तयार आहेत. पण तो वंश सातवाहन म्हणावयास काय आधार असें ते विचारतात. पुराणांत या राजवंशाला आन्ध्र म्हटलें आहे. त्यावरून तो मूळचा आन्ध्र देशांतील होता, असा अनेक हिंदी व युरोपीय संशोधकांचा मत झाला आहे. पण तो बरोबर नाही. या राजवंशाचें खरें नांव सातवाहनच होतें व त्याचें राज्य प्रथम महाराष्ट्र, विदर्भ व कुन्तल या देशांवरच होतें, हें सप्रमाण दाखवितां येतें. या राजवंशाचे आरंभींचे कोरीव लेख मुंबई इलाख्यांत

जुन्नरजवळच्या नाणेघाटात व नाशकास अद्यापि विद्यमान आहेत याची आरंभींची नाणींहि विदर्भ व निजामच्या राज्याचा उत्तरभाग या प्रांतातच सापडलीं आहेत. आन्ध्र देशांतील लेख व नाणीं पुष्कळ नंतरचीं, चोविसावा राजा वासिष्ठीपुत्र पुळुमावि याच्या व त्याच्या नंतरच्या काळाचीं, मिळालीं आहेत. शिवाय या राजवंशाच्या कोणत्याहि लेखात त्याला आन्ध्र म्हटलें नाही. उलट या वंशातील अनुक्रमानें दुसरा राजा कृष्ण हा सातवाहन कुळातला होता, असें नाशिकच्या कोरीव लेखात म्हटलें आहे. तेविसावा राजा गौतमीपुत्र याला तर 'सातवाहन-कुलयसपतिठापनकर' (सातवाहन कुलाच्या यशाची प्रतिष्ठापना करणारा) असें सार्थ उपपद लावलें आहे याच राजाच्या वर्णनात पुढे 'कुलविपुल-सिरिकर' (कुलाचें ऐश्वर्य विपुल वाढविणारा) असें विशेषण आलें आहे. पण त्यात पुनरुक्ति मुळीच नाही. कारण एकात कुलाचें यश व दुसऱ्यात त्याचें ऐश्वर्य वाढविल्याचा निर्देश आहे ही दोन्ही विशेषणें गौतमीपुत्राच्या बाबतींत सर्वस्वी सार्थ होतीं, हें तत्कालीन इतिहासाचें परिशीलन केल्यास दिसून येईल. गौतमीपुत्राचे पूर्वज आरंभीं महाराष्ट्रात राज्य करीत होते, हें मागें सांगितलें आहेच. काही काळानें परकी शक-क्षत्रप, भूमक व नहपान, यांनी त्यांचा पराभव करून उत्तर महाराष्ट्रात आपली सत्ता स्थापली. या दोघांचीहि नाणीं गुजराथ व उत्तर महाराष्ट्र या प्रांतात सापडलीं आहेत. नहपानाचा जावई ऋषभदत्त याचा लेख नाशिकच्या पांडव लेण्यात आहे त्यावरून नहपानाच्या राज्यात निदान कोंकण, उत्तर महाराष्ट्र व गुजराथ अंतर्भूत होत होते, असें स्पष्ट दिसतें. त्यावेळीं सातवाहन राजे विदर्भात येऊन राहिलेले दिसतात. पुढे गौतमीपुत्रानें नहपानाचा पराभव करून क्षहरातवंशी शकांचा समूळ निःपात केला व कोंकण, महाराष्ट्र, सुराष्ट्र (काठेवाड), माळवा, गुजराथ वगैरे प्रांत पुनः आपल्या अमलाखाली आणले आपल्या विजयानंतर लौकरच नाशिकच्या एका लेण्यात कोरविलेल्या लेखात त्यानें आपला 'बेनाकटकस्वामी' असा निर्देश केला आहे, त्यावरून त्यावेळीं तो बेण्णानदीच्या (वाइनगंगेच्या) परिसरात राज्य करीत होता, हें उघड आहे. तेव्हा गौतमीपुत्राची माता बालश्री हिनें आपल्या पराक्रमी

पुत्राच्या निधनानंतर नायकास कोरविलेल्या दुसऱ्या एका लेखात 'कुलाच्या यशाची प्रतिष्ठापना करणारा' व 'त्याचें ऐश्वर्य वाढविणारा' असें त्याचें वर्णन केलें असलें, तर त्यांत मुळीच अतिशयोक्ति नाही, पुनरुक्ति तर नाहीच नाही.

गौतमीपुत्राला सातवाहनकुलाच्या यशाची प्रतिष्ठापना करणारा म्हटलें आहे. हें सातवाहन कुल त्याचें मातृकुल असावें, असें प. मुकेशास्त्री म्हणतात. पण तें बरोबर नाही. कारण सातवाहन हें नाव गौतमीपुत्राच्या पूर्वी निदान तीन राजांच्या बाबतींत योजलेलें आढळतें या राजवंशाचा पुराणांत उल्लेखिलेला पहिला राजा सिमुक (किंवा शिमुक) याची प्रतिमा नाणेघाटांत कोरली आहे, तिच्याखाली त्याचें नाव 'सिमुक सातवाहनो' असें कोरलें आहे. त्याच्या मुलालाहि 'कुमारो सातवाहनो' असें म्हटलें आहे. नाशिकच्या लेखांत त्याचा भाऊ कृष्ण याचें 'सातवाहन कुलांत जन्मलेला' असें वर्णन आलें आहे या सर्व ठिकाणीं सातवाहन हें त्या त्या राजाचें मातृकुल होतें, असें म्हणणें शक्य नाही, हें उघड आहे.

पण या कुळाला 'सातवाहन' तरी का म्हणत असत, असा प्रश्न उपस्थित होतो. पुराणांतील वंशावळींत कोठेहि सातवाहन हें नाव येत नसल्याने संस्कृत ग्रंथकारांनी व अर्वाचीन विद्वानांनी या नावाच्या अनेक व्युत्पत्ति दिल्या आहेत 'सात' नावाच्या यक्षानें वाहून नेलें, म्हणून त्या राजाला 'सातवाहन' म्हणत, असें कथासरित्सागरांत म्हटलें आहे. कोणी म्हणतात, सात म्हणजे अश्व त्याचें वाहन होतें, म्हणून त्याचें असें नाव पडलें पण व्युत्पत्ति काही असली, तरी सातवाहन या नावाचा राजा या कुळाचा संस्थापक होता, असा निर्विवाद पुरावा आतापर्यंत मिळाला नव्हता. पुराणांत त्याचें नाव येत नाही हें मागे सांगितलें आहेच त्याचे कोरीव लेख व नाणींहि मिळालीं नव्हतीं तेव्हा सातवाहन नामक राजा कधी काळीं होऊन गेला, किंवा काही अन्य कारणानें त्या कुळाला हें नाव मिळालें, हें समजण्यास साधन नव्हतें पण सुदैवानें या वर्षीच सातवाहन राजाचीं दोन तांब्याचीं नाणीं सापडलीं आहेत त्यापैकी एक औरंगाबादेस मिळालेलें माझे स्नेही डॉ मो ग.

दीक्षित यांच्या हातीं आलें. त्याची प्लॅस्टरची प्रतिकृति त्यांनी मजकडे गेल्या जानेवारींत पाठविली होती. दुसरें नाणें वाऱगळला काही वर्षांपूर्वी सापडलें होतें. त्याचा छाप हैद्राबादच्या एका गृहस्थाने मजकडे वाचनार्थ गेल्या मे महिन्यात पाठविला होता दोन्ही नाणीं चौकोनी प्रकारचीं असून त्याच्या पुढील बाजूवर सोंड वर केलेला हत्ती आहे व त्याच्या मागील बाजूस 'रञो सिरिसादवाह—' अशीं अक्षरें आहेत राजनामाचीं दोन अक्षरें या नाण्यावर जागेच्या अभावीं उमटलीं नाहीत, असें दिसतें. पूर्ण नांव 'रञो सिरिसादवाहनस' (राज्ञः श्रीसातवाहनस्य) असें असावें. नाण्याच्या मागील बाजूस उज्जयिनी चिन्ह (एकावर एक आडवे उभे ठेवलेले ट्वेल्स) व स्वस्तिक आहेत. अशा तऱ्हेचीं नाणीं (गोतमीपुत्र) सातकर्णि, पुळुमावि, स्कन्द सातकर्णि, यज्ञश्री सातकर्णि, विजय सातकर्णि इत्यादि पुराणात निर्दिष्ट केलेल्या राजांचीं व इतरहि कुम सातकर्णी-सारख्या राजांचीं आपल्या प्रांतात अकोला जिल्ह्यातील तऱ्हाळा गावीं पांच सहा वर्षांपूर्वी सापडलीं होती त्याविषयी माहिती प्रस्तुत लेखकाने त्यावेळीं नागपूरच्या 'महाराष्ट्र' पत्रात प्रसिद्ध केली होती.* आता सापडलेल्या सातवाहन राजाच्या नाण्याची घडण व आकार आणि त्यावरील अक्षरें व इतर काही चिन्हें तऱ्हाळ्याच्या नाण्यांपेक्षा फार प्राचीन दिसतात. त्यावरून सातवाहन राजा हा या कुळाचा मूळ पुरुष दिसतो. गुप्त राजापासून झालेल्या वंशाला जसें पुढें 'गुप्तवंश' असें नांव मिळालें, तसेंच सातवाहन राजापासून झालेल्या वंशाला 'सातवाहनकुल' असें नाव पडलेलें दिसतें. त्यामुळे त्या वंशातील कोणत्याहि राजाला सातवाहन म्हणता येईल. सातवाहन याचें प्राकृतात प्रथम 'सादवाहन' व नंतर 'सालाहण' असें रूप झालेलें दिसतें † तेव्हा पुराणात निर्दिष्ट केलेल्या

---

* जिज्ञासूस या नाण्यावरील प्रस्तुत लेखकाचा लेख जर्नल आफ् दि न्युमिस्मॅटिक सोसायटी ऑफ् इंडिया, पु. २, पृ. ८६–९४ यामध्ये सापडेल.

† प्राकृतात मूळच्या द चा ल होतो, हे गोदानदीच्या 'गोला' ह्या सप्तशतींतच आलेल्या नावावरून स्पष्ट होईल.

हाल नामक सतराव्या राजाला सातवाहन म्हणत असले, तर त्यांत आश्चर्य नाही. ४६७ व्या गायेंत ज्या 'सालाहण' नरेन्द्राची स्तुति आली आहे, तो हालच असावा.

वरील विवेचनावरून पुराणांतील आन्ध्रवंशी हाल राजा आणि संस्कृत व प्राकृत वाङ्मयांत प्रशंसिलेला हाल हे एक होत, हें वाचकांच्या ध्यानांत येईल तर्सेच, या हालाला सातवाहन का म्हणत असत याचाहि उलगडा होईल. हाच हाल गाथासप्तशतीचा कर्ता होय. बाणानें प्रशंसिलेला सातवाहनाचा सुभाषितसंग्रहहि गाथासप्तशतीहून भिन्न नाही, हें आता सांगावयास नकोच.

पण मग गाथासप्तशतींत मंगळवारचा अनिष्ट वार म्हणून उल्लेख, राधाकृष्णांच्या लीला, गजाननाचें वर्णन इत्यादि सकृद्दर्शनी उत्तरकालीन दिसणारे उल्लेख कसे आले, अशी शंका उत्पन्न होते. किंबहुना, अशा उल्लेखांमुळेच प. कृष्णशास्त्र्यांसारख्या विद्वान् संशोधकांना हाल-सातवाहन राजानें गाथासप्तशती रचिली, या परंपरागत समजुतीच्या खरेपणाविषयीं शंका आली. हे सर्व उल्लेख खिस्ती शकाच्या पहिल्या-दुसऱ्या शतकानंतरचे असलेच पाहिजेत असा प्रस्तुत लेखकाचा आग्रह नाही. यांतील प्रत्येक बाबीचा चिकित्सक दृष्टीनें विचार करून निश्चय केला पाहिजे. पण हे उल्लेख पहिल्या-दुसऱ्या शतकानंतर प्रचलित झालेल्या देवादिकांचे आहेत असें मानलें, तरी त्यांची समाधानकारक रीतीनें उपपत्ति लावतां येते, हें प्रस्तुत लेखांत दाखवावयाचें आहे.

गाथासप्तशती हा प्राकृत गाथांचा संग्रह आहे, हें मागें सांगितलेंच आहे. यांत अनेक कवींच्या गाथा आहेत. आरंभीं प्रत्येक गायेशीं तिच्या कर्त्याचें नाव संलग्न असावें; पण पुढें, संस्कृत सुभाषितांच्या बाबतींत झालें त्याप्रमाणें, कित्येक कवींचीं नावें विस्मरणामुळें किंवा लेखकांच्या निष्काळजीपणामुळें गळलेलीं दिसतात. तथापि सप्तशतीच्या अवशिष्ट टीकांत अनेक कवींचीं नावें दिलीं आहेत. सध्या तेरा टीका अवशिष्ट आहेत. त्यांपैकीं फक्त गंगाधरभट्टाची टीका निर्णयसागर छापखान्यानें छापलेली दोन

वर्षांपूर्वीपर्यंत उपलब्ध होती. निर्णयसागरी आवृत्तींत गंगाधरभट्टाच्या टीकेंत कवींचीं नांवें आढळत नाहींत. पण त्या आवृत्तीला जोडलेल्या गाथासूचींत कित्येक कवींचीं नांवें विशिष्ट गाथांशीं संबद्ध अशीं दिलीं आहेत. हीं नांवें 'रहराअस,' 'गुणढस्स,' 'मिअङ्कस्स' अशीं षष्ठयन्त आहेत. दोन वर्षांपूर्वी पीतांबर नामक टीकाकाराची 'गाथा-सप्तशती-प्रकाशिका' नांवाची संस्कृत टीका पंजाबचे प. जगदीशलाल शास्त्री यांनी प्रकाशित केली. ही टीका सप्तशतीच्या ३८८ ते ७०० या गाथांवरच उपलब्ध झाली आहे. या टीकेंत कित्येक अज्ञात अशीं कवि-नांवें दिसतात. तीं सर्व संस्कृतांत दिलीं आहेत. इतर टीका प्रकाशित झाल्या, तर आणखीहि काही कवींचीं नांवें प्रकाशांत येतील. तथापि सध्या उपलब्ध असलेल्या नांवांवरूनहि महत्त्वाचीं अनुमानें बांधता येतात.

सप्तशतींतील गाथा महाराष्ट्री प्राकृतांत लिहिल्या आहेत. त्यांत गोदावरी नदीचा उल्लेख अनेक ठिकाणीं व विंध्यपर्वताचा कांही ठिकाणीं येतो. उत्तरेतल्या एकाहि नदीपर्वताचा त्यांत निर्देश नाही. तेव्हा या गाथा महाराष्ट्रांत (यांत उत्तर महाराष्ट्र, विदर्भ व गोदावरीच्या दक्षिणेचा कुन्तल यांचा अन्तर्भाव होतो)-विशेषतः गोदावरीच्या परिसरांत-रचल्या गेल्या, यांत संशय नाही. सातवाहनांची राजधानी प्रतिष्ठान (सध्याचें पैठण) हीहि गोदावरीच्या कांठींच होती. सातवाहन वंशांतील इतर राजांप्रमाणे हाल राजाहि गोदावरीच्या तीरीं राज्य करीत होता, हें पुढें उद्धृत केलेल्या गाथेवरून दिसून येईल.

सप्तशतींतील काही गाथा हालानें रचिल्या होत्या. काही त्याच्या दरबारच्या कवींनी रचल्या असाव्या. या कवींमध्ये पालित, पालित्त किंवा पादलिप्त हा कवि प्रमुख होता, असें दिसतें. पण कित्येक गाथा राजदर-बाराशीं संलग्न नसलेल्या प्राकृत कवींनी रचिलेल्या दिसतात. त्यांत काही रेवा, रोहा, अनुलक्ष्मी यांसारख्या कवयित्रीहि होत्या. इसवी सनाच्या पहिल्या चार पांच शतकांत महाराष्ट्रांत प्राकृत काव्यगंगेला पूर आलेला दिसतो. राजापासून रंकापर्यंत ज्याला म्हणून नैसर्गिक काव्यप्रतिभा होती, त्यानें प्राकृत गाथा रचलेल्या दिसतात, आणि म्हणूनच या गाथांमध्ये

संस्कृत काव्यात सहसा न आढळणारें खेडेगावांतील जीवन चित्रित केलेलें दिसतें. अशा कोट्यवधि गाथांमधून हालानें सातशें गाथांची निवड केली, असें एका गाथेंत म्हटलेलें आपण पाहिलें आहेच. गाथा-सप्तशतीच्या विविध पाठांतून आलेल्या भिन्न भिन्न गाथा व संस्कृत आलंकारिकांनी उद्धृत केलेल्या तदितर अनेक गाथा यांची एकंदर संख्या लक्ष्यात घेतली, तर या विधानांत फारशी अतिशयोक्ति असेल, असें वाटत नाही. या गाथांच्या लोकप्रियतेचा पुरावा सप्तशतींत अनेक ठिकाणीं आढळतो. 'अमृततुल्य प्राकृत काव्य वाचावें किंवा ऐकावें कसें, हें त्यांना कळत नाही, पण जे कामपुरुषार्थाच्या तत्त्वज्ञानाची उठाठेव करतात, त्यांना लाज कशी वाटत नाही', असें एक कवि विचारतो! *
'ललित, मधुर शब्दांचें शृङ्गाररसमय असें तरुणींना आवडणारें प्राकृत काव्य असल्यावर संस्कृताला कोण विचारतो!' असें दुसरा कवि म्हणतो! †
त्या काळीं महाराष्ट्री प्राकृतांत इतकी काव्यरचना झाली व तिची सर्व देशभर इतकी प्रशंसा झाली की, त्यापुढें प्राकृत काव्य लिहावयाचें झालें, तर तें महाराष्ट्रींत लिहिलें पाहिजे, असा संकेत ठरून गेला आणि तो संकेत सर्व उत्तरकालीन संस्कृत नाटककारांनी आपल्या पात्रांच्या तोंडीं प्राकृत पद्यें घालतांना तंतोतंत पाळलेला दिसतो.

पण सप्तशतींतल्या सर्वच गाथा हालाच्या काळीं किंवा तत्पूर्वी रचिल्या, असें म्हणतां येत नाही, हें गाथा-सूचींतील कविनामांचें निरीक्षण केल्यास स्पष्ट होईल. या गाथांमध्यें प्रवरसेनाच्या नांवावर पाच गाथा [ ६४, २०२, २०८, ४८१ आणि ५६५ ] गंगाधरभट्ट व पीतांबर यांनी दिल्या आहेत. हा प्राकृत कवि वाकाटक नृपति द्वितीय प्रवरसेनच असावा, कारण या वाकाटक राजानें महाराष्ट्रींत

---

* अमिअं पाउअकव्वं पढिउं सोउं अ जे ण आणन्ति ।
कामस्स तत्ततन्तिं कुणन्ति ते कह ण लज्जन्ति ॥ सप्तशती, २.

† ललिए महुरक्खरए जुवईयणवल्लहे ससिङ्गारे ।
सन्ते पाइयकव्वे को सक्कइ सक्कयं पढिउं ॥
वज्जालग्गम्, गाथा २१

सेतुबंध किंवा रावणवहो [ रावणवध ] हें काव्य रचलें होतें. त्याची त्याण, दण्डी, आनन्दवर्धन इत्यादि संस्कृत कवींनी व आलंकारिकांनी मुक्तकंठानें स्तुति केली आहे. हा प्रवरसेन सुप्रसिद्ध गुप्त सम्राट् द्वितीय चन्द्रगुप्त-विक्रमादित्य याचा दौहित्र असून, तो प्रथम रामटेकजवळ नन्दिवर्धन येथून व नंतर प्रवरपुराहून उत्तरविदर्भावर राज्य करीत होता. याचा काळ सुमारें इ. स. ४२० ते इ. स. ४५० हा असावा.

पीतांबराच्या 'गाथासप्तशतीप्रकाशिका' टीकेंत सर्वसेन नामक दुसऱ्या एका कवीचें नांव ५०४ व ५०५ या गाथांचा कर्ता म्हणून आलें आहे. भुवनपाल नामक दुसऱ्या एका टीकाकारानें २१७ व २३४ या गाथांचाहि तोच कर्ता होता, असें म्हटलें आहे. हा सर्वसेनहि वाकाटक नृपति असावा. कारण पाच-सहा वर्षांपूर्वी वाशीमला सापडलेल्या ताम्रपटांत सर्वसेनाचें नांव वाकाटक सम्राट् प्रथम प्रवरसेन याचा मुलगा व उत्तराधिकारी म्हणून आलें आहे.* प्रथम प्रवरसेनाला चार मुलगे होते व ते चारहि राजे झाले, असें पुराणांत म्हटलें आहे. त्यावरून प्रवरसेनाचें विस्तृत साम्राज्य त्याच्या चार मुलांमध्ये विभागलें होतें असें दिसतें. त्यांपैकी ज्येष्ठ पातीच्या अमलाखाली उत्तर विदर्भ होता, हें मागें सांगितलें आहेच. दुसऱ्या शाखेचें राज्य दक्षिण विदर्भावर होतें व तिची राजधानी वत्सगुल्म ( सध्याचें वाशीम ) ही होती. तिचा संस्थापक सर्वसेन हा स्वतः उत्कृष्ट प्राकृत कवि होता. हा इ. स. ३३०-३५५ या काळांत होऊन गेला. त्यानें महाराष्ट्रींत रचिलेलें 'हरिविजय' नामक काव्य सध्या उपलब्ध नाहीं. तथापि, दण्डी, आनन्दवर्धन, कुन्तक, हेमचन्द्र इत्यादि आलंकारिकांनी कालिदासाच्या काव्याच्या बरोबरीनें त्या काव्याची स्तुति केलेली आढळते. सर्वसेन व त्याच्यानंतरचे वाकाटक नृपति यांच्या आश्रयाखाली प्राकृत काव्याचा वत्सगुल्म नगरींत अत्यंत

---

* एपिग्राफिआ इंडिका, पु २६, १३७-१५५ पहा; सर्वसेनाचें नांव अजंठा येथील सोळा न च्या लण्यातील कोरीव लखात आलेलें प्रस्तुत लेखकानें याच लेखात दाखविल आहे

उत्कर्ष झालेला दिसतो. कारण तत्कालीन प्राकृत काव्यांमुळे संस्कृतातल्या वैदर्भीप्रमाणे प्राकृताची वच्छोमी ( वत्सगुल्मी ) ही रीतिहि सर्वत्र प्रसिद्धि पावली. वत्सगुल्म नगर याच काळ काव्य व कला यांचें माहेरघर होऊन राहिलें होतें. इ. स. च्या दहाव्या शतकांत होऊन गेलेल्या राजशेखर कवीनें आपल्या काव्यमीमांसेंत वत्सगुल्म नगरींत काव्यपुरुषाचा साहित्यविद्यावधूशीं विवाह झाला असें वर्णिलें आहे, त्यावरूनहि त्या शहराचें प्राचीन वैभव व्यक्त होतें.

द्वितीय प्रवरसेन व सर्वसेन यांचीं राज्यें गोदावरीच्या उत्तरेस होतीं. पण दुसऱ्या दोन वाकाटक शाखांचा अंमल गोदावरीच्या दक्षिणेस असावा. या शाखांचे कोरीव लेख अद्यापि सापडले नाहींत. म्हणून त्यांमध्यें कोण राजे होऊन गेले, तें निश्चितपणें सांगता येत नाहीं. नन्दिवर्धन व वत्सगुल्म येथें राज्य करणाऱ्या सर्व नृपतींचीं नांवें सेनप्रत्यान्त आहेत. उदाहरणार्थ प्रवरसेन, रुद्रसेन, पृथिवीषेण, नरेन्द्रसेन, देवसेन, *हरिषेण इत्यादि. याशिवाय काहीं नांवें—जयसेन, मकरन्दसेन, सत्यसेन*, मल्लसेन इत्यादि सप्तशतीच्या कवि-सूचींत आढळतात. हीं नांवें राहिलेल्या दोन वाकाटक शाखांच्या राजांचीं किंवा राजकुमारांचीं असावीं, असें अनुमान केल्यास तें बहुधा चूक होणार नाहीं.

पण या दोन शाखा लौकरच नामशेष झालेल्या दिसतात व याचें कारण गोदावरीच्या दक्षिणेस कुन्तल देशांत राष्ट्रकूट राजांचा इ. स. ३७५ च्या सुमारास उदय झाला, हें होय. हें राष्ट्रकूट घराणें सातारा जिल्ह्यांत माण येथें राज्य करीत होतें, हें प्रस्तुत लेखकानें इतरत्र दाखविलें आहे.* या वंशांतील देवराज हा राजा विलासलोलुप व कलाभिज्ञ होता, असें कालिदासाच्या 'कुन्तलेश्वरदौत्या'वरून दिसतें. सप्तशतीच्या कविसूचींत देवराजाच्या नांवावर २३८ व २३९ या दोन गाथा दिल्या आहेत. हा देवराज राष्ट्रकूटवंशी होता, असें अनुमान करण्यास हरकत दिसत नाहीं. तो द्वितीय प्रवरसेनाचा समकालीन असून इ.स.च्या पांचव्या शतकाच्या आरंभीं राज्य करीत असावा. प्रवरसेन व सर्वसेन यांच्याप्रमाणें

* मागें पृ. ७२–७५ पाहा (वा. वि. मि.)

देवराजाने एखादें स्वतंत्र प्राकृत काव्य रचलें होतें काय, हें माहीत नाही. तथापि त्याने प्राकृत भाषेचा कोश रचला होता, अशी माहिती हेमचन्द्राच्या 'देशीनाममाले'वरून समजते. तेव्हा त्याने प्राकृत गाथा रचल्या असल्या, तर त्यात आश्चर्य नाही.

वाकाटक नृपति सर्वसेन व द्वितीय प्रवरसेन आणि राष्ट्रकूट नृपति देवराज यांच्या गाथा अर्थात्च हालानंतर कित्येक शतकानी सप्तशतींत घातल्या गेल्या असाव्या कारण सर्वसेन हा इ. स. च्या चौथ्या शतकात आणि प्रवरसेन व देवराज हे पाचव्या शतकात होऊन गेले. तथापि सप्तशतीला हल्लीचें रूप पाचव्या शतकातहि पूर्णपणें आलें होतें, असें दिसत नाही. कारण तिच्यातील काही गाथा वाक्पतिराजाने (बप्पइराआने) रचल्या होत्या असें दिसतें. गंगाधराच्या टीकेंत बप्पइराआच्या नावावर एकच–९५ वी–गाथा दिलेली दिसते. पण पीताम्बराने वाक्पतिराजाचें नाव आणखी तीन (नं. ६१६, ६१७ व ६१८) गाथांवरच्या टीकेंत दिलें आहे. हा वाक्पतिराजहि देवराज, सर्वसेन व प्रवरसेन यांच्याप्रमाणेच प्राकृतवाङ्मयात उत्कृष्ट ग्रंथकार म्हणून प्रसिद्ध आहे. याने महाराष्ट्री भाषेंत 'मधुमथनविजय' व 'गौडवध' अशीं दोन काव्यें रचलीं होतीं. त्यांतील पहिलें सध्या उपलब्ध नाही. पण सुप्रसिद्ध आलंकारिक आनन्दवर्धन याने आपल्या ध्वन्यालोकात त्याची प्रशंसा केली आहे, आणि भोज व अभिनवगुप्त यांनी त्यातील काही प्राकृत गाथा उद्धृत केल्या आहेत, त्यावरून त्यांत कृष्णचरित्र वर्णिलें होतें, असें दिसतें. गौडवध काव्यांत कनोजचा सम्राट् यशोवर्मा याचा दिग्विजय वर्णिला आहे. वाक्पतिराज हा भवभूतीचा समकालीन असून, भवभूतीप्रमाणे त्यालाहि यशोवर्म्यांचा आश्रय होता, असें कल्हणाच्या राजतरंगिणीवरून समजतें. वाक्पतिराजानेंहि आपल्या काव्यात 'भवभूति हा अमृताचा सागर असून, त्याचे कांही बिन्दु मात्र माझ्या कथावर्णनांत स्फुरतात' असें अत्यंत विनयाने भवभूतीचें ऋण व्यक्त केलें आहे. भवभूति आपले पूर्वज विदर्भांत पद्मपुर नामक नगरीं राहत असत, असें आपल्या नाटकात सांगतो. हें पद्मपुर भंडारा जिल्ह्यातील आमगावाजवळचें पदमपूर होय हें प्रस्तुत लेखकाने इतरत्र दाखविलें आहे. तेव्हा भवभूतीप्रमाणे

वाक्पतिराज हाहि वैदर्भ कवि असावा, असें सहजच अनुमान सुचतें. हे दोन्ही कवि इ. स. च्या आठव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेले. त्या काळीं विदर्भांत त्यांस राजाश्रय न मिळाल्याने उत्तरेस कनोजनृपतीच्या आश्रयास जावें लागलें, असें दिसतें. सप्तशतींत घेतलेल्या वाक्पतिराजाच्या उपरिनिर्दिष्ट गाथा 'गौडवध' काव्यांत आढळत नाहीत. तेव्हां त्या त्याच्या 'मधुमथन' काव्यातील असाव्या, असें अनुमान काही विद्वानानी केलें आहे. पण त्या गाथांच्या अर्थाकडे लक्ष्य देता, त्या इतर गाथांप्रमाणेच 'मुक्तक' रूपाच्या दिसतात. तेव्हां त्या वाक्पतिराजाने प्रसंगोपात्त रचल्या असाव्या.

वरील विवेचनावरून गाथासप्तशतींत निदान आठव्या शतकापर्यंत वेळोवेळीं भर पडत गेली असावी, हें याचकाच्या लक्ष्यांत येईल. या गाथांमध्ये कोणत्याहि कथानकाचा संबंध येत नसल्याने, एखादी गाथा गाळणें किंवा नवीन घालणें मुळीच कठीण जात नसे; व याच कारणामुळे सप्तशतींतील गाथांच्या अनुक्रमांत व पाठांत अत्यंत वैविध्य दृष्टीस पडतें. सप्तशतीच्या हस्तलिखिताचा अभ्यास करून वेबर साहेबानें तिच्या निदान सहा आवृत्त्या झाल्या असाव्या असें सप्रमाण दाखविलें आहे. त्या सर्वांमध्ये फक्त ४३० गाथा समान आहेत बाकीच्या काही विशिष्ट पाठांतच आढळतात. त्यावरूनहि सप्तशतीच्या आवृत्त्या भिन्न भिन्न काळांत होत गेल्या, हें उघड आहे.

सप्तशतींतील गाथांची ही वस्तुस्थिति असल्याने, 'तो गाथासंग्रह इ. स. च्या दुसऱ्या शतकांत रचला गेला' या विधानाप्रमाणेच 'सप्तशती इ. स. च्या सहाव्या शतकामागे जाऊ शकत नाही' हें विधानहि लटकें पडतें. सप्तशतींतील काही गाथा हालाच्याहि पूर्वीच्या असतील,*

---

* गदाधरभट्टानें माधवसेन नामक कवीच्या नावावर ३२७ वी गाथा दिली आहे कालिदासाच्या 'मालविकाग्निमित्रा'वरून शुंगकाळीं म्हणजे ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकांत विदर्भाचें राज्य माधवसेन व यज्ञसेन या दोन चुलत भावांत विभागलें होतें असें दिसतें कदाचित् हा माधवसेनच ३२७ व्या गाथेचा कर्ता असेल.

तर काही हालानंतर शेकडो वर्षांनी रचलेल्या दिसतात. तेव्हा सप्तशतींतील गाथांचा पुरावा इतर ग्रंथांच्या किंवा प्रसंगाच्या कालनिर्णयार्थ ग्राह्य धरण्यापूर्वी त्या गाथा विशिष्ट कालात रचल्या गेल्या, हें ठरविणें जरूर आहे. पण तसें करणें सध्या दुरापास्त असल्यानें अशा पुराव्यावर भिस्त न ठेवणें बरें!

उदाहरणार्थ, आपण खालील गाथा घेऊं—

संवाहणसुहरसतोसिएण देन्तेण तुह करे लक्खम्।
चलणेण विक्कमाइत्तचरिअ अणुसिक्खिअं तिस्सा ॥

गाथा नं ४६४

भावार्थ—एक स्त्री आपल्या प्रियकरास म्हणते–तू तिचे पाय चुरीत होतास, त्यावेळीं त्या आनंदात तुझ्या हातावर लाक्षारसानें काढलेल्या आकृति उमटविण्यात तिच्या पायानें विक्रमादित्याच्या कृत्याचें अनुकरण केलें आहे कारण विक्रमादित्य राजा आपल्या सेवकाच्या कामगिरीनें संतुष्ट होऊन त्याच्या हातावर लक्ष नाणीं ठेवत असतो [यात 'लक्खम्' या पदावर श्लेष असल्यानें त्याचे लाक्षा व लक्ष (नाणीं) असे दोन अर्थ होतात.]

या गाथेंत विक्रमादित्याच्या दानशूरत्वाचें वर्णन आहे. 'ही गाथा सप्तशतींत आली असल्यामुळे, हा विक्रमादित्य इ. स. च्या पहिल्या–दुसऱ्या शतकापूर्वी होऊन गेला असावा, अर्थात् तो खिस्तपूर्व ५८ च्या वर्षी सुरू झालेल्या संवत्सराचा संस्थापक असला पाहिजे तेव्हा या गाथेवरून विक्रमादित्य व त्याचा आश्रित कालिदास हे खिस्तपूर्व पहिल्या शतकात होऊन गेले, हें मत सिद्ध होतें' असें काही विद्वानांनी प्रतिपादिलें आहे. याच्या उलट प. कृष्णशास्त्री घुले म्हणतात की, या गाथेमुळे सप्तशतीच इ. स. च्या सहाव्या शतकामागें जाऊं शकत नाही. कारण डॉ. सर रामकृष्णपंत भांडारकरांनी कालिदासादि नवरत्नें सहाव्या शतकाच्या प्रथमार्धात होऊन गेलीं, या डॉ. कर्नच्या मताचा पुरस्कार आपल्या 'दक्षिणच्या प्राचीन इतिहासा'त केला आहे. श्री अप्रबुद्धास तर या गाथेंतील वर्णन विक्रमादित्याबद्दल आहे काय, याबद्दल शंका वाटते.

कारण ते म्हणतात 'एका श्लोकाला एक लाख रुपये असल्या आख्यायिका विक्रमाविषयी नसून भोजराजाविषयी आहेत.'*

या मतामतांच्या गलबल्यांत तथ्य काय आहे तें पाहूं. सप्तशतीच्या अनेक आवृत्त्या झाल्या असल्यामुळे, जोंपर्यंत ही गाथा हालराजाच्या मूळच्या सप्तशतींत होती, असें निर्विवादपणें सिद्ध करतां येत नाहीं, तोंपर्यंत केवळ तिच्या पुराव्यावरून विक्रमादित्य खिस्तोत्तर पहिल्या-दुसऱ्या शतकापूर्वी होऊन गेला, असें अनुमान करणें योग्य होणार नाहीं. शिवाय शिलालेखादिकांच्या पुराव्यावरून सध्या विक्रमादित्याच्या नांवानें प्रचलित असलेल्या संवत्सराचें पूर्वी 'कृतसंवत्' असें नांव होतें, हें सिद्ध झालें आहे.† तेव्हां खिस्तपूर्व पहिल्या शतकांत विक्रमादित्य होऊन गेला, या विषयीं निश्चित पुरावा मिळत नाहीं. प्रस्तुत गाथेंतलें वर्णन अकराव्या शतकांतल्या भोजराजाच्या अगोदर कोणत्याहि राजास लागू पडत नाहीं, असें म्हणणेंहि धाष्टर्याचें होईल. कारण गुप्तवंशी विख्यात सम्राट् द्वितीय चन्द्रगुप्त-विक्रमादित्य याचीहि दानशूरत्वाबद्दल ख्याति होती. त्यानें केवळ लक्षावधिच नव्हे, तर कोटयवधि नाणीं दान केल्याच्या कथा लोकांत प्रचलित होत्या, हें खालील श्लोकावरून दिसून येईल. हा श्लोक संजान येथील ताम्रपटांत राष्ट्रकूट सम्राट् प्रथम अमोघवर्ष याच्याविषयीं आला आहे ‡

हत्वा भ्रातरमेव राज्यमहरद्देवीं च दीनस्तथा
लक्षं कोटिमलेखयत्किल कलौ दाता स गुप्तान्वयः ।
येनात्याजि तनुः स्वराज्यमसकृद् बाह्यार्थकैः का कथा
ह्रीस्तस्योन्नतराष्ट्रकूटतिलको दातेति कीर्त्यामपि ॥

[अर्थ—गुप्तवंशी (द्वितीय चन्द्रगुप्त) आपल्या भावालाच ठार मारून त्याची पत्नी व राज्य हरण करता झाला.§ (तेव्हां) तो

* वागीश्वरी, पु. ३, पृ. ९.  † सह्याद्रि, पु. ९, पृ. ६९३–७०१.

‡ एपिग्राफिआ इंडिका, पु. १८, पृ. २४८.

§ 'कालिदास' (पृ. ५९–६२) पाहा.

तिरस्करणीय होय. तथापि तो लाख, कोटी अशीं नाणीं दान केल्याबद्दल (आपल्या कोशाध्यक्षाला) लिहावयास लावीत असे,* म्हणून त्याला या कलियुगात दाता म्हणतात ! तेव्हा ज्याने स्वतःचा देह व आपलें राज्य अनेकदा दान केलें† (बाह्य वस्तूंची गोष्ट तर सांगावयासच नको) त्या थोर राष्ट्रकूटवंशाच्या तिलकभूत अशा (अमोघवर्ष) राजाला आपली दाता म्हणून कीर्ति झाली असता लज्जा वाटते ! ]

या श्लोकावरून द्वितीय चन्द्रगुप्त-विक्रमादित्यासंबंधी लक्षदानाच्या आख्यायिका लोकांत प्रचलित होत्या, यात संशय नाही. तेव्हा या विक्रमादित्याचा उल्लेख सप्तशतीच्या उपरिनिर्दिष्ट गाथेंत आहे, असें मानलें तर उचित चूक होणार नाही. 'सप्तशती'त वाकाटक नृपति द्वितीय प्रवरसेन व राष्ट्रकूट नृपति देवराज यांच्या गाथा आल्या आहेत, हें आपण पाहिलें आहेच. द्वितीय चन्द्रगुप्त हा त्याचाच समकालीन असल्यामुळे व तत्कालीं वाकाटक व राष्ट्रकूट या दोन्ही राजवंशास त्याचा आश्रय असल्यामुळे त्याच्यासंबंधी अशा गाथा विदर्भात रचल्या गेल्या, तर त्यात मुळीच आश्चर्य नाही. सारांश, या गाथेमुळे विक्रमादित्य व म्हणून त्याचा आश्रित कविकुलगुरु कालिदास हे इ. स. ४०० च्या सुमारास होऊन गेले, या मताला पुष्टिच मिळते.

इतर यादवप्रत प्रक्षपाबद्दल अशीच गाथांच्या पुराव्याची छाननी झाली पाहिजे. त्या सर्वांचा येथे विचार करणें शक्य नाही. तथापि जातां जाता हें सांगावेंसें वाटतें की, गजाननवर्णनपर ४०३ नंबरची गाथा ही पीताम्बराच्या टीकेंत येण्यासारखी असूनहि आली नाही, तेव्हा ती हालनृपतीच्या मूळच्या गायासंग्रहांत होती काय, याविषयी शंका वाटते.

---

* विक्रमादित्याच्या संबंधीच्या अशा तऱ्हा आख्यायिका मज्मूल-तवारिखमध्यें दिल्या आहेत.

† अमोघवर्षानें एका प्रसंगी लोकोपद्रव (रोगाची साथ) शमविण्याकरिता आपल्या डाव्या हाताची अंगुलि महालक्ष्मीला अर्पण केली होती व अनेकदा धर्माचरणार्थ राज्यत्याग केला होता, त्याला अनुलक्षून हें विधान आहे

# गुणाढ्याचें जन्मस्थान*

पैशाची भाषेंत लिहिलेल्या बृहत्कथेचा कर्ता गुणाढ्य हा प्रतिष्ठान किंवा सध्याचें पैठण या गावीं जन्मला अशी प्रचलित समजूत आहे.† कोणी त्याचें जन्मस्थान वऱ्हाडातील वाशीम ( प्राचीन वत्सगुल्म ) असावें असा तर्क करतात.‡ याविषयी उपलब्ध पुराव्याची छाननी करून तें स्थान निश्चित करण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखांत केला आहे.

मूळच्या बृहत्कथेचीं दोन संस्कृत रूपें, सोमदेवाचें कथासरित्सागर व क्षेमेंद्राची बृहत्कथामंजरी अशीं सध्या उपलब्ध आहेत. या दोन्ही ग्रंथांत बृहत्कथेच्या निर्मितीविषयीची खालील कथा प्रस्तावनारूपाने आली आहे. गुणाढ्य हा सोमशर्मा नामक ब्राह्मणाचा दौहित्र. सोमशर्म्याला वत्स व गुल्म असे दोन मुलगे व श्रुतार्था नामक कन्या होती. श्रुतार्थेला कीर्तिसेन नामक नागपुत्रापासून गुणाढ्य हा पुत्र झाला. त्याचे मातुल व माता हीं निधन पावल्यावर तो विद्याभ्यासाकरिता देशांतरीं गेला. विद्यापारंगत झाल्यावर तो आपल्या गावीं परत आला व नंतर सातवाहन राजाला भेटण्याकरिता त्याच्या राजधानीस गेला. तेथे तो त्या राजाचा मंत्रि झाला. एकदा राजा राण्यांशीं जलक्रीडा करीत असता 'मोदकैर्मा ताडय' या संस्कृत वाक्याचा अर्थ न समजल्यामुळे त्याची फजिती झाली. तेव्हा त्याने संस्कृत शिकण्याचा निश्चय केला. राजाला किती थोड्या काळात संस्कृत शिकता येईल याविषयी शर्ववर्मा व गुणाढ्य यामध्ये पैज लागली. शर्ववर्म्यानें कार्तिकस्वामीच्या प्रसादानें कातन्त्र व्याकरण प्राप्त करून घेऊन सहा महिन्यांत राजाला संस्कृत शिकविलें. तेव्हा

---

* भा. इ. सं मंडळ त्रैमासिक, पृ ६७ ते ७२

† Keith–History of Sanskrit Literature, p. 266.

‡ शारदाश्रम वार्षिक, शके १८५५, पृ ३०.

गुणाढ्यानें आपल्या प्रतिज्ञेप्रमाणे संस्कृत, प्राकृत व अपभ्रंश या तीनहि भाषा वर्ज्य करून पैशाची भाषेंत आपला बृहत्कथा नामक ग्रंथ लिहिला.

वरील कथा मूळच्या बृहत्कथेंत होती काय याविषयी संशय आहे.* तथापि गुणाढ्याविषयीचे काही उल्लेख, त्याचें जन्मस्थान, त्याचा सातवाहन राजाशीं संबंध वगैरे खरे असावेत असें वाटतें. त्याचा आता विचार करू.

गुणाढ्याचा आजा सोमशर्मा हा 'दक्षिणात्य ब्राह्मण' होता एवढाच निर्देश बृहत्कथामंजरीत आला आहे; कथासरित्सागरात मात्र याविषयी खालील निश्चित विधान आहे.

प्रतिष्ठानेऽस्ति नगरं सुप्रतिष्ठितसंज्ञकम्।
तत्राभूत् सोमशर्माख्यः कोऽपि ब्राह्मणसत्तमः॥

यावरून प्रतिष्ठान हें देशाचें नाव असून त्यातील सुप्रतिष्ठित नामक नगर गुणाढ्याचें आजोळ होतें, असें स्पष्ट दिसतें. अशोकाच्या शिलालेखात पेतेनिक किंवा पितिनिक लोकांचा उल्लेख आला आहे. तेही या प्रतिष्ठान देशाचे ( केवळ पैठण शहराचे नव्हे ) रहिवासी असावे. बृहत्कथामंजरींत एका ठिकाणीं गुणाढ्य हा प्रतिष्ठानपुरीं होऊन गेला असें म्हटलें आहे. पण त्याचा अर्थ तो प्रतिष्ठानपुरीं जन्मला असा नसून त्याच्या कर्तृत्वाचा काल प्रतिष्ठानपुरीं गेला असा घेतला पाहिजे. कदाचित् ' प्रतिष्ठानपुरे जात. ' याचा अर्थ प्रतिष्ठान नामक नगरींत होऊन गेला असा नसून प्रतिष्ठान देशातील एका नगरींत तो होता असा विवक्षित असेल तसें असल्यास कथासरित्सागर व बृहत्कथामंजरी या दोन ग्रंथामध्यें गुणाढ्याच्या मूलस्थानाविषयींच्या विधानात विरोध आढळणार नाही.

विद्याभ्यास संपवून गुणाढ्य स्वदेशीं सुप्रतिष्ठित नगरातच परत आला असें कथासरित्सागरात म्हटलें आहे. याविषयी गुणाढ्याच्या तोंडीं खालील श्लोक घातले आहेत—

* बुधस्वामीच्या 'बृहत्कथाश्लोकसंग्रहा'त ती आढळत नाही

कालेन तत्र संप्राप्य सर्वा विद्याः प्रसिद्धिमान् ।
स्वदेशमागतोऽमुं दर्शयिष्यन्निजान् गुणान् ॥
प्रविवेशच चिरात्तत्र नगरे सुप्रतिष्ठिते ।
अपश्यं शिष्यसहितः शोभां कामप्यहं तदा ॥

बृहत्कथामंजरीत गुणाढ्य विद्याभ्यास संपवून शातवाहन राजाची भेट घेण्याकरिता त्याच्या नगरी गेला असें स्पष्ट विधान आहे—

ततो निखिलविद्यानामाश्रयो वेदपारगः।
शातवाहनभूपालं द्रष्टुं यातोऽस्मि तत्पुरम्॥

या वर्णनावरून गुणाढ्याचें जन्मस्थान हें शातवाहन राजाच्या राजधानीहून भिन्न होतें हें दिसून येईल. शातवाहन राजाची राजधानी प्रतिष्ठान ( सध्याचें पैठण ) येथे होती हें सर्वांस माहीत आहे कथासरित्सागरात गुणाढ्याचें जन्मस्थान सुप्रतिष्ठित होतें, असा दोन ठिकाणी निर्देश आला असला तरी पुढील वर्णन वाचताना तें नगर व प्रतिष्ठान हीं एक होत असा वाचकाचा ग्रह होतो. पण पुढे दाखविल्याप्रमाणे या बाबतींत सोमदेवाची चूक झालेली दिसते.

या कथासंग्रहात सुप्रतिष्ठित नगराचें नाव इतरत्रहि आलें होतें. कथासरित्सागराच्या सुरतमञ्जरी लम्बकात कुरंगी नामक राजकन्येची कथा आली आहे. त्या ठिकाणीं म्हटलें आहे—

प्राक् प्रसेनजितो राज्ञः सुप्रतिष्ठितसंज्ञके ।
पुरे कुरंगी नामाभूदतिरूपवती सुता ॥

बृहत्कथामंजरीत हीच गोष्ट खालीलप्रमाणे सांगितली आहे—

नगरे सुप्रतिष्ठाख्ये राज्ञः सेनाजितः पुरा।
पुत्री कुरंगिका नाम विहर्तुं वनमाययौ ॥

हे दोन्ही ग्रंथ पैशाची प्राकृतातील ग्रंथाचीं संस्कृत रूपांतरें असल्याने व वृत्तरचनेच्या कारणाने नगरादिकांच्या नामांत किंचित् फरक आढळतो. पण सुप्रतिष्ठित किंवा सुप्रतिष्ठ या नांवाचें प्रख्यात -नगर दक्षिणेंत होतें यात संशय नाहीं. तें प्रतिष्ठानापासून भिन्न असावें.

कारण सातवाहन राजाच्या राजधानीचें नाव सर्वत्र प्रतिष्ठान असेंच येतें. तें कोठेहि सुप्रतिष्ठित किंवा सुप्रतिष्ठ असें दिलेलें नाही. पाली सुत्तनिपात ग्रंथात प्रतिष्ठानचें प्राकृत रूप पतिट्ठान हें 'मूलक' देशाची राजधानी म्हणून आलें आहे.* ग्रीक भूगोलकार टॉलेमी हाहि सातवाहन-वंशी पुळुमावि राजा प्रतिष्ठान नगरी राज्य करीत होता अशी माहिती देतो यापैकी एकाहि ठिकाणीं प्रतिष्टानाचें 'सुप्रतिष्ठित' किंवा 'सुप्रतिष्ठ' असें नाव आढळत नाही तेव्हा गुणाढ्याच्या जन्मस्थानाचें नाव सुप्रतिष्ठित किंवा सुप्रतिष्ठ असून तें प्रतिष्ठान (सध्याचें पैठण) नगराहून भिन्न होतें असें अनुमान करण्यास तें चूक होणार नाही.

पण हें स्थलनाम प्राचीन काळीं प्रचलित होतें याविषयी स्वतंत्र पुरावा आहे काय असा प्रश्न येथे उपस्थित होतो असा गुणाढ्यकालीन पुरावा उपलब्ध नाही. पण त्यानंतरच्या वाकाटककालातील तीन ताम्रपटात सुप्रतिष्ठ नामक आहाराचें किंवा तालुक्याचें नाव आढळतें. त्यावरून सुप्रतिष्ठ नगराच्या प्राचीनकाळच्या अस्तित्वाबद्दल संशय राहत नाही एवढेंच नाही तर सामान्यत. त्याचें स्थानहि ठरविता येतें

या तीन ताम्रपटापैकी पहिला ताम्रपट वाकाटकराज्ञी प्रभावती-गुप्ता हिचा पुणें येथे सापडलेला होय † हा प्रभावतीगुप्तेने तत्कालीन राजधानी नन्दिवर्धन (सध्याचें रामटेकजवळचें नन्दर्धन) येथून दिला होता याने दान दिलेल्या गावाच्या चतु सीमा पुढीलप्रमाणे दिल्या आहेत–

श्रीप्रभावतीगुप्ता सुप्रतिष्ठाहारे विलवणकस्य पूर्वपार्श्वे शीर्षग्रामस्य दक्षिणपार्श्वे कदाविञ्जनस्यापरपार्श्वे सिदिविवरकस्योत्तरपार्श्वे दङ्गुणग्रामे ब्राह्मणाद्यान्ग्रामकुटुम्बिन कुशलमुक्त्वा समाज्ञापयति।

या सुप्रतिष्ठ नामक आहाराचा व त्यातील गावाचा पत्ता या ताम्रपटाचे संपादक के प्रो पाठक ब रा ब दीक्षित याना लागला नव्हता काही वर्षांपूर्वी याच आहाराचा निर्देश असलेला दुसरा एक

* सुत्तनिपात, पारायणवग्गो, वत्थुगाथा, ५, ३६

† एपिग्राफिया इंडिका, पु १५, पृ ४१,

ताम्रपट वाकाटक द्वितीय प्रवरसेन याने दिलेला वर्धा जिल्ह्याच्या हिंगणघाट तहसिलींतील जामगावीं सापडला.* त्यावरून शोध करतां पुण्याच्या ताम्रपटांतील गावें हिंगणघाट तहसिलींत सापडली. तीं अशीं:– विलवणक म्हणजे हिंगणघाटच्या पश्चिमेस अडीच मैलावर असलेलें वणी. कदाचिञ्जन हें त्याच्या पूर्वेस ३ मैलावरचें कपाजन. यावरून दान दिलेलें दद्दगुण हें बहुधा सध्याचें हिंगणघाट असावें असें वाटतें. पुण्यास सापडलेला हा प्रभावतीगुप्तेचा ताम्रपट मूळचा वर्धा जिल्ह्यातील होता हें यावरून स्पष्ट दिसेल. याविषयीं सविस्तर विवेचन भारत इतिहास संशोधक मंडळाचें त्रैमासिक (वर्ष २२, अ. १) यांत यापूर्वी केलें आहे

वर उल्लेखिलेल्या जामच्या ताम्रपटातील दान दिलेल्या कोसुरक गावाचें ठिकाण व चतुःसीमा येणेप्रमाणे दिल्या आहेत.

**सुप्रतिष्ठाहारे** उमानद्या अपरपार्श्वे चिंचापल्ल्या उत्तरे पार्श्वे बोन्गिकखाटकस्य पूर्वे पार्श्वे मण्डुकिग्रामस्य दक्षिणे पार्श्वे कोसुरकग्राम ग्रामः।

यांतील गावेंही हिंगणघाट तहसिलींत जामजवळ सापडतात. तीं अशीं:—चिंचापल्ली म्हणजे वनानदीच्या उजव्या तीरावरचें चिंचोली. बोन्गिकखाटक म्हणजे बोघड, व मण्डुकिग्राम म्हणजे मांडगाव; हीं दोन्ही जवळच त्या त्या दिशास सापडतात. उमानदीचें हल्लीचें नाव वना होय. दान दिलेलें कोसुरक गाव सध्या त्या नावाने ज्ञात नाहीं. त्याच्या जागीं मनगाव वसलेलें दिसतें.

तिसरा ताम्रपट पांचसहा वर्षांपूर्वी प्रकाशांत आला. तो चांदा जिल्ह्याच्या वरोडा तहसिलींत वडगाव येथे सापडला. तो एपिग्राफिया इंडिकामध्ये मी प्रसिद्ध करीत आहे.† हाहि ताम्रपट वाकाटकनृपति द्वितीय प्रवरसेनानेच दिला असून त्यांत दान दिलेल्या ग्रामाचें वर्णन खालीलप्रमाणे दिलें आहे.

---

* एपिग्राफिया इंडिका, पु २६, पृ १५५

† हाहि आता प्रकाशित झाला आहे. ए. इ. पु. २७, पृ. ७४ पाहा (वा वि. मि.)

**सुप्रतिष्ठाहारे** गृध्रग्रामस्य पूर्वतः कदम्बसरकस्य दक्षिणतः नीलीग्रामस्य पश्चिमेन कोकिलारस्य उत्तरतः वेलुसुक नाम ग्रामः।

या ताम्रपटातहि सुप्रतिष्ठाहाराचा उल्लेख आहे. दान दिलेल्या वेलुसुक गावाच्या जागीं सध्या चिचमडळ नामक गाव वसलेलें दिसतें. तें वर उल्लेखिलेल्या वशा नदीच्या दक्षिणेस आहे. त्याच्याजवळ गृध्रग्राम, नीलिग्राम व कदम्बसरक हीं त्या त्या दिशेस गदेघाट, नीलजई व कोसर या नावानी अद्यापि विद्यमान आहेत. हा ताम्रपट प्रवरसेनानें हिरण्यानदीच्या काठीं दिला होता असा त्यात निर्देश आहे. ही नदी सध्या एरई या नावाने ज्ञात आहे वर उल्लेखिलेलीं गावें हिंगणघाट तहसिलीच्या किंचित् दक्षिणेस चादा जिल्ह्याच्या वरोरा तहसिलींत सापडलीं. त्यावरून प्राचीन सुप्रतिष्ठ आहारात हिंगणघाट तहसिलींतील बराचसा भाग व त्याच्या दक्षिणेचा यवतमाळ व चादा जिल्ह्यातील काही भाग अन्तर्भूत होत असावा असें अनुमान करता येतें.

सुप्रतिष्ठ आहाराचें हें नाव त्यातील मुख्य नगर सुप्रतिष्ठ यावरूनच पडलें असावें हें नगर बृहत्कथामजरींत याच नावाने उल्लेखिलें आहे हें वर दाखविलें आहेच. कथासरित्सागरातील 'सुप्रतिष्ठित' हें नाव मूळच्या प्राकृत नावाचें संस्कृतीकरण करण्यामुळे भिन्न झालेलें दिसतें. वस्तुत. या दोन्ही नावात भिन्नता नाही.

या नावाला जुळेल असें ग्रामनाम हिंगणघाट तहसिलींत सापडतें. हिंगणघाटच्या आग्नेयेस सुमारें बारा मैलांवर, पोथ्रा असें गाव अद्यापि विद्यमान आहे. त्याच्या दक्षिणेस वाहणारी त्याच नावाची पोथ्रा नदी वशा (प्राचीन उमा) नदीला मिळते. सुप्रतिष्ठ आहारातील म्हणून सीन्ही प्राचीन ताम्रपटात निर्दिष्ट केलेलीं बहुतेक गावें पोथ्रा गावाच्या दक्षिणेस किंवा उत्तरेस पधरा मैलाच्या आत सापडतात. सुप्रतिष्ठ गाव भरभराटींत होतें त्या काळाला आज दीड हजार वर्षे होऊन गेल्यामुळे आता तेथे कांही प्राचीन अवशेष असतीलच असें सागवत नाही. वाशीम (प्राचीन वत्सगुल्म), नदर्धन (प्राचीन नन्दिवर्धन) या

तत्कालीन राजधानीच्या शहरींहि फारसे प्राचीन अवशेष आढळत नाहीत. या नावाचें गाव वत्सगुल्म वरून दक्षिणेंत इतरत्र सांपडत नाही तोपर्यंत प्राचीन विदर्भांतील या गांवांतच सुप्रसिद्ध प्राकृत कवि गुणाढ्याचा जन्म झाला होता असें म्हणण्यास हरकत नाही. संस्कृत व प्राकृत कवींपैकी भवभूतीसारख्या फारच थोड्यांच्या जन्मस्थानाविषयी आपणास निश्चित माहिती आहे. या दृष्टीने वरील विवेचन महत्त्वाचें वाटेल अशी आशा आहे.*



* गुणाढ्याचें जन्मस्थान वत्सगुल्म होतें या प. गाडगेशास्त्री यांच्या विधानाला काही आधार नाही. कथासरित्सागर व बृहत्कथामंजरी यांत गुणाढ्याचे मातुल वत्स व गुल्म यांचीं नावें आली आहेत. पण त्यांनी आपल्या नावें वत्सगुल्म नामक नगर स्थापलें असा उल्लेख नाही. या दोन ग्रंथांत इतरत्रहि कोठें वत्सगुल्माचा उल्लेख येत नाही. वात्स्यायनकृत कामसूत्राच्या एका टीकाकारानें दिलेली, वत्स व गुल्म हे राजपुत्र होते व त्यांनी वसविलेल्या देशास वत्सगुल्म म्हणत, ही माहितीहि आनुमानिक दिसते.

# एक प्राचीन कविमंडळ*

वाग्देवीची उपासना करावी या ध्येयाने प्रेरित होऊन अलीकडे महाराष्ट्रात ठिकठिकाणीं कविमंडळें स्थापन झालेलीं दिसतात, व कित्येकदा त्यांच्या सभासदांचे काव्यसंग्रह किंवा लेखसंग्रहहि प्रकाशित होतात. याचें सुप्रसिद्ध उदाहरण सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी पुण्यास स्थापन झालेलें 'रविकिरण मंडळ' हें होय. आपल्या प्रांतातहि अशीं कांही मंडळें स्थापन होऊन त्यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. काव्यनिर्मिति किंवा काव्यचर्चा यांच्या उद्देशाने मंडळ स्थापण्याची ही पद्धत अलीकडेच प्रचारात आली नसून, ती फार प्राचीन काळापासून चालत आली आहे, असें दिसतें. प्राचीन काळीं सरस्वती देवीच्या देवालयात, नागरकाच्या घरीं किंवा कलावतिणीच्या भवनात समान विद्या, बुद्धि, वित्त व वय असलेल्या नागरकांच्या गोष्ठी किंवा मंडळें जमत; व काव्यचर्चा समस्यापूर्ति, कलाचर्चा, इत्यादिकांत आपला वेळ घालवीत, असें वात्स्यायनाच्या कामसूत्रावरून दिसतें. तथापि अशीं मंडळें स्वतःच्या नावानें ग्रंथप्रसिद्धिहि करीत असत काय, याविषयी आतापर्यंत माहिती नव्हती. या संदेहेचें एक उदाहरण अलीकडे माझ्या वाचनात आलें आहे. त्याविषयीची माहिती वाचकांस मनोरंजक वाटेल म्हणून येथे देत आहे.

खिस्ती शकाच्या पहिल्या चार पांच शतकांत प्राकृत काव्याला बहर आलेला दिसतो. हालाच्या गाथासप्तशतीत अनेक कवींचीं नावें दिलीं आहेत. त्यावरून राजापासून रंकापर्यंत सर्व दर्जांचे लोक व पुरुषाप्रमाणेच स्त्रियाहि अहमहमिकेने काव्यरचना करीत असत, असें दिसतें.

---

*'तरुण भारत', नागपूर, वर्षारंभ अंक, १९४७

असावें, असें दिसतें या छप्पन्न कवींनी एक कविमंडळ स्थापलें असावें व तें त्यांच्या संख्यावाचक अभिधानानें प्रसिद्ध झालें असावें. हें कवि-मंडळ छेकोक्तीबद्दल प्रसिद्ध होतें. छेक म्हणजे विदग्ध किंवा सुसंस्कृत मनुष्य. अशा मनुष्यानें एखादी कल्पना श्लेषादिकांच्या सहाय्यानें रमणीय करून शब्दांनी व्यक्त केली म्हणजे तिला छेकोक्ति म्हणतात. संस्कृतांतील अनेक सुभाषितें या तऱ्हेचीं आहेत. छप्पन्न कवींची छेकोक्तिरचनेनें ख्याति झाल्यामुळे पुढे बऱ्याच कालपर्यंत कोणी छेकोक्ति रचली की तिची तुलना छप्पन्न कवींच्या छेकोक्तीशीं होत असे, असें उद्योतनसूरीच्या वरील गाथेवरून स्पष्ट दिसतें.

### त्यांच्या ग्रंथाचें नांव 'सेतु'

छप्पन्न कवि व त्यांच्या छेकोक्ति यांच्या विषयीचें वरील विवेचन वाचकांना कदाचित् असंभवनीय वाटेल. या कवींचा दुसऱ्या कोठें उल्लेख आहे काय, असें ते विचारतील. सुदैवानें तसा उल्लेख उपलब्ध आहे. सुमारें वीस वर्षांपूर्वी श्री. रामकृष्ण कवि यांना दण्डीच्या 'अवन्ति-सुंदरीकथा' या गद्यकाव्याची एक त्रुटित हस्तलिखित प्रत मिळाली ती त्यांनी 'दक्षिणभारती' नामक ग्रंथमालेंत प्रसिद्ध केली आहे. या हस्त-लिखिताचा मधून मधून काही भाग कसरीनें खाल्ल्यामुळे नष्ट झाला आहे. तथापि अवशिष्ट भागहि ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा आहे. दंडी हा ख्रिस्तोत्तर सातव्या शतकाच्या द्वितीयार्धांत, म्हणजे उद्योतना-पूर्वी सुमारें शंभर वर्षें, होऊन गेला त्याचें अवन्तिसुन्दरीकथा हें सुन्दर गद्यकाव्य बाण, सुबन्धु इत्यादि कवींच्या ग्रंथाच्या तोडीचें आहे. बाणाच्या हर्षचरिताच्या आरंभीं प्राचीन कवींच्या स्तुतिपर असे काही श्लोक आले आहेत, तसेच अवन्तिसुन्दरीकथेच्या आरंभीं दिसतात. त्यामध्ये खालील श्लोक आला आहे.

> सेतुरूपेण तिष्ठन्तो लोके सद्वस्तुदर्शिनः ।
> षट्पञ्चाशत् प्रमाणत्वं गता नः कविपुङ्गवाः ॥

[ अर्थ-सद्वस्तूचें स्वरूप ज्यांनी अवलोकिलें आहे व जे सेतुरूपानें

( अद्यापि ) या जगतात विद्यमान आहेत, असे छप्पन्न कविश्रेष्ठ आम्हाला प्रमाणभूत झाले आहेत. ]

या श्लोकातहि छप्पन्न कवींचें वर्णन आलें आहे, व तें कुवलय-मालेतील वर्णनाशी काही बाबतींत अगदी जुळतें दण्डीच्या काळींहि या छप्पन्न कवींची मार्मिक निरीक्षणाबद्दल ख्याति झाली होती, व ते स्वत त्यांच्या उत्कृष्ट काव्यनिर्मितीमुळे प्रमाणभूत झाले होते, असें यावरून स्पष्ट दिसतें या श्लोकात आणखी एक महत्त्वाची माहिती दिली आहे. हे छप्पन्न कवि दिवंगत झाले तरी ते सेतुरूपाने अद्यापि या जगात वास करीत आहेत, असें यात वर्णन आहे याचा अर्थहि स्पष्ट आहे 'सेतुग्रंथ' हा या छप्पन्न कवींचा स्थायी झालेला ग्रंथ असावा, हें उघड आहे हा सेतुग्रंथ कोणता याचा आता विचार करू

## सेतुबंध हा छप्पन्न कवींचा ग्रंथ नव्हे

'सेतु' हें 'सेतुबंध' या काव्यनामाचें संक्षिप्त रूप म्हणून प्रसिद्ध आहे सेतुबंध हें प्रवरसेन नामक कवीने प्राकृत भाषेत रचलेलें पधरा सर्गांचें काव्य सुप्रसिद्ध आहे या काव्याच्या अखेरच्या गाथेत त्याचें रावणवह [ रावणवध ] असें नाव दिलें आहे प्रत्येक सर्गाच्या शेवटीं त्याचे 'दहमुहवह' [ दशमुखवध ] असें दुसरें नाव येतें या दोन्ही नावाचा अर्थ एकच आहे तथापि हें काव्य तिसऱ्या 'सेतुबंध' या नावानेच जास्त प्रसिद्ध आहे दण्डीने आपल्या काव्यादर्श नामक अलंकारग्रंथात याच नावाने याचा उल्लेख केला आहे पण इतर काही ग्रंथकारानी 'सेतु' या संक्षिप्त नावाने त्याचा निर्देश केला आहे 'पूर्वी कपिसेना जशी सेतूने सागर ओलाडून लंकेत गेली तशी प्रवरसेनाची कीर्ति या 'सेतु' ग्रंथाने सागर पार करून गेली' असें श्लेषमय वर्णन बाणाने आपल्या हर्षचरितात केलें आहे विख्यात काव्यशास्त्रज्ञ आनंद-वर्धन याने आपल्या ध्वन्यालोकात या काव्याचा 'सेतु' म्हणूनच निर्देश केला आहे तेव्हा छप्पन्न कवींचा 'सेतु' ग्रंथ व हें सेतुबंध काव्य हीं एकच काय असा प्रश्न उपस्थित होतो.

गाथासप्तशतीसारखे अनेक गाथासंग्रह प्राचीन काळीं प्रचलित असावे. पण ते आता नामशेषदि राहिले नाहीत. कांही प्राकृत कवींनीं नांवें उत्तरकालीन संस्कृत व प्राकृत गद्यग्रन्थातील प्रास्ताविक श्लोकावरून ज्ञात होतात. उद्योतनसूरि नामक जैन कवीचा 'कुवलयमाला' हा गद्यकाव्य ग्रंथ या दृष्टीने फार महत्वाचा आहे. हा ग्रंथ अद्यापि प्रकाशित झाला नाही तथापि त्यातील काही गाथा श्री. दलाल यानी राजशेखराच्या काव्यमीमांसेच्या आपल्या आवृत्तीला जोडलेल्या टिपणींत दिल्या आहेत. त्यावरून खालील माहिती दिली आहे.

हा ग्रंथ शके ६९९ च्या ( इ. स. ७७८ ) अखेरीस रचला, असें त्यातील अखेरच्या उल्लेखावरून दिसतें. तेव्हा हा विद्यमान संस्कृत प्राकृत ग्रंथात बराच प्राचीन आहे, यात संशय नाहीं. या ग्रथाच्या आरंभीं बाणाच्या हर्षचरितातल्याप्रमाणे प्राचीन कवींच्या स्तुतिपर काही गाथा आल्या आहेत, त्यापैकी एक खाली दिली आहे.

पालित्तयसालाहणछप्पण्णयसीहनायसद्देण।
संखुद्दमुद्धसारंग उव्व कह ता पयं देमि॥

[ *अर्थ–पालित्तय, सालाहण व छप्पण्णय या सिंहाच्या गर्जनेने* भयग्रस्त झालेल्या साध्या भोळ्या हरणासारख्या मीं कसें बरें पुढे पाऊल टाकावें ? ]

या गाथेंत पालित्तय, सालाहण व छप्पण्णय या तीन विख्यात कवींविषयींचा आपला आदर उद्योतनाने व्यक्त केला आहे. यापैकी पालित्तय हा सातवाहनवंशी हाल नृपतीच्या दरबारचा श्रीपालित किंवा पादलिप्त हा असावा या कवीच्या काही गाथा सप्तशतींत घेतल्या आहेत. दुसरा कवि सालाहण हा सप्तशतीकार हालच होय. सप्तशतींतील एका गाथेंत सालाहण नरेन्द्राची स्तुति आली आहे. ती गाथा ही—

आवण्णाइ कुलाइ दो च्चिअ जाणंति उण्णइं णेउम्।
*गोरीअ हिअअदइओ अहवा सालाहणणरिन्दो॥*

[ अर्थ–आपत्तींत सापडलेल्या कुलाना उन्नतिप्रत नेणे हें दोघेच जाणतात–एक पार्वतीचा हृदयदयित शंकर व दुसरा सालाहण नृपति. ]

सालाहण हें सातवाहन शब्दाचें प्राकृत रूप होय. सातवाहन हा पुराणात आन्ध्र म्हणून उल्लेखिलेल्या राजकुलाचा मूळ पुरुष होता, हें मी गतवर्षीच्या 'तरुण भारता'च्या विशेषांकात सिद्ध केलें होतें. या राजवंशात उत्पन्न झालेल्या कोणाहि राजाला सातवाहन किंवा सालाहण म्हणता येईल. तथापि, या वंशातील सतरावा राजा जो गाथासप्तशती-कर्ता हाल तोच 'सालाहण' म्हणून येथे विवक्षित दिसतो. हालाच्या अनेक गाथा सप्तशतींत घेतल्या आहेत त्यावरूनहि वरील अनुमान युक्त दिसेल. या हालकवीच्या स्तुतिपर आणली दोन गाथा उद्योतनाने पुढे दिल्या आहेत. असो.

### छपन्न कवींचें मंडळ

आता राहिला तिसरा कवि छप्पण्णय. हा कवीविषयी मात्र अद्यापपर्यंत आपणास काही माहिती नाही. तथापि उद्योतनानेच पुढे या कवीविषयी खालील गाथा दिली आहे.

> छप्पण्णयाण किंवा भन्नइ कयकुजराण भुवणम्मि ।
> अन्नो वि छेयभणियो अज्ज वि उवमिज्जइ जेहिं ॥

[अर्थ—छप्पण्णय या कविश्रेष्ठांविषयी काय सांगावें ? ज्यांच्याशी छेकोक्ति रचणाऱ्या देशातील अन्य कवींची अद्यापिहि तुलना केली जाते !]

या गाथेवरून छप्पण्णय कवीविषयी वरीच माहिती मिळते सकृद्दर्शनींच एक गोष्ट ध्यानात येते ती ही की, या गाथेंत छप्पण्णय कवीचें वर्णन करताना उद्योतनसूरीने बहुवचनाचा उपयोग केला आहे. हें बहुवचन आदरार्थी असणें शक्य नाही. कारण पालित्तय, हाल, बाण, देवगुप्त किंबहुना स्वतःचा गुरु हरिभद्र यांच्याविषयीही रचलेल्या गाथात उद्योतनाने एकवचनाचाच प्रयोग केला आहे. तेव्हा 'छप्पण्णय' हें एका कवीचें नाव नसून अनेक कवींचें असावें- ही कल्पना सुचताच या कविनामाच्या अर्थाकडे साहजिकच लक्ष जातें छप्पण्णय हें संस्कृत 'षट्पञ्चाशत्' शब्दाचें प्राकृत रूप होय. यापासून मराठी छप्पन्न शब्द झाला आहे. तेव्हा छपन्न कवींच्या विषयी उद्योतनाचें वरील वर्णन

'सेतुबंध' हें काव्य प्रवरसेनाच्या नावावर प्रचलित आहे. त्याचा कर्ता कोणी राजा असून त्याने गादीवर आल्यावर लौकरच तें रचण्यास सुरवात केली, असें या काव्यातील एका श्लोकावरून (१,९) दिसतें. हा प्रवरसेन काश्मीरचा राजा असून, त्याने वितस्ता (झेलम) नदीवर पूल बांधला, त्या प्रसंगाने हें काव्य रचलें, असें पूर्वी मानलें जात असे. पण अलीकडील संशोधनावरून हा प्रवरसेन वाकाटकवंशी द्वितीय प्रवरसेन नृपति होता, असें दिसतें. हें काव्य 'महाराष्ट्री' प्राकृतात असल्यामुळे दूरच्या काश्मीरात याची निर्मिति होणें शक्य दिसत नाही. शिवाय, कल्हणाच्या राजतरंगिणींत प्रवरसेनाने वितस्तेवर बांधलेल्या पुलाचा उल्लेख आहे, पण या काव्याचा नाही. तेव्हा हें काव्य विदर्भनृपति द्वितीय प्रवरसेनाने रचलें असणें जास्त समजनीय आहे. या काव्याच्या रामदास नामक टीकाकाराने 'हें काव्य कालिदासाने विक्रमादित्याच्या आज्ञेने रचलें' अशी आख्यायिका दिली आहे. तिचीहि या योगें उपपत्ति लावता येते. द्वितीय प्रवरसेन हा विख्यात गुप्तसम्राट् द्वितीय चंद्रगुप्त विक्रमादित्य याचा दौहित्र होता. याचा पिता द्वितीय रुद्रसेन हा अल्पायुषी झाल्यामुळे चंद्रगुप्ताने आपल्या पदरच्या मुत्सद्द्यास विदर्भात आपल्या प्रभावतीगुप्ता नामक मुलीस राज्यकारभारात मदत करण्याकरिता पाठविलें होतें. त्या प्रसंगाने त्याचा आश्रित कालिदास हाहि विदर्भात आला असावा व त्याने आपलें मेघदूत विदर्भात रचलें असावें, हें मी इतरत्र दाखविलें आहे. *विदर्भात असतांना कालिदासाने 'सेतुबंध' काव्य स्वतः रचलें असावें किंवा प्रवरसेनाला तें करण्यात मदत केली असावी. यामुळे कालिदासाचेंहि नाव या काव्याशीं संलग्न झालेलें दिसतें*

अवन्तिसुन्दरीकथेंतील वरील उल्लेखावरून हेंच सेतुबंध काव्य प्रवरसेनाने किंवा कालिदासानेहि रचलें नसून छप्पन्न कवींनीच रचलें होतें काय, असा प्रश्न उपस्थित होतो. 'सेतु' या नावाचें दुसरें काव्य उपलब्ध नसल्याने या प्रश्नाचें उत्तर अनिश्चितच रहावें, असें मनुष्यांनीच वाटतें. शिवाय अवन्तिसुन्दरी कथेंतील प्राचीन कवींच्या स्तुतिपर श्लोक कालानुक्रमाने घातलेले दिसतात. 'सेतु'कार छप्पन्न

कवींविषयीचा श्लोक हरिविजयकर्ता वाकाटक नृपति सर्वसेन व कविकुलगुरु कालिदास या दोन कवींच्या स्तुतिपर श्लोकामध्ये आला आहे. त्यावरूनहि हें 'सेतु' काव्य कालिदासकालाच्या सुमारास रचलें असावें, असें अनुमान करता येतें. सेतुबंध काव्याचा काळ हाच आहे, हें वर दाखविलें आहे. तेव्हा सेतुबंध काव्य छप्पन्न कविमंडळाने रचलें असावें, असें मानण्याकडे मनाचा कल होतो.

पण 'सेतुबंध' काव्याच्या स्वरूपाचा विचार करता हें मत ग्राह्य वाटत नाही. हें काव्य कुमारसंभव, शिशुपालवध इत्यादि संस्कृत महाकाव्याप्रमाणे आरंभापासून अखेरपर्यंत एकाच शैलींत लिहिलें आहे. ह्यात विविधविषयपर वर्णन आलें असलें, तरी त्याचे भाग छप्पन्न निरनिराळ्या कवींनी स्वतंत्रपणे रचून मागाहून एकत्रित केलेले दिसत नाहीत. अशा प्रकारच्या कृतींत शैलीची व वर्णनाची एकरूपता राहणें शक्य नसतें. तेव्हा छप्पन्न कवींचा ग्रंथ हें सेतुबंध काव्य असणें शक्य नाही.

## छप्पन्न कवींच्या गाथांचा संग्रह

छप्पन्न कवींचा सेतुग्रंथ सुभाषितसंग्रहात्मक स्वरूपाचा असावा, असें वाटतें. अशा तऱ्हेच्या ग्रंथात कथानकाचा संबंध येत नसल्याने अनेक कवींच्या कृति एकत्रित करता येतात. हालाची 'सप्तशती' हा गाथासंग्रह या प्रकारचाच आहे. उद्योतनसूरीची छप्पन्न कवींच्या स्तुतिपर गाथा मागे दिली आहे. तींतील वर्णनावरूनहि हें अनुमान सयुक्तिक भासतें. उद्योतन म्हणतो, 'छप्पन्न कवि दिवंगत झाल्याला आज पुष्कळ काळ लोटला. पण अद्यापि कोणी छेकोक्ति रचली की तिची त्यांच्या कृतींशीं तुलना करण्यात येते.' या वर्णनावरून छप्पन्न कवींची कृति छेकोक्तिमय किंवा सुभाषितसंग्रहरूपाची होती, हें उघड आहे. संस्कृतात कवीन्द्रवचनसमुच्चय, शार्ङ्गधरपद्धति, सुभाषितावलि, सूक्तिमुक्तावलि असे अनेक सुभाषितसंग्रह अद्यापि विद्यमान आहेत. प्राकृत भाषेत मात्र 'गाथासप्तशती' व 'वज्जालग्ग' असे दोनच गाथासंग्रह सध्या ज्ञात आहेत. गाथासप्तशतींतील वर्णनावरून हालाच्या काळीं कोटयवधि अलंकारयुक्त गाथा रचल्या गेल्या होत्या, असें दिसतें. वाकाटक-

काळींहि तोच क्रम चालू होता. कारण वाकाटक नृपति सर्वसेन, प्रवरसेन इत्यादिकांनीहि प्राकृत महाकाव्याप्रमाणे स्फुट गाथाहि रचल्या होत्या. या गाथा त्या काळीं निरनिराळ्या गाथासंग्रहांत संगृहीत केल्या असाव्या. हालाच्या सप्तशतीचें प्राचीन नाव कोश किंवा गाथाकोश होतें, हें मी इतरत्र सप्रमाण दाखविलें आहे. तेव्हां छप्पन्न कवींनी आपल्या गाथांचा संग्रह 'सेतु' नावाने प्रसिद्ध केला असला, तर त्यात आश्चर्य नाही.

हे छप्पन्न कवि कोण होते, हें मात्र समजण्यास आज साधन नाही. त्यांनीहि वैयक्तिक कीर्तीची अपेक्षा न ठेवता आपल्या मंडळाच्या नावेंच आपला संग्रह प्रकाशित केलेला दिसतो; व उत्तरकालीन ग्रंथकारांसहि छप्पन्न या नावानेच ते ज्ञात होते, हें दण्डी व उद्योतनसूरि यांच्या वर्णनावरून मागे दाखविलें आहे. येनकेनप्रकारेण आपलें नाव वर्तमानपत्रांत झळकावें अशी अपेक्षा करणाऱ्या आधुनिक लेखकांस त्यांनी उत्कृष्ट उदाहरण घालून दिलें आहे.

# वाकाटक नृपति सर्वसेन याचें 'हरिविजय' काव्य*

## भारतीय इतिहासांतील सुवर्णयुग

प्राचीन भारतीय इतिहासात खिस्तोत्तर चौथ्या व पांचव्या शतकाच्या कालाला सुवर्णयुग अशी संज्ञा देण्यात येते. कारण, या काळात हिंदुस्थानाचा इतर देशाशीं व्यापार वाढून देशात सुबत्ता झाली, सर्वत्र शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित होऊन स्थापत्य, शिल्पकला, चित्रकला इत्यादि कलाना उत्तेजन मिळालें आणि संस्कृत व प्राकृत वाङ्मयाची अभिवृद्धि झाली. याचें श्रेय मुख्यत गुप्त व वाकाटक राजवंशांना देण्यात येतें. कारण, या काळात उत्तरेंत जसें गुप्तांचें तसें दक्षिणेंत वाकाटकाचें साम्राज्य पसरलें होतें. या दोन्ही वंशांतील राजे सामान्यतः शूर, न्यायी, विद्वान् व कलाभिज्ञ असून त्यांचा विद्वानांना व कलावंताना उदार आश्रय होता. यापैकी काही तर उत्कृष्ट कवि होते. सुविख्यात गुप्तसम्राट् समुद्रगुप्त याला त्याच्या उत्कृष्ट काव्यामुळे 'कविराज' अशी सार्थ पदवी मिळाली होती. त्याच्या काव्यातील सुदर कल्पना आत्मसात् करून त्या आपल्या ग्रंथात योजण्यात विद्वानांना धन्यता वाटे, इत्यादि वर्णनें तत्कालीन लेखात आढळतात. त्याचा मुलगा द्वितीय चन्द्रगुप्त विक्रमादित्य याने तर उज्जयिनीच्या विद्वत्सभेपुढे स्वतः परीक्षा दिली होती, अशी आख्यायिका राजशेखराने आपल्या काव्यमीमांसेंत दिली आहे. कवींद्रवचनसमुच्चयादि प्राचीन सुभाषितसंग्रहात काही सुभाषितें विक्रमादित्याच्या नावावर दिलीं आहेत. तीं या चन्द्रगुप्त-विक्रमा-

* प्रस्तुत लेख हा भारत–इतिहास-संशोधक मंडळाच्या ३३ व्या संमेलनात वाचलेला निबंध होय तो पुढे 'नवभारत', पुणे, या मासिकात जून, १९४८ मध्ये प्रसिद्ध झाला

दिल्याचीं अशावीं. त्यावरून त्याच्या काव्यप्रतिभेची प्रतीति येते. दक्षिणेंतले वाकाटक नृपतीहि काव्यरचनेंत मागे नव्हते. त्यांच्या कारकीर्दीत विदर्भात इतकीं उत्कृष्ट काव्यें निर्माण झालीं की त्यांच्यामुळे आलंकारिकांना वैदर्भी नामक विशिष्ट रीति मानावी लागली. तींतील उत्कृष्ट गुणामुळे तिला सर्वश्रेष्ठ रीति मानण्यात आलें. कविकुलगुरु कालिदास हा माळव्यांतला कवि; पण त्यालाहि वैदर्भी रीतीची श्रेष्ठता पटून त्याने आपलीं सर्व काव्यें व नाटकें याच रीतींत लिहिलीं. त्याचें मेघदूत हें काव्य तर तत्कालीन वाकाटक राजधानीजवळच्या रामगिरीवर लिहिलें होतें हें प्रस्तुत लेखकानें इतरत्र* दाखविलें आहे. दुर्दैवाने विदर्भांतील कालिदासपूर्वकालीन संस्कृत काव्यें कालाच्या उदरात गडप झालीं आहेत; तथापि त्या काळचीं काही सुभाषितें अद्यापि सुभाषितसंग्रहात अवशिष्ट राहिलीं आहेत व विशेष उल्लेखनीय गोष्ट ही की त्यांपैकी एक वाकाटक युवराज दिवाकरसेन याच्या नावावर दिलें आहे.†

संस्कृत काव्याप्रमाणें प्राकृत काव्यांचीहि निर्मिति या काळांत झाली होती. किंबहुना खिस्तोत्तर पहिल्या चारपाच शतकात विदर्भात प्राकृत काव्यकलेलाच जास्त बहर आला होता. सातवाहन व वाकाटक या दोन राजवटींत राजापासून रंकापर्यंत ज्याला म्हणून काही प्रतिभा होती त्याने प्राकृतात सुभाषितरचना केली होती. त्यांपैकी सातशें सुभाषितांचा संग्रह सातवाहन नृपति हाल याच्या नावावर गाथासप्तशती या नावाने अद्यापि प्रसिद्ध आहे. पण या गाथा मुक्तक रूपाच्या आहेत. याशिवाय प्राकृत महाकाव्येंहि त्या काळात निर्माण झालीं. सध्यां अवशिष्ट असलेल्या प्राकृत महाकाव्यात सेतुबंध किंवा रावणवहो हें अत्यंत प्राचीन समजलें जातें. हें प्रवरसेनाने रचलें असें सुप्रसिद्ध संस्कृत कवि बाणभट्ट याने आपल्या हर्षचरिताच्या एका प्रास्ताविक श्लोकात म्हटलें आहे. हा प्रवरसेन वाकाटक वंशातील द्वितीय प्रवरसेन होय.

---

* मागें, पृ ६४ पाहा (वा. वि मि.)

† श्रीधरदासाचें सदुक्तिकर्णामृत, २, ३१, ४.

गुप्तसम्राट् द्वितीय चन्द्रगुप्त-विक्रमादित्याचा हा दौहित्र असून कालिदासाचा समकालीन होता. किंबहुना कालिदासानें स्वतःच सेतुबंध काव्य विक्रमादित्याच्या आज्ञेने रचलें अशीहि आख्यायिका त्या काव्याच्या एका टीकाकारानें दिली आहे. तिजमध्ये किती तथ्य आहे हें सांगता येत नाही. तथापि तें काव्य विदर्भात रचलें गेलें यांत संशय नाही. या काव्याची दंडी, बाण, आनंदवर्धन इत्यादि ग्रंथकारांनी मुक्तकंठाने स्तुति केली आहे. या काव्याप्रमाणेंच हरिविजयनामक प्राकृत काव्य वाकाटककाळीं रचलें गेलें होतें व त्याचा कर्ता सर्वसेन हाहि प्रवरसेनाप्रमाणे वाकाटक नृपति होता हें प्रस्तुत लेखांत दाखवावयाचें आहे.

सेतुबंध काव्य सध्या उपलब्ध असून निर्णयसागर छापखान्यांत छापलें आहे. त्यामुळे त्यांतील कथानक, काव्यगुण वगैरेविषयी लोकांना माहिती आहे. हरिविजयाचें तसें नाही. हें काव्य सध्या उपलब्ध नाही. म्हणून आनंदवर्धन, भोज, कुन्तक वगैरे संस्कृत आलंकारिकांच्या ग्रंथांतील तद्विषयक उल्लेखांवरून व त्यांतून उद्धृत केलेल्या उदाहरणांवरून त्याच्या कथानकाविषयी अनुमानाने माहिती जमवावी लागते. त्याचा कर्ता सर्वसेन याच्याविषयी तर सहासात वर्षांपूर्वी काहीच माहिती नव्हती. सन १९३९ मध्ये वऱ्हाडांतील अकोला जिल्ह्यांत वाशीम येथे एक ताम्रपट सापडला. तो सर्वसेनाचा पुत्र वाकाटक नृपति द्वितीय विन्ध्यशक्ति याने दिला असून त्यावरून सर्वसेनाचें नांव प्रथमच ज्ञात झालें. तो लेख प्रस्तुत लेखकाने एपिग्राफिया इंडिकामध्ये प्रकाशित केला आहे.* अजंठा येथील सोळा नंबरच्या लेण्यांत एक वाकाटककालीन कोरीव लेख आहे त्यांतहि सर्वसेनाचें नांव आलें आहे. पण तो लेख सध्या अत्यंत जीर्ण अवस्थेत असल्यामुळे डॉ. भाऊ दाजी, पं. भगवानलाल इंद्रजी, डॉ. बुल्हर वगैरे विद्वानांनी त्या ठिकाणीं रुद्रसेन असें वाचलें होतें. तो लेखहि प्रस्तुत लेखकाने हैदराबाद-पुराणवस्तु-संशोधन-

* एपिग्राफिया इंडिका, पु २६, पृ १३७-१५५

दिल्याचीं असावीं. त्यावरून त्याच्या काव्यप्रतिभेची प्रतीति येते. दक्षिणेंतले वाकाटक नृपतीहि काव्यरचनेंत मागे नव्हते. त्यांच्या कारकीर्दीत विदर्भांत इतकीं उत्कृष्ट काव्यें निर्माण झालीं की त्याच्यामुळे आलंकारिकांना वैदर्भी नामक विशिष्ट रीति मानावी लागली. तींतील उत्कृष्ट गुणांमुळे तिला सर्वश्रेष्ठ रीति मानण्यात आलें. कविकुलगुरु कालिदास हा माळव्यातला कवि, पण त्यालाहि वैदर्भी रीतीची श्रेष्ठता पटून त्याने आपलीं सर्व काव्यें व नाटकें याच रीतींत लिहिलीं. त्याचें मेघदूत हें काव्य तर तत्कालीन वाकाटक राजधानीजवळच्या रामगिरीवर लिहिलें होतें हें प्रस्तुत लेखकानें इतरत्र* दाखविलें आहे. दुर्दैवाने विदर्भांतील कालिदासपूर्वकालीन संस्कृत काव्यें कालाच्या उदरात गडप झालीं आहेत; तथापि त्या काळचीं काही सुभाषितें अद्यापि सुभाषितसंग्रहात अवशिष्ट राहिलीं आहेत व विशेष उल्लेखनीय गोष्ट ही की त्यांपैकी एक वाकाटक युवराज दिवाकरसेन याच्या नावावर दिलें आहे.†

संस्कृत काव्याप्रमाणें प्राकृत काव्यांचीहि निर्मिति या काळात झाली होती. किंबहुना खिस्तोत्तर पहिल्या चारपाच शतकात विदर्भांत प्राकृत काव्यकलेलाच जास्त बहर आला होता. सातवाहन व वाकाटक या दोन राजवटींत राजापासून रंकापर्यंत ज्याला म्हणून कांही प्रतिभा होती त्याने प्राकृतात सुभाषितरचना केली होती. त्यांतैकी सातशें सुभाषितांचा संग्रह सातवाहन नृपति हाल याच्या नांवावर गाथासप्तशती या नावाने अद्यापि प्रसिद्ध आहे. पण या गाथा मुक्तक रूपाच्या आहेत. याशिवाय प्राकृत महाकाव्येंहि त्या काळात निर्माण झालीं. सध्या अवशिष्ट असलेल्या प्राकृत महाकाव्यात सेतुबंध किंवा रावणवहो हें अत्यंत प्राचीन समजलें जातें. हें प्रवरसेनानें रचलें असें सुप्रसिद्ध संस्कृत कवि बाणभट्ट याने आपल्या हर्षचरिताच्या एका प्रास्ताविक श्लोकात म्हटलें आहे. हा प्रवरसेन वाकाटक वंशातील द्वितीय प्रवरसेन होय.

* मागे, पृ ६४ पाहा. (वा. वि. मि.)

† श्रीधरदासाचे सदुक्तिकर्णामृत, २, ३१, ४.

गुप्तसम्राट् द्वितीय चन्द्रगुप्त-विक्रमादित्याचा हा दौहित्र असून कालिदासाचा समकालीन होता किंबहुना कालिदासाने स्वत च सेतुबंध काव्य विक्रमादित्याच्या आज्ञेने रचलें अशीहि आख्यायिका त्या काव्याच्या एका टीकाकारानें दिली आहे तिजमध्ये किती तथ्य आहे हें सांगता येत नाही तथापि तें काव्य विदर्भांत रचलें गेलें यात सशय नाही या काव्याची दंडी, बाण, आनदवर्धन इत्यादि ग्रथकारानी मुक्तकठाने स्तुति केली आहे या काव्याप्रमाणेंच हरिविजयनामक प्राकृत काव्य वाकाटककाळीं रचलें गेलें होतें व त्याचा कर्ता सर्वसेन हाहि प्रवरसेनाप्रमाणे वाकाटक नृपति होता हें प्रस्तुत लेखात दाखवावयाचें आहे

सेतुबंध काव्य सध्या उपलब्ध असून निर्णयसागर छापखान्यात छापलें आहे त्यामुळे त्यातील कथानक, काव्यगुण वगैरेविषयी लोकाना माहिती आहे हरिविजयाचें तसें नाही हें काव्य सध्या उपलब्ध नाही. म्हणून आनदवर्धन, भोज, कुन्तक वगैरे सस्कृत आलकारिकाच्या ग्रथातील तद्विषयक उल्लेखावरून व त्यातून उद्धृत केलेल्या उदाहरणावरून त्याच्या कथानकाविषयी अनुमानाने माहिती जमवावी लागते. त्याचा कर्ता सर्वसेन याच्याविषयी तर सहासात वर्षांपूर्वी काहीच माहिती नव्हती सन १९३९ मध्ये वऱ्हाडातील अकोला जिल्ह्यात वाशीम येथे एक ताम्रपट सापडला तो सर्वसेनाचा पुत्र वाकाटक नृपति द्वितीय विध्यशक्ति याने दिला असून त्यावरून सर्वसेनाचें नाव प्रथमच ज्ञात झालें तो लेख प्रस्तुत लेखकाने एपिग्राफिया इडिकामध्ये प्रकाशित केला आहे * अजठा येथील सोळा नबरच्या लेण्यात एक वाकाटककालीन कोरीव लेख आहे त्यातहि सर्वसेनाचें नाव आलें आहे पण तो लेख सध्या अत्यत जीर्ण अवस्थेंत असल्यामुळ डॉ भाऊ दाजी, प भगवानलाल इद्रजी, डॉ बुल्हर वगैरे विद्वानानी त्या ठिकाणीं रुद्रसेन असें वाचलें होतें तो लेखहि प्रस्तुत लेखकाने हैदराबाद-पुराणवस्तु-सशोधन-

* एपिग्राफिया इडिका, पु २६ पृ १३७-१४५

-खात्याच्या ग्रंथमालेंत प्रसिद्ध केला आहे.* या दोन लेखावरून सर्वसेना-विषयी माहिती मिळते ती खाली दिली आहे.

## सर्वसेनाची राजधानी वत्सगुल्म ( वाशीम )

सर्वसेन हा वाकाटक वंशाचा मूळ पुरुष पहिला विंध्यशक्ति याचा नातू व विख्यात सम्राट् प्रथम प्रवरसेन याचा मुलगा. सातवाहन वंशाचा इ. स. २५० च्या सुमारास लय झाल्यावर विंध्यशक्तीनें विदर्भांत आपलें राज्य स्थापलें. त्याचा पुत्र प्रथम प्रवरसेन हा अत्यंत बलाढ्य होता. यानें अनेक वाजपेय यज्ञ केल्याचा पुराणांत उल्लेख आहे. वाकाटकांच्या कोरीव लेखांतहि यानें अनेक श्रौत यज्ञ व चार अश्वमेध केले होते असें म्हटलें आहे. याचें साम्राज्य दक्षिणच्या पठारावर नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत पसरलें होतें. याला चार पुत्र होते. त्यांच्यामध्ये प्रवरसेनाच्या निधनानंतर त्याच्या विस्तृत साम्राज्याची वाटणी झाली. सर्वांत वडील मुलगा गौतमीपुत्र हा अगोदरच निवर्तला होता. त्याचा पहिला मुलगा रुद्रसेन याला उत्तर विदर्भ मिळाला. त्यानें आपली राजधानी नागपूरजवळ नन्दिवर्धन येथे केली. दुसरा मुलगा सर्वसेन याच्या वाट्यास दक्षिण विदर्भ—सातमाला पर्वतराजीच्या दक्षिणचें गोदावरी नदीचें खोरें, ज्यामध्ये अकोला, यवतमाळ, परभणी, नान्देड, अदिलाबाद इत्यादि जिल्ह्यांतील प्रदेश अन्तर्भूत होतो तो—आला. त्यानें आपली राजधानी वत्सगुल्म (सध्याचे अकोला जिल्ह्यांतील वाशीम) येथे स्थापिली. दुसऱ्या दोन पुत्रांच्या वंशजांचे लेख अद्यापि मिळाले नसल्यामुळे ते नक्की कोणत्या प्रदेशावर राज्य करीत होते तें सांगता येत नाही. बहुधा ते गोदावरीच्या दक्षिणेस दक्षिण महाराष्ट्रांत—ज्याला पूर्वी कुन्तल अशी संज्ञा होती त्या प्रदेशांत—राज्य करीत असावे. पुढे लवकरच त्या भागांत राष्ट्रकूट घराण्याचा उदय झाला, त्यामुळे या दोन वाकाटक शाखांचा अस्त झाला असावा.

वत्सगुल्म शहर वाकाटकांच्या अमलाखाली अत्यंत भरभराटलें. येथे संस्कृत व प्राकृत वाङ्मयाचा व कलाकौशल्याचा इतका उत्कर्ष झाला

* हैदराबाद आर्किआलॉजिकल सीरीज, नं. १४.

की तें नगर भगवान् मदनाचें क्रीडास्थान मानण्यात येऊं लागलें असें राजशेखरानें आपल्या काव्यमीमांसेंत म्हटलें आहे.* वत्सगुल्म शाखेचा शेवटचा ज्ञात वाकाटक राजा हरिषेण याच्या काळीं अजंटा येथे कोरविलेलीं सोळा, सतरा व एकोणीस नंबरचीं लेणीं अद्यापिहि तेथल्या सर्व लेण्यात मध्यता, कलाकुसरी, शिल्पें, चित्रें इत्यादिकांत अप्रतिम गणलीं जातात. वत्सगुल्म नगरींत रचलेल्या काव्यामुळे वात्सगुल्मी (प्राकृत वच्छोमी) नामक रीति वैदर्भीचा पर्याय म्हणून प्रसिद्ध झाली. वच्छोमी रीतीचा उल्लेख राजशेखरानें आपल्या कर्पूरमंजरी नामक प्राकृत नाटकाच्या मंगलश्लोकांत केला आहे.

## वाकाटक नृपति सर्वसेन हाच 'हरिविजय'चा कर्ता

हरिविजय सर्वसेनानें रचलें अशी माहिती आनंदवर्धनाच्या ध्वन्यालोकावरून आपणास मिळते. तथापि सर्वसेन वाकाटक नृपति होता हें अद्यापपर्यंत माहीत नव्हतें. वक्रोक्तिजीवितकार कुंतक यानेहि सर्वसेनाचा उल्लेख केला आहे; पण त्यानेहि तो राजा होता असें म्हटलेलें नाही. तेव्हा केवळ नामसादृश्यावरून तो वाकाटक नृपति होता असें मानणें योग्य होणार नाही अशी शंका कदाचित् उत्पन्न होईल. सुदैवानें या बाबतींत निर्णायक पुरावा उपलब्ध आहे. सुप्रसिद्ध संस्कृत कवि दण्डी याचें अवन्तिसुन्दरीकथा नामक गद्यकाव्य सुमारें वीस वर्षांपूर्वी दक्षिण-भारती-ग्रंथमालेंत प्रसिद्ध झालें आहे; त्याच्या आरंभीं प्राचीन कवींच्या स्तुतिपर असे काही प्रास्ताविक श्लोक आढळतात, त्यामध्ये सर्वसेनाविषयी खालील श्लोक आला आहे—

राज्ञा श्रीसर्वसेनेन . . . . . . . ।<br>
. . . . . . . . . विजयं हरेः ॥

---

* 'तत्रास्ति मनोजन्मनो देवस्य क्रीडावासो विदर्भेषु वत्सगुल्मं नाम नगरम् । '—राजशेखर, काव्यमीमांसा, ( गायकवाड-प्राच्यग्रंथ-माला, पृ. १० ).

या ग्रंथाचें एकच हस्तलिखित प्राप्त झालें आहे व त्याचा पुष्कळ भाग किड्यांनी खाऊन टाकला असल्यामुळे वाचता येत नाही. वरील श्लोकाचाहि बराच भाग वरील कारणाने नष्ट झाला आहे; तथापि सुदैवाने त्यातील अत्यंत महत्त्वाचा भाग अवशिष्ट राहिला आहे, त्यावरून हरिविजय काव्य सर्वसेन नामक राजाने रचलें होतें ही अन्यत्र दुष्प्राप्य अशी माहिती मिळते. या पद्यमय प्रस्तावनेंतील इतर कविप्रशंसापर श्लोकांचें निरीक्षण केल्यास ते त्या कवींच्या कालक्रमानुसार घातले आहेत असें ध्यानात येतें. या श्लोकामध्ये सर्वसेनाच्या स्तुतीचा श्लोक भासाच्या प्रशंसेनंतर व कालिदासाच्या स्तुतीच्या पूर्वी घातला आहे. यावरून सर्वसेन हा भासानंतर व कालिदासापूर्वी होऊन गेला असावा असें अनुमान करता येतें.

भारतीय इतिहासात आपणास एकच सर्वसेन ज्ञात आहे. तो वाकाटकांच्या वत्सगुल्म शाखेचा संस्थापक होता हें मागे दाखविलें आहे. तो इ. स. ३३० ते ३५० या काळात होऊन गेला असावा. अर्थात तो इ. स. ४०० च्या सुमारास होऊन गेलेल्या कालिदासापेक्षा प्राचीन होता यात संशय नाही व हेंच अवन्तिसुन्दरी कथेतील प्रास्ताविक श्लोकाच्या क्रमावरूनहि दिसतें. तेव्हा वाकाटक नृपति सर्वसेन हाच हरिविजय काव्याचा कर्ता होता असें निर्विवादपणें म्हणता येतें.

## 'हरिविजया'चें कथानक

आता हरिविजय काव्याविषयी काय माहिती मिळते तें पाहू. या हरिविजय काव्याचा उल्लेख अनेक संस्कृत कवींनी व आलंकारिकांनी केला आहे काहींनी त्यातील पद्येंहि उद्धृत केलीं आहेत, तर काहींनी त्यातील वर्ण्यविषयाचा निर्देश केला आहे. इ. स. च्या सातव्या शतकातल्या दण्डीने केलेली प्रशंसा मागे दिली आहे. पण तो श्लोक आता अत्यंत त्रुटित झाल्यामुळे त्यावरून आपणास जास्त माहिती मिळत नाही. यानंतर नवव्या शतकातला विख्यात आलंकारिक आनंदवर्धन याने हरिविजयाचा उल्लेख अनेक ठिकाणीं केला आहे. "कवीने एखादें ऐतिहासिक कथानक आपल्या काव्याचा विषय म्हणून पसंत केलें

असल्यास त्यातील इष्टरसविरोधी प्रसंग गाळून तद्रसपरिपोषक अशा काल्पनिक घटनांची योजना करावी.* कारण, कवीला आपल्या काव्यामध्ये रसोत्पत्ति करावयाची असते, इतिहास शिकवावयाचा नसतो," असा उपदेश आनंदवर्धनाने केला आहे. व याची उदाहरणें म्हणून कालिदासाच्या प्रबंधाचा व सर्वसेनकृत हरिविजयाचा निर्देश केला आहे हरिविजयात वर्णिलेलें मूळ ऐतिहासिक कथानक कोणतें, त्यातील कोणता भाग सर्वसेनाने गाळला व कोणते प्रसंग नवीन घातले ही माहिती आनंदवर्धनाच्या ग्रंथावरून आपणास मिळत नाही; पण ती त्याचा टीकाकार सुविख्यात काश्मीरी ग्रंथकार अभिनवगुप्त याच्या टीकेंतील एका विधानावरून आपणास मिळते अभिनवगुप्त म्हणतो, 'हरिविजयात पारिजातहरणाचा प्रसंग पत्नीच्या अनुनयाकरिता योजिला आहे; पण इतिहासावरून तसें दिसत नाही.'† या विधानावरून श्रीकृष्णाने इंद्रावर स्वारी करून पारिजात वृक्ष भूतलीं आणला, या कथानकावर हरिविजय काव्याची रचना झाली होती हें उघड आहे. या कथानकाचें मूळचें रूप काय होतें तें निश्चितपणें सांगतां येत नाही. महाभारतात दोन ठिकाणीं‡ श्रीकृष्णप्रशंसेंत पारिजातहरणाचा उल्लेख आला आहे; पण तेथे तें सत्यभामेच्या अनुनयाकरिता केलें होतें असा निर्देश नाही. सध्याच्या हरिवंशाच्या मुंबई–पाठात या कथेचीं दोन रूपें दिसतात. पहिलें रूप विष्णुपर्वाच्या ६४ व्या अध्यायांत आढळतें. त्यांत वर्णिलें आहे की, श्रीकृष्ण नरकासुराचा वध करून सत्यभामेसह स्वर्गांत गेला. तेथे इंद्राच्या उद्यानात पारिजातक वृक्ष पाहून त्याने तो उपटून

* इतिवृत्तवशायातां कथञ्चिद्रसाननुगुणां स्थितिं त्यक्त्वा पुनरुत्प्रेक्ष्याप्यभीष्टरसोचितकथोन्नयो विधेयः यथा कालिदासप्रबन्धेषु। यथा च सर्वसेनविरचिते हरिविजये। —ध्वन्यालोक, तृतीयोद्द्योत.

† हरिविजये कान्तानुनयाङ्गत्वेन पारिजातहरणादि निरूपितमितिहासेष्वदृष्टमपि। —ध्वन्यालोकलोचन, तृतीयोद्द्योत.

‡ उद्योगपर्व, अ. १६०, श्लो ४९; द्रोणपर्व, अ ११, श्लो २२-२३.

गरुडावर घातला व आपल्याबरोबर द्वारकेस आणला. मागाहून इंद्राला तें समजल्यावर त्यानें त्या कृत्याला संमति दिली पारिजातहरणाच्या कथेचें हें साधें रूप प्राचीन दिसतें व एका श्लोकावरून (द्रोणपर्व, अ. ११, श्लो. २३) हेंच रूप महाभारत-कर्त्यालाहि माहीत होतें असें दिसतें. याच कथेचें दुसरें विस्तृत रूप हरिवंशाऱ्या ६५–७५ या अकरा अध्यायात वर्णिलें आहे व तेंच आपणा सर्वांना परिचित आहे ती कथा अशी :— "एके दिवशीं नारदाने स्वर्गीय पारिजाताचीं फुलें कृष्णास अर्पण केलीं, तीं त्यानें रुक्मिणीस दिलीं तें समजल्यावर सत्यभामा रागावली. तिला प्रसन्न करण्याकरिता कृष्णानें पारिजात वृक्ष स्वर्गातून खालीं आणण्याचें तिला वचन दिलें व इंद्राचा पराजय करून तें पार पाडलें" मूळ कथानकात प्रियानुनय हें पारिजातहरणाचें कारण म्हणून दाखविलें नव्हतें, त्या प्रसंगाची योजना सर्वसेनानें प्रथम आपल्या हरिविजय काव्यात रसोत्पत्तीकरिता केला हें अभिनवगुप्ताच्या टीकेवरून स्पष्ट दिसतें पुढे तो प्रसंग हरिवंशादि ग्रंथात घातला गेला असावा कालिदासाच्या शाकुंतलातील कांही प्रसंग व शारद्वत, शार्ङ्गरव, प्रियंवदा, गौतमी इत्यादि पात्रेंहि पद्मपुराणात घेतलेलीं आढळतात, तशाच प्रकार याहि बाबतींत झालेला दिसतो.

## 'हरिविजया'संबधींचे उल्लेख

आनन्दवर्धनानें दुसऱ्या एका ठिकाणीं हरिविजयाचा उल्लेख केला आहे. ध्वनिकाव्याच्या एका प्रकाराचें उदाहरण देताना त्यानें खालील गाथा हरिविजयातील म्हणून दिली आहे*:—

> चूअङ्कुरावअंस छणपसरमहग्घमणहरसुरामोअम ।
> असमप्पिअ पि गहिअ कुसुमसरेण महुमासलच्छिमुहम् ॥

---

* ध्वन्यालोक (हरिदास-संस्कृतग्रंथमाला) पृ २९८ छाया—चूताङ्कुरावतंस क्षणप्रसरमहार्घमनोहरसुरामोदम्। असमर्पितमपि गृहीत कुसुमशरेण मधुमासलक्ष्मीमुखम् ॥

कृष्ण म्हणतो, 'कृशोदरि सत्यभामे! मी रुक्मिणीला पारिजातपुष्पें दिलीं म्हणून तू रागावलीस आता तुला प्रसन्न करण्याकरितां मी तींच पुष्पें तुला आणून दिलीं तर माझें कृत्य तुझ्यावरील माझ्या प्रेमाला व माझ्या अपराधाला साजेसें होणार नाही;' म्हणून 'मी पारिजात वृक्षच आणून तुझ्या अंगणात लावतों' असा कृष्णाचा अभिप्राय दिसतो.

यानंतर अकराव्या शतकातल्या अभिनवगुप्तालाहि हरिविजय काव्य माहीत होतें हें मागे दाखविलें आहेच. तदुत्तरकालीन बाराव्या शतकात होऊन गेलेल्या हेमचन्द्रानें तर आपल्या काव्यानुशासनावरील टीकेंत हरिविजयाचा टिकठिकाणी उल्लेख केला आहे* त्यावरून त्या काव्या-विषयी खालील माहिती मिळते.—

हरिविजय हें काव्य आरंभापासून अखेरपर्यंत एकाच स्कन्धक नामक छंदात रचलें होतें त्यात काही ठिकाणी दिसणाऱ्या गलितक छंदांतील गाथा दुसऱ्या कोणी तरी प्रक्षिप्त केलेल्या होत्या. त्याच्या प्रत्येक सर्गाच्या शेवटच्या गाथेंत 'उत्साह' शब्द ग्रथित केला होता त्याचें कथानक सत्यभामेला प्रसन्न करण्याकरिता इन्द्राचा पराजय करून कृष्णानें पारि-जात वृक्ष स्वर्गांतून भूमीवर आणला असें होतें कृष्णानें प्रथम सात्यकीला आपला निसृष्टार्थ दूत म्हणून शिष्टाई करण्याकरितां इन्द्राकडे पाठविलें; पण इन्द्र त्याचें ऐकेना म्हणून त्यानें त्याच्यावर स्वारी केली. हरिविजयात नगरवर्णन, नायकवर्णन, वसन्तऋतुवर्णन, सूर्यास्तवर्णन, वाहनवर्णन इत्यादि विषय आले होते.

वरील विवेचनावरून हरिविजय काव्य प्राकृतात असलें तरी रघु-वंश, किरातार्जुनीय, शिशुपालवध इत्यादि संस्कृत महाकाव्यांप्रमाणेंच त्याचें स्वरूप होतें व महाकाव्यात जरूर असणाऱ्या सर्व विषयांचें वर्णन त्यात आलें होतें हें दिसून येईल. किंबहुना हें काव्य विद्यमान सर्व संस्कृत व प्राकृत काव्यांत प्राचीनतम असल्यानें त्यानेंच महाकाव्य-रचनेची प्रथा पाडून दिली असावी असेंहि अनुमान करण्यास हरकत नाही.

* काव्यानुशासन (स. र. द्दा. पारीख) भाग १, पृ. ४५७–४६१.

दुर्दैवाने हें काव्य सध्या उपलब्ध नाही. कांही वर्षांपूर्वी कै. रा. ब. हिरालाल यानी मध्यप्रातवऱ्हाडातील हस्तलिखित ग्रंथाची यादी प्रसिद्ध केली. तींत सर्वसेनाच्या हरिविजयाचें हस्तलिखित नागपूरकर भोसले राजाच्या संग्रहीं आहे असा निर्देश होता.* म्हणून भोसले राजाच्या परवानगीने मी दोन्ही पार्तीचें हस्तलिखितसंग्रह चाळून पाहिले. पण त्यात तें हस्तलिखित दिसलें नाही. रा. ब. हिरालाल यानींहि तें पाहिलें असावें असें वाटत नाही. हस्तलिखिताची यादी करण्याकरिता नेमलेल्या गृहस्थाने भोसल्याच्या सग्रहात श्रीधरकविकृत मराठी हरि-विजयाच्या पोथ्या पाहून हरिविजयाचें नाव त्याना कळविलें असावें व त्यांनी ऑफ्रेक्टच्या हस्तलिखित ग्रंथसूचीचा उपयोग करून तें हरिविजय काव्य सर्वसेनकृत आहे असा निर्देश आपल्या सूचींत केला असावा. पण ही चूक होता हें वरील विवेचनावरून दिसून येईल. प्रस्तुत लेखात गोळा केलेल्या माहितीवरून तें हरिविजय काव्य कोणाच्या सग्रहीं असल्यास त्यास तें प्रकाशित करण्याची सुबुद्धि होईल अशी मला आशा आहे.

### सर्वसेनानें केलेली प्राकृतसुभाषितरचना

सर्वसेनानें केवळ हरिविजय काव्यच लिहिलें नसून कांही प्राकृत सुभाषितेंहि रचलीं होतीं असें दिसतें. गाथासप्तशती किंवा सत्तसई नामक प्राकृतसुभाषितसंग्रह प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ इ. स. च्या पहिल्या-दुसऱ्या शतकात होऊन गेलेल्या हाल नामक सातवाहनवंशी राजानें रचला अशी परंपरागत समजूत असली तरी त्यांत अनेक उत्तरकालीन कवींच्या गाथा समाविष्ट झाल्या आहेत हें त्यातील कविनामांच्या उल्लेखांवरून स्पष्ट दिसतें. निर्णयसागरने छापलेल्या गाथासप्तशतींतील कविनामांच्या सूचींत सर्वसेनाचें नांव दिसत नाही. पण अलीकडे पंजाबमध्ये सप्तशतीच्या कांही भागावरील पीतांबराची टीका छापली आहे तिजवरून निर्णयसागर-प्रतींतील क्रमांक ५०४ व ५०५ या गाथा सर्वसेनानें रचल्या होत्या असें दिसतें. भुवनपाल नामक दुसऱ्या

* डॉ. हिरालालकृत मध्यप्रांतवऱ्हाडमधील संस्कृत व प्राकृत हस्तलिखिताची यादी, पृ. १९९.

एका टीकाकाराने २१७ व २३४ या आणखी दोन गाथा सर्वसेनाच्या नावावर दिल्या आहेत.* यावरून सर्वसेनाने प्राकृतसुभाषितेंहि रचलीं होतीं व त्यांतील काही गाथासप्तशतींत घेतलीं गेलीं असें स्पष्ट दिसतें. या सुभाषितांतहि सर्वसेनाचे प्रतिभा, मार्मिक निरीक्षण व समर्पक शब्दयोजना इत्यादि गुण आढळतात. उदाहरणार्थ एक गाथा घेऊं:—

जस्स जहं विअ पढमं तिस्सा अंगम्मि णिवडिआ दिट्ठी ।
तस्स तहिं च्चेअ ठिआ सव्वंगं केण वि ण दिट्ठम् ॥

एका अत्यंत सुंदर स्त्रीला पाहून येण्यासाठी पाठविलेल्या आपल्या सहचरांना नायकानें तिच्या रूपाविषयीं विचारलें असतां ते म्हणतात, 'आमच्यापैकीं प्रत्येकाची तिच्या अवयवावर जेथे प्रथम दृष्टि पडली तेथेच ती खिळून राहिली. तिचें समग्र रूप कोणीच पाहिलें नाही.' शब्दयोजना सारीच पण किती अर्थवाही आहे!

समुद्रगुप्त, चंद्रगुप्त, प्रवरसेन, हर्ष, मुंज, भोज इत्यादि प्रथितयश भारतीय राजांच्या मालिकेमध्ये सर्वसेनाचें स्थान आहे या राजांप्रमाणे सर्वसेनानेंहि आपल्या काव्यनिर्मितीने उज्ज्वल कीर्ति मिळविली होती. सामान्यतः एकत्र न राहणाऱ्या लक्ष्मी व सरस्वती या देवतांचें मधुर मीलन त्याच्या ठिकाणीं झालें होतें. त्याच्या काळानंतर सातआठशें वर्षें इ. स च्या बाराव्या शतकापर्यंत त्याचें काव्य लोकप्रिय होतें. पुढे प्राकृत भाषा हळूहळू दुर्बोध होत चालल्यामुळे हरिविजय काव्य मागें पडलें व कालांतराने सर्वसेनाचें नावहि लोकांच्या स्मरणांतून गेलें. प्रस्तुत लेखांत त्याच्या प्रथावरचा विस्मृतीचा पडदा किंचित् दूर करण्याचा प्रयत्न केला आहे यापुढे या प्रथितयश आद्य प्राकृत कवीविषयीं उत्तरोत्तर जास्त माहिती उपलब्ध होऊन त्याच्या सुंदर काव्याचीं हस्तलिखितें प्रकाशांत येतील अशी आशा व्यक्त करून हा लांबलेला लेख पुरा करतों.

---

* वेबरकृत Indische Studien या ग्रंथमालेचा भाग १६ वा, पृ २३ हे गाथांचे क्रमांक निर्णयसागर–आवृत्तीप्रमाणें आहेत.

# शालिवाहन शकाची पूर्वपीठिका*

दक्षिण हिंदुस्थानच्या बऱ्याचशा भागात सध्या प्रचलित असलेला शालिवाहन शक इ. स. च्या पहिल्या शतकात शालिवाहन नामक राजाने स्थापला अशी परंपरागत समजूत आहे. हा शालिवाहन पैठण नगरीं राज्य करीत होता असेही मानण्यात येतें. पुराणें, कथासरित्सागर व बृहत्कथा-मंजरी यासारखे संस्कृत ग्रंथ आणि जैनांचे कल्पप्रदीप व निर्युक्ति इत्यादि टीकाग्रंथ यात पैठणच्या सातवाहन राजाच्या कथा आल्या आहेत तो सातवाहन व शकसंस्थापक शालिवाहन एकच होत असेंहि म्हणतात. सातवाहन हें कुलनाम होतें हें कुल सातवाहन नामक राजापासून निघालें असल्याने त्याचें नाव त्या कुळाला देण्यात आलें असावें चार-पांच वर्षांपूर्वीपर्यंत हा सातवाहन पूर्णपणें अज्ञात होता पण अलीकडे त्याचीं तीन नाणीं हैद्राबाद संस्थानात औरंगाबाद, मेढक व वारंगळ जिल्ह्यात सापडलीं आहेत. त्यावरील अक्षरवटिकेवरून तो सम्राट् अशोकानंतर लौकरच होऊन गेला असें दिसतें. पण या सातवाहन राजाने किंवा त्याच्या कोणी वंशजानें सध्या दक्षिणेंत प्रचलित असलेला शालिवाहन शक चालू केला, असें दिसत नाही. कारण तसें असतें तर या वंशाच्या एखाद्या तरी कोरीव लेखात या शककाला अनुसरून कालगणना केली असती. पण सातवाहनाच्या एकाहि लेखात या काळाचा उल्लेख नाही. शालिवाहन राजाचें नावहि इ. स. च्या तेराव्या शतकात म्हणजे या संवताच्या स्थापनेपासून सुमारें बाराशें वर्षांनंतर यादवनृपति कृष्ण याच्या मांडलिकाच्या एका ताम्रपटात त्याशीं संलग्न झालेलें प्रथम आढळतें. †

---

* 'नवभारत', पुणे, जानेवारी १९५१

† तासगाव ताम्रपट शके ११७२ ( इ. स. १२५० ) पाहा. 'दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधनें,' खंड ३, पृ ६५

त्यापूर्वीच्या सर्व लेखांत या संवताला 'शककाल' किंवा 'शकनृपकाल' म्हटलें आहे व त्याच्या वर्षांना 'शकवर्ष', 'शकनृपतिसंवत्सर' किंवा 'शकनृपतिराज्याभिषेकसंवत्सर' असें उल्लेखिलें आहे तेव्हां हा काल कोणा शकनृपतीने चालू केला असून कित्येक शतकानंतर शालिवाहनाचें नाव त्याला जोडण्यात आलें हें स्पष्ट आहे.

या कालाचा संस्थापक शक राजा कोण होता व तो कोठे होऊन गेला याविषयी विद्वानांत मतभेद आहेत. तथापि, पुष्कळ संशोधकांच्या मतें तो कुशानवंशी कनिष्क असावा. या कनिष्काचें विस्तृत साम्राज्य उत्तर हिंदुस्थानांत वायव्यप्रांतापासून मगधापर्यंत पसरलें होतें. यानें स्थापिलेल्या शकाचा उपयोग त्याच्या हुविष्क, वासुदेव इत्यादि वंशजांनी आपल्या लेखांत केला आहे. हे राजे शकवंशी नसून कुशानवंशी होते हें खरें; पण इतर भारतीय संवतांप्रमाणे या संवताचें 'शक' हें नाव आरंभीच्या लेखांत येत नाही. तें पांचशें वर्षांनंतरच्या लेखांत प्रथम आढळतें. आभीरांनी स्थापिलेल्या संवताला जसें पुढे कलचुरि राजांनी त्याचा उपयोग केल्यामुळे 'कलचुरि' हें नाव प्राप्त झालें, तसेंच या संवताचा पुढे शक राजांनी उपयोग केल्यामुळे त्याला 'शक' हें नाव पडलें असावें.

कुशानवंशाचा अंत झाल्यावर उत्तरेंत या संवताचा हळूहळू संकोच होत गेला. मध्य हिंदुस्थानांत राज्य करणाऱ्या शक राजांचे काही कोरीव लेख अलीकडे सापडले आहेत; त्यांत एका विशिष्ट संवताचा उपयोग केलेला आढळतो तोहि हा शकसंवतच असावा हें प्रस्तुत लेखकाने इतरत्र दाखविलें आहे.* गुप्त-सम्राट् समुद्रगुप्तानें या राजांचा उच्छेद केल्यावर या संवताचा मध्यहिंदुस्थानांतहि लोप झाला. त्यानंतर माळवा व काठेवाड या प्रांतांत राज्य करणाऱ्या क्षत्रपांच्या कोरीव लेखांत व नाण्यांवर या संवताचीं वर्षें दिलीं आहेत. हीं वर्षें शक संवताचीं होत याविषयीं विद्वानांचें ऐकमत्य आहे. कांहींच्या मतें तर या क्षत्रपांचा मूळ पुरुष चष्टन हाच या संवताचा उत्पादक असावा. पण हें

---

* 'एपिग्राफिया इंडिका', पु २५, पृ २९७.

मत योग्य दिसत नाही. कारण चष्टन किती झालें तरी 'महाक्षत्रप' म्हणजे प्रांताधिपति होता; तेव्हा तो कोणत्या तरी सम्राटाचें स्वामित्व कबूल करीत होता यात संशय नाही. त्याला स्वतःचा सवत् चालू करण्याचें स्वातंत्र्य नव्हतें. बहुधा त्याचा सम्राट् कनिष्कच असावा व म्हणून कनिष्काने स्थापिलेला सवत् त्याचा प्रांताधिपति चष्टन याच्या व त्याच्या वंशजाच्या लेखात उल्लेखिला आहे, हें मतच सयुक्तिक दिसतें. क्षत्रपाचा उच्छेद द्वितीय चंद्रगुप्त विक्रमादित्याने इ. स. च्या चौथ्या शतकाच्या अखेरीस केला. त्यानंतर शक संवताचें उत्तर हिंदुस्थानातून पूर्णपणें उच्चाटन झालें व त्याची जागा प्रथम गुप्तसंवत् व नंतर विक्रमसंवत् यानी बळकाविली.

दक्षिणेंत मात्र या शकसंवताने आपले पाय हळूहळू पसरले. भूमक व नहपान या दोन परकी क्षत्रपाचें राज्य उत्तर महाराष्ट्रावर काही काळ होतें. नहपानाच्या लेखातील ४२ ते ४६ हीं वर्षे या शकसवताचींच असावीं. या नहपानाचे लेख नासिक, कार्ले वगैरे ठिकाणीं सापडले आहेत. सातवाहनवंशी गौतमीपुत्राने या नहपानाचा पराभव केला व त्याच्या क्षहरातवंशाचा समूळ उच्छेद केला. त्यानंतर इ. स. च्या दुसऱ्या शतकात हा शकसवत् काही काळ महाराष्ट्रातून लुप्त झाला व त्याची जागा आभीरानी सुमारें इ. स. २५० मध्ये स्थापिलेल्या एका दुसऱ्याच सवताने घेतली. आभीरांच्या साम्राज्यविस्ताराबरोबर त्याच्या सवताचा प्रसार उत्तर महाराष्ट्र, कोंकण व गुजरात या प्रांतात झाला. पुढे कलचुरि राजानी त्याचा पुरस्कार केल्यामुळे तो विदर्भांतहि काही काळ प्रचलित झाला. इ. स. च्या सातव्या शतकात बदामीच्या चालुक्यानी कलचुरींचा पराभव केल्यावर या आभीर किंवा कलचुरि सवताचें दक्षिणेंतून हळूहळू कायमचें उच्चाटन झालें.

यानंतर बदामीच्या चालुक्यानी शकसवताचा पुरस्कार केला. मागे सांगितल्याप्रमाणे इ. स. च्या दुसऱ्या शतकात हा सवत् उत्तर महाराष्ट्रातून लुप्त झाला होता. यानतरचें या संवताचें पहिलें शाव वर्ष ४६५ (इ. स. ५४३) हें चालुक्य सम्राट् प्रथम पुलकेशी याच्या बदामी येथील

वंशातील राजाचीं आहेत.* यापैकीं एक नाणें हैदराबाद शहराच्या उत्तरेस मेदक जिल्ह्यातील कोंडापूर येथे सापडलें होतें. या ठिकाणीं सातवाहन राजाच्या काळचे विस्तृत अवशेष सापडले आहेत. हें नाणें शिशाचें असून त्याच्या पुढील भागावर सिंहाची आकृति आहे. हेंहि नाणें सातवाहनाच्या नाण्यासारखें आहे. या नाण्यावरचें राजनाम खंडित आहे. तथापि 'माण महसस' अशीं अक्षरें वाचतां येतात. त्यावरून हें नाणेंहि त्याच शकवंशी मान राजाने पाडलें होतें यात संशय नाही.

दुसरें नाणें हैदराबाद संस्थानच्या दक्षिणेतील रायचूर जिल्ह्यातील मस्की येथे उत्खननात सापडलें. येथे अशोकाचा शिलालेख सापडला असल्याने हें गाव संशोधकांत सुपरिचित आहे. हेंहि नाणें शिशाचें असून त्याच्या पुढील भागावर घोड्याची आकृति आहे. त्याच्या सभोंवारचें राजनाम खंडित आहे तथापि 'सदस महसस' अशीं अक्षरें वाचता येतात. त्यावरून हें नाणें महिष वंशातीलच एका राजानें पाडलें असून त्याच्या नावाच्या शेवटीं 'सदस्' असा शब्द होता असें दिसतें. या राजाचीं आणखी नाणीं सापडल्याशिवाय हें राजनाम पूर्ण करणें शक्य नाही.

महिष हें वंशनाम माहिषक या देशनामावरून पडलें असावें या माहिषक देशाचा उल्लेख रामायण, महाभारत व पुराणें यात अनेक ठिकाणीं येतो रामायणामध्ये सीतेच्या शोधाकरिता सुग्रीवाने भिन्न भिन्न दिशास वानर पाठविल्याचें वर्णन आहे दक्षिणच्या देशामध्ये 'विदर्भान् ऋषिकांश्चैव रम्यान् माहिषकानपि' असें विदर्भ व ऋषिक (खानदेश) देशाबरोबर माहिषक देशाचें नाव आलें आहे. महाभारतांत तर माहिषकाचें नाव भीष्मपर्व, कर्णपर्व, आनुशासनिकपर्व, आश्वमेधिकपर्व इत्यादि अनेक पर्वांत आढळतें.† त्यावरून माहिषक देश द्रविड, कालिंग, आन्ध्र व महाराष्ट्र या देशाप्रमाणेच दक्षिणेंत होता असें दिसतें; किंबहुना

* 'जर्नल ऑफ दि न्यूमिस्मॅटिक सोसायटी ऑफ इंडिया', पु ११, पृ १

† 'ज. न्यू. सो. ऑ. इं ' पु ११, पृ ४

या देशावरोवर त्याचें नाव आल्याने त्या देशाजवळच तो असावा अर्सेहि अनुमान करतां येतें. मागे वर्णिलेली नाणीं हैदराबाद संस्थानच्या दक्षिण भागात सापडलीं असल्याने त्या भागाचें प्राचीन नाव माहिषक होतें असें अनुमान केल्यास तें बहुधा चूक होणार नाही.

मागें वर्णिलेल्या नाण्यावरून मान राजा या प्रदेशावर राज्य करीत होता असें दिसते. पुराणात त्या ऐतिहासिक काळातील थोडया राजाचा नामनिर्देश आहे त्यापैकी तो एक आहे. त्यावरून तो बराच बलाढय असावा व त्याचें राज्यहि बरेंच विस्तृत असावें. या भागात त्याच्या वंशजाचें राज्य कित्येक पिढया चाललें होतें. पुराणात म्हटलें आहे की, आन्ध्र किंवा सातवाहन वंशाचा अस्त झाल्यावर अनेक राज्यें उदयास आलीं. त्यापैकी एक शकराज्य होतें. हे शक राजे अठरा असून त्यानी ३८० वर्षे राज्य केलें, असें पुराणे सांगतात. या वर्षांच्या सख्येत चूक असावी व खरी सख्या १८३ वर्षे असावी असें पार्टिजरसाहेबाचें म्हणणें आहे.* तें खरें असल्यास या अठरा शक राजानी सुमारें इ. स. २५० ते ४३३ या काळात राज्य केलें असावें.

या दक्षिणेतील शक राजाचे कोरीव लेख अद्यापि सापडले नाहीत. तथापि, वनवासीच्या कदंबनृपतींचा मूळ पुरुष मयूरशर्मा याने शकस्थान नामक प्रदेश जिंकला असल्याचें म्हैसूर संस्थानातील चंद्रवल्ली येथील प्रस्तरलेखात म्हटलें आहे हें शकस्थान कदंबाच्या राज्यापासून फार दूर नसून दक्षिणेंतच असावें. कदंबाचें राज्य धारवाड जिल्ह्याच्या दक्षिणेस उत्तर कानडा प्रांतावर होतें. तेव्हा त्यानी जिंकलेलें शकस्थान माहिषकच असावें असें अनुमान करण्यास हरकत नाही.

या शकराजानी आपला संवत् माहिषक देशात व त्या सभोवारच्या आपल्या राज्यातील इतर भागात प्रचलित केला होता असें दिसतें; तेव्हा हा संवत् विजापूर, बेळगाव, धारवाड या जिल्ह्यात प्रचलित असावा. या कर्नाटक जिल्ह्यातील चालुक्यपूर्वकालीन कोरीव लेख सापडल्यास त्यांत या संवताचा उल्लेख आढळेल अशी अपेक्षा आहे.

---

* पार्टिजरकृत 'कलियुगातील राजवंश', प्रस्तावना, पृ. २४.

लेखात आढळतें. चालुक्यांचें साम्राज्य इ. स. च्या सातव्या शतकांत महाराष्ट्र, कोंकण, गुजरात, विदर्भ व आंध्र या प्रांतावर पसरलें त्याबरोबर शकसंवताच्या प्रसारहि दक्षिणेत या प्रांतात झाला तेव्हापासून आजपर्यंत हा संवत् या प्रांतात अविच्छिन्नपणे प्रचलित आहे.

इ. स. च्या दुसऱ्या शतकापासून सहाव्या शतकापर्यंतच्या काळांतले मात्र या संवताचे लेख अद्यापि सापडले नाहीत. या काळात या संवताचा उपयोग कोण करीत होते हा प्रश्न अद्यापि अनिर्णीत आहे. त्याविषयी थोडी नवीन माहिती प्रस्तुत लेखात देण्याचा प्रयत्न केला आहे.

इ. स. च्या सहाव्या शतकापासून बदामीच्या चालुक्यांनी या संवताचा पुरस्कार केला खरा पण याला ते आपला संवत् मानीत नव्हते. तर तो शकाचा किंवा शकराजाचा संवत् होता असा स्पष्ट निर्देश त्यांच्या, त्याचप्रमाणे त्यांच्या मांडलिकांच्याहि, सर्व लेखात आढळतो तेव्हा चालुक्यांच्या उदयापूर्वी हा संवत् कोणा शकराजानी उपयोजिला असून आपल्या प्रांतात तो पूर्वीपासून प्रचलित असल्यामुळेच चालुक्यांनी त्याचा पुरस्कार केला, हें उघड आहे चालुक्यांचे मांडलिक उत्तर महाराष्ट्र, कोंकण व गुजराथ येथे राज्य करू लागले, तेव्हा प्रथम काही काळ त्या प्रांतात पूर्वी प्रचलित असलेल्या आभीर-कलचुरि संवताचा त्यांनी उपयोग केला, यावरूनहि वरील अनुमान युक्त दिसेल

पण बदामीच्या किंवा विजापूर जिल्ह्याच्या जवळपास शक राजाचा अमल चालुक्यांच्या उदयापूर्वी होता याला काही पुरावा आहे काय, असा प्रश्न येथे उपस्थित होतो. या प्रश्नाचें उत्तर अलीकडे हैदराबाद संस्थानात सापडलेल्या चार नाण्यावरून देता येतें. यांपैकी दोन नाणीं हैदराबादचे नाणकसंग्राहक श्री. हुरमुज कौस यांच्या संग्रहातील आहेत तीं तीन वर्षांपूर्वी प्रस्तुत लेखकाने 'इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टर्ली' (पु २२, पृ. २४ ६) या सुप्रसिद्ध संशोधन त्रैमासिकात प्रसिद्ध केलीं हीं नाणीं सातवाहनांच्या नाण्यांसारखी आहेत. त्यांवर पुढच्या बाजूस सोंड वर केलेला हत्ती असून मागील बाजूस उज्जयिनी चिन्ह ( एकावर एक आडवे–उभे ठेवलेले डबेल्स ) आहे हत्तीच्या



मान
राजाचे
नाणे



पुढील बाजू मागील बाजू

समोवार राजनाम आहे. कोणत्याहि एका नाण्यावर हें पूर्णपणें दिसत नाही, पण दोन्ही नाण्यांवरची अक्षरें एकत्रित केली असता तें रञो सिरिसगमानमहमस' असें पूर्ण करता येतें. हें नाम तत्कालीन प्राकृत भाषेत असून अक्षराची लिपि इ. स. च्या दुसऱ्या तिसऱ्या शतकातील आहे. नाण्यावरच्या शब्दाचा अर्थ, 'हें नाणें राजा श्रीशकमानमहिष याचें' असा होतो. पुराणात या राजानें नाव खालील ओळींत आलें आहे. 'शक्यमानाभवद्राजा महिषीणा महीपतिः।'* पुराणाच्या पाठात अनेक लेखकांच्या अनवधानामुळे किंवा अज्ञानामुळे पुष्कळ चुका झालेल्या आढळतात. वरील ओळीचा मूळचा पाठ 'शकमानोऽभवद्राजा महिषाणा महीपतिः' असा असावा. त्याचा अर्थ 'महिषाचा राजा शक मान होऊन गेला' असा आहे. तेव्हा हीं नाणीं शकवंशी मान राजाचीं होतीं, असें स्पष्ट दिसतें. त्याला पुराणात 'महिषाचा राजा' म्हटलें आहे. या नाण्यावरहि त्याला महिष असें विशेषण लावलें आहे. त्यावरून तो माहिषक देशावर राज्य करीत होता असें दिसतें. या माहिषक देशाचा उल्लेख दक्षिणेंतील विदर्भ व ऋषिक (सध्याचा खानदेश) या देशाबरोबर रामायणात केला आहे. त्याविषयी विवेचन पुढे करू.

गतवर्षी (मे १९४९ मध्ये) हैद्राबाद संस्थानच्या पुराणवस्तु-संशोधन-खात्याचे डायरेक्टर श्री. ख्वाजा मुहम्मद अहमद यानी काही नाण्यांचे फोटो वाचनार्थ मजकडे पाठविले. त्यापैकी दोन नाणीं या

* पार्जिटरकृत 'कलियुगातील राजवंश' (इंग्रजी), पृ. ५१.

इ. स. च्या सहाव्या शतकात बदामीच्या चालुक्यांचा उदय झाला. त्यानी आपल्या लेखात या संवताचा उपयोग केला आहे याचें कारण त्याच्या देशात तो पूर्वीपासून चालू होता, हें होय. राज्यक्रांति झाली तरी लोकांच्या अंगवळणीं पडलेली कालगणनापद्धति एकदम बदलत नाही आभीर, कलचुरि, गुप्त, हूण याचे संवत् त्यांचें साम्राज्य नष्ट झाल्यावरहि कित्येक शतकें चालू होते याचें कारणहि हेंच आहे. इंग्रजाचें राज्य गेल्यावरहि आपण त्याच्या खिस्ती शकाचा उपयोग करीत आहोंच असो.

चालुक्यानी शकसंवताचा उपयोग केला असला तरी त्यानी तो संवत् आपला नसून शकाचा किंवा शकराजाचा होता असा स्पष्ट निर्देश आपल्या सर्व लेखात केला आहे चालुक्याचें साम्राज्य द्वितीय पुलकेशी-च्या कारकीर्दीत महाराष्ट्र, कोंकण, विदर्भ, गुजराथ, आंध्र या प्रातावर पसरलें यापैकी पहिल्या चार प्रातात त्याकाळीं आभीर किंवा कलचुरि संवताचा प्रचार होता. चालुक्यवंशी राजानी किंवा त्याच्या मांडलिकानी आपल्या आरंभीच्या लेखात त्याच संवताचा उपयोग केला आहे पण पुढें हळूहळू ते त्यांना जास्त परिचित असलेल्या शकसंवताचा उपयोग करू लागले शंभर दीडशें वर्षांच्या अवधींत या प्रातातून कलचुरि संवताचें पूर्णपणें उच्चाटन झालें पूर्वेस आंध्र प्रातात शक संवताचा प्रसार आरंभापासून झाला होताच. आंध्र देशाच्या उत्तरेस कलिंग देशात गांगसंवत् चालू होता. तो इ स च्या दहाव्या शतकापर्यंत टिकला. पुढें इ. स. च्या अकराव्या शतकात तेथेंही शकसंवतानें आपला प्रवेश केला. नंतर इ. स. च्या तेराव्या शतकात देवगिरीच्या यादव राजांच्या मांडलिकाच्या एका लेखात प्रथमच त्याला शालिवाहन शक असें नाव मिळालें व त्याचा शालिवाहन या पुरातन राजाच्या नावाशीं संबंध जोडला गेला तेव्हापासून आपण त्यास शालिवाहन शक म्हणत आहों.

सध्या महाराष्ट्रांत प्रचलित असलेल्या शालिवाहन शकाची पूर्व-पीठिका ही अशी आहे.

---

# शकनृपति श्रीधरवर्म्याचा एरण येथील स्तंभलेख*

मध्यप्रदेशाच्या सागर जिल्ह्यातील खुरई तहसिलींत एरण नावाचें अत्यंत प्राचीन नगर आहे. त्या ठिकाणीं खिस्तपूर्व तीनचार शतकांइतकीं प्राचीन नाणीं सापडतात. तेथें अनेक प्राचीन देवालयाचे अवशेष, विष्णु, वराह, नरसिंह इत्यादिकांच्या विशाल मूर्ति, उत्तुंग स्तंभ व कित्येक प्राचीन शिलालेख आणि स्तंभलेख अद्यापि विद्यमान आहेत तेथें सापडलेल्या काहीं नाण्यावर त्या नगराचें प्राचीन नाव 'एरिकिण' हें प्राकृत भाषेंत लिहिलेलें आढळतें सुमारें पाऊणशें वर्षांपूर्वी जनरल कनिंगहॅमने या ठिकाणाची पाहणी करून तेथील अवशेषांचें विस्तृत वर्णन आपल्या रिपोर्टांच्या दहाव्या भागात प्रसिद्ध केलें. एरणजवळ बीना नदीच्या काठीं कनिंगहॅमला एका शिवलिंगावर कोरलेला लेख आढळला तो पुढे डॉ. फ्लीटने आपल्या 'उत्कीर्ण गुप्त लेख' या पुस्तकात प्रसिद्ध केला. त्यामध्ये 'गुप्तनृपति भानुगुप्त याचा मित्र गोपराज हा येथें युद्धांत शौर्यानें लढत असता मृत्यु पावला व त्याची पत्नी सती गेली' असा उल्लेख आला आहे. हा लेख गुप्तसंवताच्या १९१ या वर्षाचा म्हणजे खिस्तोत्तर ५१० चा आहे. या लेखावरून एका स्तंभाच्या अवशिष्ट भागाला पुढे शाळुंका जोडून त्याचें शिवलिंग बनविण्यात आलें असें दिसतें. याच शिवलिंगावरील दुसरा एक कोरीव लेख गतवर्षी दृष्टीस पडला. तो येथें दिला आहे.

हा लेख कसा माहीत झाला याची हकीकतहि मनोरंजक आहे. १९५१ च्या जानेवारी महिन्यात पाटणा येथील पुराणवस्तुसंशोधन

---

* ऐतिहासिक संकीर्ण निबंध : खंड ५ (भा इ स. मंडळ, पुणे).

खात्याचे सुपरिंटेंडेंट श्री. कृष्णदेव हे मध्यप्रदेशांतील प्राचीन स्थळांची पाहणी करण्याकरिता आले होते. त्यांना एरण येथील वर उल्लेखिलेल्या शिवलिंगाच्या शाळुंकेवर दगडमातीचा थर जमून त्यायोगें गोपराजाच्या लेखाची एक ओळ लुप्त झाली आहे असें दिसलें. तेव्हा त्यांनी तो थर काढून टाकण्याचा आदेश दिला. तसें करीत असता सबंध शाळुंकाच निखळली व तिच्या खाली त्याच शिवलिंगरूपी स्तभावर असलेला दुसरा लेख दृष्टीस पडला. नागपूर संग्रहालयाचे असिस्टंट क्यूरेटर श्री. रोडे हे त्यानंतर एरण येथे गेले होते. त्यांनी त्या लेखाचे फोटोग्राफ घेतले. त्यावरून मला या लेखाची माहिती प्रथम झाली. नंतर माझ्या विनंती-वरून भारतसरकारचे लेखशास्त्रज्ञ डॉ. छाबडा यांनी एरण येथे जाऊन त्या लेखाचे उत्कृष्ट छाप घेतले, व ते मला पाठविले. त्यावरून मी या लेखाचें प्रथम वाचन केलें. लेख त्रुटित व खराब स्थितींत असल्या-मुळे काही अक्षरांचें वाचन सदिग्ध होतें. म्हणून एरण येथे जाऊन लेख समक्ष पाहिला. मूळ लेख व त्याचे छाप यावरून केलेलें वाचन खाली दिलें आहे

हा लेख ज्यावर कोरला आहे तो स्तंभ तीन ठिकाणीं अष्टकोनी व त्यावरच्या तीन भागात षोडशकोणी असून शेवटीं वाटोळा केला आहे. अष्टकोणी भागावर तीन लेख आहेत. अगदी खालच्या भागावर प्रस्तुत लेख, मध्यभागावर गोपराजाचा लेख व वरच्या भागावर दुसरा एक गुप्तकालीन सध्या अस्पष्ट झालेला लेख, असे ते तीन लेख आहेत.

प्रस्तुत लेखाचा उजव्या बाजूचा एकतृतीयांश भाग पूर्णपणे नष्ट झाला आहे. राहिलेल्या भागातील अक्षरेंहि अनेक ठिकाणीं अतिशय खराब किंवा पूर्णपणें नष्ट झाली आहेत. त्यामुळे हा लेख वाचणें अत्यंत कष्टाचें काम झालें आहे. तथापि चिकाटीने प्रयत्न केल्यावर या लेखाचा अवशिष्ट राहिलेला बहुतेक भाग वाचता येतो.

अक्षरवटिका-या लेखाची लिपी मध्यभारतातल्या लेखांच्यासारखी दक्षिणी वळणाची आहे. सांची जवळ कानाखेडा येथें श्रीधरवर्म्याचा लेख सापडला आहे त्याची लिपीहि याच वळणाची आहे. तिच्या

ओळींत २७ ही संख्या शब्दांनी तसेंच २० व ७ दर्शविणाऱ्या संख्याचिन्हांनीहि दाखविली आहे. संख्या दर्शविण्याची ही पद्धति प्राचीन होय.

**भाषा**—या लेखाची भाषा संस्कृत असून आरंभीचा भाग गद्यांत आहे व शेवटीं स्रग्धरा वृत्तांत एक श्लोक घातला आहे. हाच प्रकार कानाखेडा लेखातहि दिसतो. भाषा बहुतेक शुद्ध आहे, पण काही ठिकाणीं प्राकृत भाषेचे अवशेष दिसतात. उदाहरणार्थ, 'महाक्षत्रपस' हें षष्ठयंत रूप 'महाक्षत्रपस्य'बद्दल व 'सप्तविंशतिमे' हा 'सप्तविंशतितमे' बद्दल योजलेला शब्द पाहा

हा लेख शकनंदाचा पुत्र 'राजा' व 'महाक्षत्रप' या पदव्या धारण करणाऱ्या शकवंशी श्रीधरवर्म्याच्या कारकीर्दीच्या सत्ताविसाव्या वर्षी कोरला होता. याच राजाच्या कानाखेडा येथील लेखात त्याला 'महादंडनायक' म्हटलें आहे. तो लेख त्याच्या कारकीर्दीच्या तेराव्या वर्षी कोरला होता. त्या लेखात महिना, पक्ष व तिथि यांचा निर्देश आहे. तसा निर्देश प्रस्तुत लेखातहि असावा पण तो आता नष्ट झाला आहे. या लेखात कानाखेडा लेखातल्याप्रमाणे श्रीधरवर्म्याचें वर्णन 'धर्मविजयी' असें केलें आहे. कौटिलीय अर्थशास्त्रात विजेत्या राजाचे धर्मविजयी, असुरविजयी व लोभविजयी असे तीन प्रकार वर्णिले आहेत. जो राजा शत्रूच्या शरणागतीने संतुष्ट होतो, त्याचें राज्य व द्रव्य हरण करूं इच्छित नाही, तसेंच त्यास ठार मारून त्याच्या भार्यादिकांचें अपहरण करीत नाही तो धर्मविजयी. शक नृपति श्रीधरवर्म्यानें धर्मविजयी राजाप्रमाणे वर्तन केलें हें विशेष होय. कानाखेडा लेखात त्याला महासेन किंवा कार्त्तिकेय याचा उपासक म्हटलें आहे. प्रस्तुत लेखातहि तसा निर्देश पहिल्या ओळीच्या शेवटीं आला असावा, पण तो आता अस्पष्ट झाला आहे.

प्रस्तुत लेखाचा एकतृतीयांश भाग नष्ट झाल्याने त्याचा सर्व अर्थ लावणें किंवा त्यांतील मजकूर पूर्णपणें देणें शक्य नाही. अवशिष्ट भागावरून कांही अनुमानें करता येतात. या लेखाचे दोन उद्देश दिसतात—(१) पहिला उद्देश नगेन्द्राहारातील वाहिरिका नामक पद्रा-

मधील एरिकिण अधिष्ठानात नारायणस्वामी नामक गृहस्थाने गोब्राह्मण-प्रमुख अशा अधिष्ठानाच्या उपयोगाकरिता तसेंच मातापित्याच्या पुण्यवृद्धीकरिता नदीवर तीर्थ किंवा घाट बांधला हें नमूद करण्याचा असावा. प्रस्तुत स्तंभ किंवा शिवलिंग एरण गावाजवळ वाहणाऱ्या बीना (प्राचीन वेण्वा) नदीच्या काठाजवळच अद्यापि आहे. या नदीलाच हा घाट बांधला असावा. (२) दुसरा उद्देश शकवंशी महाक्षत्रप व राजा श्रीधरवर्मा याचा आरक्षिक (पोलिसदलाचा प्रमुख) व सेनापति महाराष्ट्रीय सत्यनाग याने अरिष्टशान्ति, समृद्धि व सर्व प्राण्यांचें सुख व हित, याकरिता ही यष्टि किंवा स्तंभ उभारला हें जाहीर करण्याचा असावा. शेवटच्या तीन ओळींत स्रग्धरा वृत्तातील श्लोक घातला आहे त्याचा बराचसा भाग खंडित किंवा अस्पष्ट झाला आहे तथापि अवशिष्ट भागावरून 'नागानीच येथे उभारलेली यष्टि अखंड राहून लोकांना क्षत्रराष्ट्रांच्या धर्माचें किंवा कर्तव्याचें शिक्षण देवो; कारण हें स्थान शत्रु व मित्र यांना सारखेंच आदरणीय असें आहे' अशा आशय त्या श्लोकामध्ये व्यक्त केलेला दिसतो

मागे सांगितल्याप्रमाणें शकनन्दाचा पुत्र महादण्डनायक शक श्रीधरवर्मन् याचा लेख सांची जवळ कानाखेडा येथे कांही वर्षांपूर्वी सापडला होता. त्यात त्याच्या कारकीर्दीचें तेरावें वर्षहि उल्लेखिलें होतें तथापि त्याच्या 'महादण्डनायक' या पदवीवरून तो स्वतंत्र नसून दुसऱ्या कोणा राजाचा अंकित असावा असें मानलें जात असे प्रस्तुत लेखात त्याच्या 'राजन्' व 'महाक्षत्रप' या पदव्या दिल्या आहेत माळवा व काठेवाड येथील क्षत्रपांच्या लेखातहि याच पदव्या येतात त्या पूर्ण स्वातंत्र्याच्या द्योतक असल्यामुळे श्रीधरवर्मा स्वतंत्र होता याविषयी आता संशय राहत नाही.

कानाखेडा लेखाच्या शेवटीं आणखी एक कालनिर्देश आला आहे, पण त्याचें वाचन व अर्थ या बाबतींत संशोधकांत एकवाक्यता नाही. के. राखालदास बॅनर्जी यांच्या मतें त्या लेखाच्या शेवटी २०१ ही संख्या कालनिर्दशक म्हणून कोरली आहे. हें वर्ष शकसंवताचें मानून

ते कानाखेडा लेखाचा काळ खिस्तोत्तर २७९ हा देतात. कै. एन्. जी. मुजुमदार याच्या मतें हें वाचन चूक असून त्या लेखाची मिती २४१· आहे. हें वर्ष शकसंवताचें असावें. अर्थात् त्याच्या मतें त्या लेखाचा काळ खिस्तोत्तर ३१९ हा येतो. मी स्वतः त्या लेखाचा अभ्यास केला त्यावरून माझें असें मत झालें आहे की, त्या लेखात १०२ हें वर्ष दिलें आहे. हें वर्ष आभीर किंवा तथाकथित कलचुरि शकाचें असावें. तसें तें मानल्यास त्या लेखाचा काळ खिस्तोत्तर ३५१ हा येतो. हें वर्ष श्रीधरवर्म्याच्या कारकीर्दीतील तेरावें होतें. तेव्हा तो इ. स. ३३९ मध्यें गादीवर आला असावा. प्रस्तुत एरण लेख त्याच्या कारकीर्दीच्या सत्ताविसाव्या वर्षी म्हणजे इ. स. ३६५ मध्ये कोरला असावा.

कानाखेडा लेखात उल्लेखिलेल्या 'महादण्डनायक' या पदवीवरून श्रीधरवर्मा हा आरंभीं दुसऱ्या राजाचा मुख्य सेनापति असावा असें दिसतें. त्याच्या लेखातील आभीर शकाच्या उपयोगावरून त्याचा स्वामी आभीरनृपति असावा असें अनुमान करता येतें. आभीराची सत्ता निर्बल झाल्यावर त्यानें आपलें स्वातंत्र्य पुकारून स्वतःच्या कारकीर्दीचीं वर्षे आपल्या कोरीव लेखात नमूद करण्यास आरंभ केला; तथापि त्यानें आपली पूर्वीची 'महादंडनायक' पदवी किंवा आपल्या राज्यात चालू असलेला 'आभीर' शक याचा एकदम त्याग केला नाही. या सन्देर्चीं उदाहरणें भारतीय इतिहासात अनेक आहेत. पुढे त्यानें आपली पूर्वीची पदवी टाकून माळव्याच्या क्षत्रपाप्रमाणें 'राजन्' व 'महाक्षत्रप' या पदव्या धारण केल्या व आपल्या पूर्वीच्या पारतंत्र्याचा निदर्शक जो आभीर शक त्याचाहि आपल्या लेखात निर्देश करणें सोडून दिलें असें एरण लेखावरून स्पष्ट दिसतें.

प्रस्तुत लेख ज्यावर कोरला आहे त्याला 'यष्टि' असें म्हटलें आहे. यष्टि या संस्कृत शब्दाचें प्राकृतात लष्टि ( मराठींत लाठ किंवा लाटी ) असें रूप होतें. कच्छ व काठेवाड या भागात क्षत्रपाच्या काळचे काही लेख सापडले आहेत, त्यात लोकानी आपल्या नातेवाईकाच्या किंवा मित्रांच्या स्मरणार्थ 'लष्टि' उभारल्याचा उल्लेख आहे. हे लेख ज्यांवर कोरले आहेत त्या शिला लांबट आकाराच्या व अग्रभागीं टोक असलेल्या

अशा आहेत. त्या सामान्य लोकांनी उभारल्या होत्या. त्यावरून यष्टीच्या आकाराची कल्पना करणें बरोबर होणार नाही. प्रस्तुत लेखात निर्देशिलेली यष्टि एका प्रबळ राजाच्या सेनापतीनें उभारली होती. अर्थात् ती योग्य आकाराची व पद्धतीची असली पाहिजे. त्या यष्टीचा सध्या अवशिष्ट असलेला भाग साडेसहा फूट उंचीचा आहे. हा तिचा वरचा भाग. त्याखाली निदान तितकाच भाग असणें असंभवनीय नाही. त्यापैकी कांही भाग जमिनींत गाडला गेल्यावर जोत्यावरचा यष्टीचा भाग सुमारें साडेनऊ ते दहा फूट उंचीचा असावा. अशा यष्टि किंवा स्मारकस्तंभ मृतव्यक्तीच्या स्मरणार्थ उभारीत असत. मनुस्मृतींत (अध्याय ९, श्लो. २८५) त्याचा उल्लेख आहे आणि या यष्टींचा जो नाश करील त्याला राजानें ५०० पण दंड करावा व नवी यष्टि करावयास लावावी असा आदेश दिला आहे. अशा मृत सैनिकांच्या स्मारकस्तंभांना गुजरात–काठियावाडांत 'पालिया' व कर्नाटकांत 'वीरक्कल' (मराठी, वीरगळ) म्हणतात. त्यांवर बहुधा घोडेस्वाराचें चित्र असतें. प्रस्तुत शिलास्तंभावरहि श्रीधरवर्म्याच्या लेखाच्या वरच्या भागीं तीन पैलूंवर एक एक घोडेस्वार कोरला आहे. घोडेस्वारानें आपल्या डाव्या हातांत घोड्याचा लगाम व उजव्या हातांत तलवार घेतली आहे. त्यावरूनहि हा शिलास्तंभ प्रथम यष्टि किंवा स्मारकस्तंभ म्हणून उभारला होता असें दिसतें.

प्रस्तुत लेखांतील वर्णनावरून ही यष्टि शकनृपति श्रीधरवर्मा याचा सेनापति सत्यनाग यानें एरण येथें धारातीर्थी शयन केलेल्या नागसैनिकांच्या स्मरणार्थ उभारली होती असें दिसतें. ही यष्टि सदैव अखंड राहून लोकांना धनराष्ट्राच्या धर्माचें किंवा कर्तव्याचें स्मरण देवो, कारण हें स्थान शत्रु व मित्र या दोघांनाहि आदरणीय आहे असें सत्यनागानें म्हटलें आहे. एरणला हें वर्णन पूर्णपणें लागू पडतें. कारण तें स्थान युद्धदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचें असून त्या ठिकाणीं इ. स. च्या चौथ्या शतकापासून अठराव्या शतकापर्यंत अनेक युद्धें झालीं. त्यांचे स्मारकलेख व सतीशिला अद्यापि एरण येथें विद्यमान आहेत.

श्रीधरवर्म्याच्या सेनापतीने एरण येथे उभारलेला स्मारकस्तंभ शूर पुरुषाना आपलें कर्तव्य करण्याची स्फूर्ति अनेक शतकें देत होता यात संशय नाही. कारण श्रीधरवर्म्याच्या काळानंतर सुमारें दीडशें वर्षांनी रानटी हूण लोकाच्या भारतावर स्वाऱ्या झाल्या व त्यायोगें सुसमृद्ध व बलाढ्य असें गुप्त साम्राज्यहि खिळखिळें झालें. खिस्तोत्तर पाचव्या शतकाच्या अखेरीस तोरमाण नामक हूण राजाने मध्य भारतापर्यंत आक्रमण केलें होतें. त्याच्या काळचा एक लेख एरण येथेच प्रचंड वराहमूर्तीवर कोरलेला अद्यापि विद्यमान आहे. त्यानंतर थोड्याच वर्षांनी एरण येथे एक भयंकर युद्ध झालें. त्यात भानुगुप्त नामक गुप्तराजाचा मित्र गोपराज हा निधन पावला. तेव्हा त्याची साध्वी स्त्री सती गेली. या घटनेचा निर्देश याच स्तंभावर दुसऱ्या बाजूस कोरलेल्या लेखात आला आहे. भानुगुप्ताचें कोणाशीं युद्ध झालें याचा निर्देश त्या लेखात नाही. तथापि वरील माहितीवरून त्याचा शत्रु तोरमाण नामक हूण राजाच होता यात संशय नाही. भारतभूमीला परकीयाच्या दास्यातून सोडविण्याकरिता धारातीर्थी शयन करणाऱ्या गोपराजाचें स्मारक अशा पवित्र कर्तव्याचें शूर पुरुषास सदैव स्मरण करून देण्याकरिता उभारलेल्या 'यष्टी'वर लेख कोरून व्हावें यात मोठेंच औचित्य आहे.

ही यष्टि आरंभी तेरा फूट उंच होती असें दिसतें. कालांतराने ती जमिनीवर पडून तिचे तुकडे झाले. तेव्हा तिचा वरचा भाग शिवलिंगाप्रमाणे गोल असल्याने कोणी शिवभक्ताने त्याला शाळुंका लावून शिवलिंग बनविलें. त्यावर तीन लेख होते. त्यांपैकी एक जमिनीत व दुसरा शाळुंकेत दबला गेला होता. तिसरा मुद्दाम अस्पष्ट केला असावा. म्हणून हें शिवलिंग पूर्वीची यष्टि असावी असा संशय कोणासहि आला नसावा. यष्टीवर गोपराज व त्याची पत्नी यांचे शिल्प व सैनिकाऱ्या आकृति कोरल्या होत्या; पण भारतीयाच्या नैसर्गिक अचिकित्सकतेमुळे त्याचा कोणीहि विचार केला नसावा.

या लेखात सत्यनाग आपणास 'माहाराष्ट्र' म्हणजे महाराष्ट्रीय म्हणवितो. महाराष्ट्र हें देशवाचक नाव पुराणादि प्राचीन ग्रंथात येतें.

पण या ग्रंथांचे काळ अनिश्चित आहेत. सिंहलद्वीपाच्या 'दीपवंश' व 'महावंश' ग्रंथांतहि अशोकाने महाराष्ट्रांत बौद्धधर्माचा प्रसार करण्याकरिता भिक्षु पाठविले होते असा निर्देश आहे; पण हे ग्रंथ पांचव्या सहाव्या शतकांतील आहेत. संस्कृत वाङ्मयांतील बृहत्संहिता, काव्यादर्शादि ग्रंथांत महाराष्ट्राचा निर्देश आहे; पण हे ग्रंथ इ. स. च्या सहाव्या शतकांतील किंवा नंतरचे आहेत. तेव्हा श्रीधरवर्म्याच्या काळच्या म्हणजे इ. स. चौथ्या शतकांतील या लेखांत महाराष्ट्राचा निर्देश आहे तो कालक्रमाने पहिला ठरतो. त्यानंतर सुमारे तीनशें वर्षांनी ऐहोळे लेखांत व युआन च्वांगच्या प्रवासवर्णनांत महाराष्ट्राचा उल्लेख येतो, तो कालक्रमानें पहिला निश्चित उल्लेख मानण्यांत येत असे. त्यापेक्षा प्रस्तुत लेखांतील उल्लेख पुष्कळच अगोदरचा आहे. याशिवाय या लेखांत एरणचें प्राचीन नाव 'एरिकिण' हें येतें. हें नाव 'एरिकिन' या रूपांत एरणच्या प्राचीन नाण्यावर येतें. समुद्रगुप्ताच्या व हूण नृपति तोरमाणाच्याहि एरण येथील लेखांत तें 'ऐरिकिण' या रूपानें आढळतें. एरिकिण हें अधिष्ठान किंवा नगर नगेन्द्र नामक आहारांतील किंवा जिल्ह्यांतील वाहिरिका नामक पथकांत किंवा तालुक्यांत अन्तर्भूत होतें. पण हीं प्रदेशनामें अद्यापि इतरत्र आढळलीं नाहीत.

वाचन[1]

१ सिद्धम् [।*] राज्ञ(ज्ञो) महाक्षत्रपस(स्य) स्ववीर्य्या[र्जि]-
[त*]विजयविपुलकीर्तेः[2] . . . . . . . . . स्य

२ शकनन्दपुत्रस्य ध[र्म]विजयिनः [श्री]धरवर्म[णः] . . . . . . . . . [स्वराज्ये*][3]-

१ मूळ स्तंभ व छाप यांवरून. यांतील कांही शब्दांच्या वाचनांत डॉ. छाबडा, श्री लक्ष्मीनारायण राव व श्री य. रा. गुप्ते यांचें साहाय्य झालें आहे. २ यापुढची अक्षरें -जितसेनमहागुप्तपादानुध्यात- अशीं असावीं. ३ येथें नष्ट झालेल्या अक्षरांपैकी शेवटचीं नऊ अक्षरें कानाखेडा लेखांतल्या प्रमाणे 'वर्षसहस्राय स्वराज्ये' अशीं असावीं. शेवटचीं तीन अक्षरें तर जवळजवळ निश्चित आहेत.

३ भिवृद्धिकरे वैजयिके सं[व]त्सरे सप्तविंशतिमे[४] २० ७ . . . . . . . . . . .[५]

४ एतद्दिवस[६]मेरिकिणाधिष्ठाने(ने)स्य नगे[न्द्रा]हारस्या[हि]रकाया[७] . . . . . .[नारा*]–

५ यणस्वामिना भक्तिपू[र्व्वं] तीर्थे गोब्राह्मणपुरोगस्य चाधि . . . . . . . . .[८] मा . . .[९]

६ भिवृध्या(द्ध्य)र्थम् [।*] राज्ञः आरक्षिकेन(ण)[१०] [से]ना[प]तिसत्यनागेन म[हाराष्ट्र*][११] . . . . . [प्र*]मु–

७ खेन माहाराष्ट्रेन(ण) शान्तिकर्द्धिसर्व्वसत्व(त्त्व)[मु]खहिताय स्व- . . . . . . . . .[१२]

८ अपि च[।*] सिध्य[न्ते] प्रेरितान्तात्पृथु[१३] पृ[थिवीमी]शमान(ने)[१४] नरेन्द्रे ना[गै]रे — ⏑ — — ⏑ ⏑ ⏑ ⏑

९ वपुषा क्षत्रराष्ट्र[स्य] धर्म्मा[न्।*] यष्टिरिशष्टा[१५]मखण्डस्थिति त ⏑ ⏑ ⏑ — — ⏑ — — ⏑ — –, — — — —

१० ⏑ सेवादररिपु[सु] [हृदा*] स्थानमेतत्प्रजानाम्[१६] [॥*]

---

४ 'सप्तविंशतितमे' वाचावे. ५ येथे नष्ट झालेल्या भागात काना-खेडालेखातल्याप्रमाणे महिना, पक्ष व तिथि याचा निर्देश असून शेवटी –पूर्वकम् असा शब्द असावा. ६ 'एतस्मिन्दिवसे–' वाचावे. ७ 'नगेन्द्राहारस्य वाहिरिकाया' वाचावे. हे मापेक्षसमासाचे उदाहरण आहे याच्यापुढे 'पथवे वेण्वानद्या कारितं नारा–' असे शब्द असावे. ८ येथे नष्ट झालेले शब्द '–ष्ठानस्य स्वस्त्ययनं' असे असावे ९ येथील शब्द '–तापिनोः पुण्या–' असे असावे. १० 'राज्ञ आरक्षिकेण' वाचावे ११ येथील सामासिक शब्द 'महाराष्ट्राभिजननागप्रमुखेन' असा असावा १२ येथे नष्ट झालेले शब्द 'स्वभोगाविष्ठानैरविकिणे यष्टिरुच्छ्रिता' असे असावे. १३ येथे स्रग्धरा वृत्ताला आवश्यक अशी दोन अक्षरे गळलेली दिसतात. १४ व्याकरण-दृष्ट्या शुद्ध रूप 'ईशाने' असे आहे १५ 'यष्टिरिशष्टाम्' असे वाचावे' वास्तविक व्याकरणदृष्ट्या शुद्ध रूप 'शास्तु' असे पाहिजे; कारण 'शास्' हा धातु परस्मैपदी आहे. १६ वृत्त–स्रग्धरा येथे लेख संपल्याची खूण म्हणून 'म्' अक्षरावर लांब रेघ काढली आहे.

# रामगुप्ताच्या चरित्रावर नवीन प्रकाश*

मगधाच्या गुप्त घराण्याविषयी सर्व हिंदुलोकांस अत्यंत आदर व अभिमान वाटतो. खिस्ती शकाच्या पहिल्या तीन शतकांत उत्तर हिंदुस्थानात बौद्ध धर्माचा सर्वत्र प्रसार होऊन हिंदुधर्म नामशेष होऊ लागला होता. अशा बिकट परिस्थितीत ज्यांनी आपल्या बाहुबलाने परकी राजांस जिंकून उत्तर हिंदुस्थानात हिंदूंचें एकच्छत्री साम्राज्य स्थापिलें, हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन केलें आणि राष्ट्रातील शूर, विद्वान् व कर्तबगार लोकांच्या गुणास क्षेत्र मिळवून दिलें त्या गुप्तवंशीय राजांविषयी सर्व हिंदी इतिहासज्ञांत औत्सुक्य वाटावें व त्यांच्या चरित्राविषयीं जितकी जास्त माहिती मिळेल तितकी मिळविण्याकरितां त्यांनी अविरत प्रयत्न चालू ठेवावा यांत नवल नाही. आणि क्वचित् एखादा नवीन शिलालेख, ताम्रपट किंवा नाणें सापडून, अथवा संस्कृत, प्राकृत, चिनी इत्यादि भाषांतील तत्कालीन परिस्थितिविषयक उल्लेख दृष्टीस पडून त्यांच्या प्रयत्नांस यश येतेंहि या प्रथितयश गुप्तवंशातील एका राजाच्या चरित्रावर थोडा नवीन प्रकाश पाडण्याचा या लेखांत प्रयत्न केला आहे.

सुमारें ८—१० वर्षांपूर्वीपर्यंत गुप्तराजांची खालील वंशावळ सर्वमान्य झाली होती.

चन्द्रगुप्त ( प्रथम ) इ. स. ३२०–३३०
|
( मुलगा )
समुद्रगुप्त इ. स. ३३०–३७५
|
( मुलगा )
चन्द्रगुप्त ( द्वितीय ) इ. स. ३७५–४१३

* 'शारदाश्रम वार्षिक', यवतमाळ, (१९३३), पृ. २१.

चन्द्रगुप्त (द्वितीय) इ. स. ३७५-४१३
|
(मुलगा)
कुमारगुप्त इ. स. ४१३-४५५

सन १९२४ मध्ये कै. प्रो. राखालदास बॅनर्जी यानी काशी विश्वविद्यालयात व्याख्यानें दिलीं होतीं, त्यात त्यानी समुद्रगुप्तानंतर त्याचा मुलगा रामगुप्त गादीवर बसला असें प्रतिपादिलें होतें. पण तीं व्याख्यानें अद्यापि अप्रकाशित आहेत. त्यानंतर सन १९२८-१९२९ मध्यें डॉ. अ. स. अळतेकर यानी जर्नल ऑफ् बिहार अँड ओरिसा या त्रैमासिकात दोन लेख लिहिले. त्यात हर्षचरित (इ. स. ७ वें शतक) व त्यावरील शंकरार्य याची टीका, रामचंद्र व गुणचंद्र (इ. स. चें १२ वें शतक) याचा नाट्यदर्पण नामक ग्रंथ, धारानृपति भोज (इ. स. चें ११ वें शतक) याचा शृंगारप्रकाश, राजशेखराची (इ स. १० वें शतक) काव्यमीमांसा इत्यादि भिन्न भिन्न काळीं लिहिलेल्या व परस्परस्वतंत्र अशा संस्कृत ग्रंथातील उतारे, संजान येथे सापडलेला राष्ट्रकूट नृपति अमोघवर्ष याचा ताम्रपट, व मज्मुल तवारिख (बारावें शतक) या ग्रंथातील दंतकथा इत्यादिकाचा उपयोग करून रामगुप्ताविषयी खालील माहिती जुळविली.

"समुद्रगुप्तानंतर त्याचा मुलगा रामगुप्त हा गादीवर आला. तो अत्यंत निर्बळ व भ्याड राजा होता. काठेवाडातील शकवंशीय क्षत्रपाने त्याच्या मुलखावर स्वारी करून राजधानीला वेढा दिला व त्याला इतकें पेंचात आणलें की प्रजेचा सर्वस्वी नाश न व्हावा म्हणून त्याला आपली राणी ध्रुवदेवी हिला शकराजाकडे पाठविण्याची अट नाखुषीनें कबूल करावी लागली. पण त्याचा शूर व मानी भाऊ चन्द्रगुप्त यास ती अट अपमानास्पद वाटून त्यानें स्वतः ध्रुवदेवीच्या वेषानें शक राजाकडे जाण्याचें ठरविलें व पुढें एकांतात त्याचा खून करून त्याच्या सैन्याचा धुव्वा उडविला. त्यानंतर लौकरच रामगुप्त व चन्द्रगुप्त या भावात वैमनस्य उत्पन्न झालें व बहुधा चन्द्रगुप्ताच्या हातून किंवा त्याच्या चिथावणीनें रामगुप्ताचा वध झाला. राणी ध्रुवदेवी हिचें प्रथमपासून चंद्रगुप्तावर

प्रेम होतें व तिचा पति रामगुप्त याच्या अत्यंत भ्याड वर्तनाबद्दल तिच्या मनात त्याच्याबद्दल तिरस्कार उत्पन्न झाला होता म्हणून त्याच्या वधानंतर तिने चंद्रगुप्ताशीं लग्न केलें. रामगुप्ताची कारकीर्द गुप्तवंशास लांछनास्पद असल्याने तिचा गुप्तवंशीय राजांच्या शिलालेखात कोठेही उल्लेख आढळत नाही यात आश्चर्य नाही. ध्रुवदेवीचा उल्लेखहि चन्द्रगुप्ताची पट्टराणी या नात्यानेच कोरीव लेखात सर्वत्र आढळतो. तिने आपल्या सख्ख्या दिराशीं केलेला विवाह सध्या धर्मशास्त्रसंमत नसला तरी प्राचीन काळीं तो निंद्य मानला जात नसे."

डॉ. अळतेकर यांनी उपलब्ध पुराव्याची छाननी करून वरील अनुमानें काढल्यावर इतिहाससंशोधकांमध्ये मोठी खळबळ उडून गेली. प्रथम बरेच साशंक होते व त्यांनी वरील इतिहासावर नाना प्रकारचे आक्षेप आणले. पण त्यांचेंहि निराकरण होऊन सध्या बहुतेक इतिहासज्ञांचा कल वरील गोष्ट खरी मानण्याकडेच दिसून येतो. कलकत्ता युनिव्हर्सिटीतील प्राचीनभारतीयेतिहासाचे अध्यापक डॉ. देवदत्तपंत भांडारकर* व पाटण्याचे प्रसिद्ध संशोधक बॅ. काशीप्रसाद जयस्वाल† यांनी नुकतेच या विषयावर लेख लिहून नवीन प्रकाश पाडण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि वरील प्रसंगातील काही बाबी अद्यापि अनिर्णीत राहिल्या आहेत. रामगुप्ताचा पराभव करणारा शत्रु कोण व हा प्रसंग कोठे घडला याविषयी अद्यापि विद्वानांत ऐकमत्य नाही. वरील प्रसंगावर 'देवीचंद्रगुप्त' या नावाचें विशाखदत्ताचें एक नाटक होतें. त्यांतील काही उतारे भोजाच्या 'शृंगारप्रकाशा'त आले आहेत. त्यात वरील गोष्टींचा उल्लेख असावा. तथापि तें सबंध नाटक अद्यापि उपलब्ध झालें नसल्यामुळे वरील बाबी आपणास इतर पुराव्यावरूनच ठरविल्या पाहिजेत.

---

* Malaviya Commemoration Volume, pp 186 f.

† J B O. R. S., Vol. XVIII, pp 17 f

राजशेखराच्या काव्यमीमांसेंत 'कयोऽय मुक्तकाचें' उदाहरण म्हणून खालील श्लोक आला आहे—

> दत्त्वा रुद्धगतिः खसाधिपतये देवीं ध्रुवस्वामिनीं
> यस्मात्खण्डितसाहसो निववृते श्रीशर्मगुप्तो नृपः ।
> तस्मिन्नेव हिमालये गुरुगुहाकोणक्वणत्किन्नरे
> गीयन्ते तव कार्त्तिकेय नगरस्त्रीणां गणैः कीर्तयः ॥

या श्लोकांत 'खसाधिपतये' याबद्दल 'शकाधिपतये' व 'श्रीशर्मगुप्तो' याबद्दल 'श्रीरामगुप्तो' हा मूळचा पाठ असून लेखकाच्या चुकीने त्याबद्दल सध्याचे पाठ घातले गेले असावे हें उघड आहे. त्यामध्ये रामगुप्त व कार्त्तिकेय या दोन राजांची तुलना करून कार्त्तिकेयाचा उत्कर्ष दाखविला आहे. 'ज्या हिमालय पर्वतावर शत्रूनें मार्ग अडविल्यामुळे खण्डितसाहस झाल्याकारणानें रामगुप्तास आपली राणी ध्रुवस्वामिनी देऊन स्वतःची सुटका करून घ्यावी लागली, ज्याच्या विशाल दर्‍यांत वसून किन्नर गात असतात त्या हिमालय पर्वतावर नगरस्त्रियांचे समूह, कार्त्तिकेय राजा! तुझें यश गात असतात' असें त्या श्लोकांत म्हटलें आहे. येथे कार्त्तिकेयनगरस्त्रीणां' असा एक सामासिक शब्द मानावा व कार्त्तिकेयनगरांत रामगुप्ताचा पराभव झाला असावा असें डॉ. भांडारकरांचें म्हणणें आहे. हें कार्त्तिकेयनगर संयुक्तप्रांताच्या अल्मोरा जिल्ह्यांत गोमती नदीच्या खोऱ्यांत वसलेल्या वैजनाथ नामक गावाजवळ होतें व त्याचा कार्त्तिकेयपुर या नावानें एका ताम्रपटांत उल्लेखहि आढळतो असें त्यांनी दाखविलें आहे. आणि वरील श्लोक चंद्रगुप्तास उद्देशून असावा असें त्यांनी म्हटलें आहे; पण तें सयुक्तिक दिसत नाहीं राजशेखरानें वरील श्लोक मुक्तकाचें उदाहरण म्हणून दिला आहे. संस्कृत वाङ्मयांत काव्याचे रचनेच्या दृष्टीनें मुक्तक व प्रबंध असे दोन प्रकार मानतात. एकाच श्लोकांत सर्व कल्पना पूर्ण झाली असल्यास मुक्तक व अनेक श्लोकांत तिचा विस्तार झाला असल्यास प्रबंध अशा त्या दोन संज्ञांचा अर्थ आहे. तेव्हां वरील श्लोकाच्या अर्थास जरूर ते सर्व शब्द त्यांत असले पाहिजेत हें उघड आहे. संस्कृत

कवींनी स्वकालीन राजप्रशस्तिपर अनेक श्लोक रचलेले दिसतात. पण त्या सर्वांत त्या त्या राजाचीं नांवें गोवलेलीं आढळतात. याचें कारणहि उघड आहे. एकाच श्लोकात सर्व कल्पना पूर्ण करावयाची असल्याने त्या राजाचें नाव त्यात न घातल्यास तो श्लोक एका विशिष्ट राजाच्या विषयी आहे असें कोणास समजणें शक्य नाही. या विधानाच्या समर्थनार्थ संस्कृत सुभाषितांतून शेंकडो उदाहरणें देता येतील.* तेव्हा वरील श्लोकात 'कार्त्तिकेयनगरस्त्रीणां' असा एक शब्द न मानता कार्त्तिकेय हें संशोधन मानणें भाग आहे.

आता हा कार्त्तिकेय कोण याचा विचार करू हा चंद्रगुप्ताचा मुलगा कुमारगुप्त असावा असें डॉ. अळतेकर म्हणतात. वरील श्लोकात द्वितीय चंद्रगुप्ताची स्तुति केली आहे असें डॉ. भांडारकरांचें मत वर उद्धृत केलें आहे. पण हीं दोन्ही मतें समुक्तिक दिसत नाहीत रामगुप्ताची कारकीर्द मागधन गुप्तवंशास इतकी लाजनास्पद होती की तद्वंशीय राजाच्या लेखात तिचा उल्लेख त्यांनी बुद्धिपुरस्सर टाळलेला दिसतो. तेव्हा गुप्तकालीन एखादा कवि आपल्या राजाची रामगुप्ताशीं तुलना करून त्याचें श्रेष्ठत्व स्थापित करण्याचें मनात आणील असें वाटत नाही तेव्हा हा कार्त्तिकेय दुसऱ्याच एखाद्या वंशातील असावा. संजान येथील ताम्रपटात राष्ट्रकूट अमोघवर्षाची रामगुप्ताशीं तुलना करून त्याचें श्रेष्ठत्व दाखविलें आहे, तसाच प्रकार या श्लोकातहि केलेला दिसतो. राजशेखराच्या काळापूर्वी कार्त्तिकेय हें नाव कोणी राजाने धारण केलेलें दिसत नाही पण राजशेखराचा आश्रयदाता महीपाल याचें कार्त्तिकेय हें दुसरें नाव असावें असें दिसतें. हा महीपाल कनोज येथील प्रतीहारवंशीय राजा होय प्रतीहारवंशीय राजांनी अनेक नावें धारण केलेलीं प्राचीन कोरीव लेख व नाणीं यावरून दिसून येतात उदाहरणार्थ, या महीपालाच्या आजा भोज याने मिहिर, प्रभास आणि आदिवराह हीं नावें घेतलीं होतीं महीपालाचा पिता महेन्द्रपाल हा महेन्द्रायुध, निर्भयराज व भाऊ या नावांनी ज्ञात होता महीपालाचीहि क्षितिपाल, विनायकपाल,

* पाहा, सुभाषितरत्नभांडागार (निर्णयसागर प्रत), पृ ११८ १२४.

हेरम्बपाल, हर्ष इत्यादि दुसरीं नावें प्रसिद्ध आहेत. तसेंच कार्त्तिकेय हें नाव दिसतें याच्या दरबारीं राजशेखर व आर्यक्षेमीश्वर हे प्रसिद्ध संस्कृत ग्रंथकार होऊन गेले. आर्यक्षेमीश्वराने 'चंडकौशिक' या नाटकाच्या प्रस्तावनेंत आपल्या आश्रयदात्यास 'महीपाल' या नावाने व भरतवाक्यात 'कार्त्तिकेय' या नावाने उल्लेखिलें आहे. शिवाय त्या नाटकाच्या नावातहि त्या राजाच्या नावाचा गर्भित उल्लेख असावा. कारण चण्ड हें कार्त्ति-केयाचेंच एक प्रसिद्ध नाव आहे असें महाभारतात म्हटलें आहे.* राजशेखरानेहि आपल्या बालभारत या नाटकास 'प्रचण्डपाण्डव' हें दुसरें नाव वरील उद्देशानेच दिलें असावें. संस्कृत ग्रंथकाराची अशी पद्धत होती हें कालिदासाच्या 'विक्रमोर्वशीय' व 'कुमारसंभव' या ग्रंथावरून दिसून येईल असो. राजशेखराने उद्धृत केलेल्या श्लोकातील कार्त्तिकेय हा कनोजचा प्रतीहारवंशीय प्रथम महीपाल होय हें आपण पाहिलें. त्यात वर्णिल्याप्रमाणे या राजाने हिमालयातील एखादा प्रदेश जिंकला होता काय याचा आता विचार करू. महीपालाच्या कारकीर्दीच्या शेवटीं शेवटीं राष्ट्रकूट नृपति तृतीय इंद्र व कलचुरि राजा प्रथम युवराजदेव यांच्या स्वाऱ्यामुळे कनोजच्या साम्राज्यास उतरती कळा लागली होती. तथापि प्रारंभीं महीपालाने अनेक ठिकाणीं स्वाऱ्या करून विजय मिळविला होता यात संशय नाही. मध्यहिंदुस्थानात खजुराहो येथे चंदेल्ल-नृपति यशोवर्मन् याचा एक शिलालेख उपलब्ध झाला आहे त्यात महीपालाने आपले हत्ती व घोडदळ यांच्या बळावर काबूल व पंजाब येथे राज्य करणाऱ्या साहि राजाचा पराभव करून वैकुंठ नामक विष्णूची प्रतिमा हस्तगत केली होती असा उल्लेख आला आहे.† राजशेखराच्या 'बालभारत' अथवा 'प्रचण्डपाण्डव' या नाटकात महीपालाचें येणेंप्रमाणें वर्णन केलें आहे—

नमितमुरलमौलिः पाकलो मेकलाना
रणकलितकलिङ्गः केलितट् केरलेन्दोः ।

* महाभारत, वनपर्व, अध्याय २३२ (मुंबई प्रत).

† Ep. Ind., Vol. I, p. 129.

अजनि जितकुलूतः कुन्तलानां कुठारो
हठहृतरमठश्रीः श्रीमहीपालदेवः ॥

यात वर्णिलेल्या युद्धापैकी एक कुलूत देशाच्या राजाशीं झालें होतें. सतलज नदीच्या किनाऱ्याने जालंदर दोआबच्या ईशान्येस जो प्रदेश लागतो त्यास पूर्वी कुलूत ही संज्ञा होती. हें स्थान हिमालयात आहे. तेव्हा तेथे महीपालाने जो विजय मिळविला त्याचें वर्णन त्याच्या दरबारच्या एखाद्या कवीने काव्यमीमांसेंत उद्धृत केलेल्या श्लोकात केलें असावें असें वाटतें.

अर्थात् याच ठिकाणीं शकराजाने रामगुप्ताचा पराभव केला असावा. डॉ अळतेकर म्हणतात त्याप्रमाणे हा पराभव रामगुप्ताच्या राजधानींत म्हणजे पाटलिपुत्रात झाला नसून हिमालयात झाला असावा हें उघड आहे. भोजाच्या शृंगारप्रकाशात 'प्रकृतीनामाश्वासनाय शकस्य ध्रुवदेवीसम्प्रदानेऽभ्युपगते' असे शब्द आहेत त्यावरून रामगुप्ताने आपल्या राजधानींतील प्रजेच्या आश्वासनार्थ ध्रुवदेवीला शकराजाकडे पाठविण्याचें ठरविलें असावें असें डॉ अळतेकर यानी अनुमान केलें आहे पण 'प्रकृति' या संस्कृत शब्दाचे प्रजा व प्रधान असे दोन अर्थ होत असल्यामुळे दुसऱ्या अर्थानेच त्या शब्दाचा येथे प्रयोग झालेला दिसतो. काव्यमीमांसेंतील श्लोकावरून आपणास असें दिसतें की गादीवर आल्यावर रामगुप्ताने आपला दिग्विजयी पिता समुद्रगुप्त याचें अनुकरण करण्याच्या इच्छेने शकराजावर स्वारी केली असावी. त्याप्रसंगी त्याचा भाऊ चंद्रगुप्त, राणी ध्रुवस्वामिनी, व इतरहि मन्त्र्यादि परिवार त्याच्या बरोबर होता. इतक्या लवाजम्यासह शत्रूच्या राज्यात दूरवर स्वारी करणें म्हणजे वरील श्लोकात म्हटल्याप्रमाणे साहसच होय. दुर्दैवाने या साहसात अपयश आल्यामुळे रामगुप्तावरोबरच्या सर्व मंडळीचा नाश होण्याचा प्रसंग आला होता. म्हणून शकनृपतीने घातलेली मानहानिकारक अट स्वीकारणें रामगुप्तास भाग पडलें. शृंगारप्रकाशात देवीचन्द्रगुप्त नाटकातील एक उतारा दिला आहे* त्यात चन्द्रगुप्ताने

* स्त्रीवेषनिह्नुतश्चन्द्रगुप्तः शत्रोः स्कन्धावारमलिपुरं शकपतिवधायागमत् । Ind. Ant. for 1923, p 183.

अलिपूर नामक शत्रूच्या स्कन्धावारात कामिनीवेषाने प्रवेश करून शत्रूचा निःपात केला असें म्हटलें आहे डॉ. अळतेकर स्कन्धावाराचा शिबिर असा अर्थ करतात व तें शिबिर पाटलिपुत्राजवळ होतें असें म्हणतात. पण हा शब्दहि निराळ्याच अर्थानें योजिलेला दिसतो. स्कन्धावार याचा राजधानी असाहि अर्थ होतो व तोच अर्थ येथे विवक्षित दिसतो; कारण वरील उताऱ्यात 'स्कन्धावार' या शब्दाबरोबर अलिपूर या गावाचाहि उल्लेख केला आहे. बाणाच्या हर्षचरितात या गावाचें नाव अरिपूर असें आलें आहे.* पण तें लेखकास अलिपूर या शब्दाचा अर्थ न समजल्यामुळे आलें असावें. हर्षचरिताच्या एका हस्तलिखित प्रतींत वरील उताऱ्यात त्या गावाचें नाव नलिनपुर असें दिलें आहे. कदाचित् तेंच त्याचें मूळचें नाव असावें व कालांतराने लेखकाच्या अज्ञानामुळे प्रथम त्याचें अलिपूर व नंतर अरिपूर असें रूपांतर झालें असावें. बाणाचा समकालीन चिनी प्रवासी युआनच्वांग याने सध्याच्या जलालाबादच्या थोडें पश्चिमेस Teng-kuang असें गांव उल्लेखिलें आहे. या गावाचें प्राचीन नाव पद्मपुर होतें असें एका विद्वानाने दाखविलें आहे.† हेंच बाणाच्या नलिनपुराने विवक्षित असण्याचा संभव आहे. तसें असल्यास रामगुप्ताचा पराभव जलालाबाद-जवळ झाला असावा. महीपालाने पंजाब व काबूल येथील शाहि राजाचा पराभव याच प्रांतात केल्याचें वर दाखविलें आहे. हें स्थळ हिमालयात नसून हिंदुकुश पर्वतात आहे खरें, पण या पर्वताला त्यावेळीं श्वेतपर्वत असें म्हणत असत असें दिसतें. त्यामुळे अशी भौगोलिक चूक दूरच्या कनोज येथील कवीच्या हातून होणें असमवनीय नाही.

रामगुप्ताचा पराभव जालंदर दोआबजवळ झाला असो किंवा दूरच्या जलालाबादजवळ झाला असो, त्याचा शत्रु माळवा व काठेवाड येथे राज्य करणारा कोणी क्षत्रप किंवा प्रांताधिकारी नसून पंजाब व अफगा-

* अरिपूरे च परकलत्रकामुकं कामिनीवेषगुप्तश्चन्द्रगुप्तः शकपतिमशातयत् । हर्षचरित, पृ. १९३.

† Watters, On Yuan Chwang, Vol. I, p. 188.

निस्थान येथे राज्य करणारा कुशान राजाच असावा यात संशय नाही. हे कुशानवंशीय राजे समुद्रगुप्ताच्या वेळीं प्रबळ होते. त्यांचा 'दैवपुत्रषाहिषाहानुषाहि' अशा पदवीने समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद येथील प्रशस्तींत उल्लेख आला आहे. ते इ. स. च्या पाचव्या शतकापर्यंत पंजाबात राज्य करीत होते. व त्यांना शक असेंहि म्हणत. दिल्लीजवळ मिहरौली येथील लोहस्तंभावर एका चंद्रनृपाचा प्रशस्तिलेख कोरलेला विद्वानांस माहीत आहे. हा चंद्र म्हणजे गुप्तवंशीय द्वितीय चन्द्रगुप्तच होय हें डॉ. जयस्वाल यांनी दाखविलें आहे.* या प्रशस्तींत उल्लेखिलेली बाल्हीकावरची स्वारी चंद्रगुप्ताने गादीवर बसल्यावर कुशानावर सूड उगविण्याकरिता केली असावी काठेवाड–माळवा येथील क्षत्रपांनी रामगुप्ताचा पराभव केला असता तर चन्द्रगुप्ताने त्यांचा नि:पात करण्याची पहिली संधि साधली असती. पण निदान इ. स. ३८८ पर्यंत म्हणजे चन्द्रगुप्त गादीवर आल्यावर १०–१२ वर्षेपर्यंत तरी त्याने त्यांच्याकडे लक्ष दिलेलें दिसत नाही; कारण या वर्षापर्यंतचीं त्या क्षत्रपाचीं नाणीं उपलब्ध आहेत. या अवधींत तो उत्तरेकडे त्यांच्या करण्यात गुतला असावा असें दिसतें. चन्द्रगुप्ताने माळव्यावर स्वारी केली त्यावेळीं त्याच्या बरोबर असलेल्या एका मंत्र्याने आपल्या लेखात स्वत:चा 'अनेकसमरावाप्तयशस्ताक:' असा उल्लेख केला आहे † त्यावरून पूर्वी त्याने चन्द्रगुप्ताबरोबर राहून अनेक लढाया जिंकल्या होत्या असें दिसतें. म्हणून उत्तरेतील कुशानवंशीय सम्राटाचा पराभव केल्यावरच चन्द्रगुप्त त्यांनी नेमलेल्या काठेवाड व माळवा येथील प्रांताधिपतींचा समूळ उच्छेद करण्यास प्रवृत्त झाला असें अनुमान करता येतें.

---

* J B. O. R. S, Vol. XVIII, pp. 31 f.

† *Fleet–Gupta Inscriptions*, p. 29.

# पवनार येथील प्राचीन अवशेष*

वर्धा जिल्ह्यातील पवनार येथे श्री विनोबाजी यांच्या आश्रमाजवळ काहीं मूर्ति कित्येक वर्षांपूर्वी सापडल्याची बातमी वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाली होती. तसेंच कै. जमनालालजी बजाज यांच्या वर्धा येथील संग्रहालयांत पवनार येथे सापडलेली व सुंदर कोरीव काम केलेली मूर्ति ठेविली आहे, असेंहि अनेकांकडून ऐकलें होतें. या मूर्ति स्वतः पहाव्या अशी फार दिवसांची इच्छा होती. पण इतर कामांच्या गर्दीत त्याकरितां फुरसत मिळेना. गेल्या ऑक्टोबर महिन्यांत कांहीं मित्रांसहित पवनार येथे जाऊन या मूर्ति पाहण्याचा योग आला. या मूर्तीच्या योगानें विदर्भाच्या प्राचीन इतिहासांतील एका प्रश्नावर प्रकाश पडत असल्यानें त्याविषयीं थोडक्यांत माहिती येथे देत आहे.

पवनार हें सध्या लहानसें खेडेगाव झालें असून तें धाम नदीच्या उजव्या तीरावर वसलें आहे. या खेड्यांत सध्या उल्लेखनीय असे प्राचीन अवशेष नाहींत. येथे मधून मधून कांहीं नाणीं सापडतात असें समजलें, पण तीं प्रयत्न करूनहि पाहावयास मिळालीं नाहींत. नदीच्या डाव्या तीरावर श्रीविनोबाजींचा आश्रम आहे. त्याच्या मागील बाजूस कांहीं शिल्पें व मूर्तींचे भग्न अवशेष जमीन खणतांना त्यांस सापडले. त्यांतील शाबूत असलेलीं दोन शिल्पें त्यांनीं आश्रमाजवळ सुरक्षित ठेविलीं आहेत. तीं विदर्भाच्या प्राचीन शिल्पेतिहासाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचीं आहेत.

यांपैकीं एका शिल्पाकरितां श्रीविनोबाजींनीं लहानशी झोपडी बांधून तींत तें ठेवलें आहे. या शिल्पाला 'भरतभेट' असें नांव दिलें

---

* प्रो मोतदार सन्मान-ग्रंथ (१९५०), पृ १-७.

आहे. या शिल्पांत चार मूर्ति स्पष्ट दिसतात. त्या डावीकडून सीता, राम, भरत व लक्ष्मण यांच्या होत. पुढे दालविस्थाप्रमाणे या शिल्पाच्या निर्मितीला सुमारें दीड हजार वर्षें झाल्यामुळे त्या मूर्ति आता बऱ्याच अस्पष्ट झाल्या आहेत. तथापि अजूनहि त्यांच्या मुखावरील भाव स्पष्ट दिसतात. सीतेने आपल्या उजव्या हाताने रामाचा उजवा हात धरला आहे. राम भरताशीं बोलत असून त्याने आपला डावा हात भरताच्या उजव्या हातावर ठेवला आहे. रामाच्या मुद्रेवर गांभीर्याची छटा आहे. भरताने आपली मान किंचित् वाकविली असून त्याच्या मुखावर रामाच्या भेटीचा आनंद व्यक्त झाला आहे. लक्ष्मणाने मात्र तोंड फिरविलें असून त्याची मुद्रा उदासीनतेची आहे. सीतेच्या बाजूस आणखी एक व्यक्ति होती, पण ती अर्धच्छिन्न झाली आहे. सर्व मूर्तींचे वेष अगदी साधे आहेत. त्या सर्वांनी फक्त अधोवस्त्र नेसलें आहे तें अजंठ्याच्या लेण्यांतल्यासारखें आहे. राम व लक्ष्मण यांच्या डोक्यावर जटा आहेत. भरताचे केस मात्र लांब मोकळे असून ते त्याच्या खांद्यावर पडले आहेत. सर्व मूर्तींचे शरीर बांधेसूद आहे. या शिल्पामध्ये कोठेही कृत्रिमता दिसत नाही. स्वाभाविकता, संयम, भावाविष्कार इत्यादि गुणांमुळे या मूर्ति गुप्तकालातील दिसतात.

श्री विनोबांनी या शिल्पाला 'भरतभेट' असें नाव देऊन त्याचा फलकहि दरवाज्यावर लावला आहे. हें नाव सार्थ आहे यात शंका नाही. पण 'भरतभेट' या नावानें श्रीरामचंद्र रावणवधानंतर सीता, लक्ष्मण, सुग्रीव, बिभीषण, हनुमान इत्यादिकांसह नंदिग्रामास आले त्या वेळीं त्यांची भरताशीं झाला ती भेट असें सामान्यतः समजण्यात येतें. ती भेट या शिल्पाचा विषय नाही. या शिल्पात चित्रित केलेली भरतभेट चित्रकूट पर्वतावरची होय. मातुलगराहून अयोध्येला आल्यावर भरताला रामादिकांचें वनवासगमन व दशरथाचें निधन यांची वार्ता समजली. लागलीच आपले मंत्री, सैन्य अयोध्येचे प्रजाजन इत्यादिकांसह तो रामाला परत आणण्याकरिता निघाला. राम तेव्हा चित्रकूट पर्वतावर होता. दुरून धुळीचा लोट दिसताच त्याने लक्ष्मणाला वृक्षावर चढून कोण येत आहे

नें पाहण्यास सांगितलें. लक्ष्मणाने हत्ती, घोडेस्वार, रथ, पायदळ इत्यादि-कांनी युक्त अशी कोविदारध्वजांकित सेना पाहून भरतच येत असावा असें अनुमान केलें व तो म्हणालाः—

संपन्नं राज्यमिच्छंस्तु व्यक्तं प्राप्याभिषेचनम् ।
आवां हन्तुं समभ्येति कैकेय्या भरतः सुतः ॥

. . . . . . . . . . .

संप्राप्तोऽयमरिर्वीर भरतो वध्य एव हि ।
भरतस्य वधे दोषं नाहं पश्यामि राघव ॥
पूर्वापकारिणं हत्वा न ह्यधर्मेण युज्यते ।
पूर्वापकारी भरतस्त्यागे धर्मश्च राघव ॥*

'स्वतःला राज्याभिषेक झाला असताहि त्याने संतुष्ट न होता समृद्ध राज्याची इच्छा करणारा हा भरत आपणा दोघाना ठार मारण्याकरिता येत आहे. हा आपला शत्रु आहे. याला ठार मारण्यात काही दोष मला दिसत नाही. त्यानेच प्रथम अपराध केला असल्यामुळे त्याला मारण्यात पाप लागणार नाही, उलट पुण्यच लागेल.'

यावर रामाने भरताच्या आगमनाचें कारण हें नसून तो आपणास अयोध्येस परत नेण्याकरिता आला असावा, आपणाला इजा करण्याचें कधी त्याच्या मनातहि आलें नसेल इत्यादि सांगून लक्ष्मणाचा गैरसमज दूर केला. तथापि त्याच्या मनातील अढी गेली नाही. ही लक्ष्मणाची मनो-वृत्ति प्रस्तुत शिल्पात दाखविली आहे. राम व भरत प्रेमाने परस्पराशीं बोलत असतां लक्ष्मण त्यांच्याकडे न पाहता विरुद्ध दिशेस पाहात आहे. तेव्हा ही 'भरतभेट' नन्दिग्रामीं झालेली नसून वनवासाच्या आरंभीं चित्र-कूट पर्वतावर झालेली होय यात संशय नाही.

---

* रामायण (निर्णयसागर प्रत), सर्ग ९६, श्लो. १७, २३-२४.

† प्रस्तुत शिल्पांत रामाने आपला हात भरताच्या हातावर ठेवून त्याचे स्वागत केलेले दिसते. त्याविषयी रामायणातील वर्णन पुढीलप्रमाणे आहे—कथञ्चिदभिविज्ञाय विवर्णवदनं कृशम् । भ्रातरं भरतं रामः परिजग्राह पाणिना ॥ अयोध्याकांड, सर्ग १००, श्लो. २.

अंधिमाच्या मागे सापडलेलें दुसरें शिल्प श्री विनोबाजींनी एक लहानशी कुटी करून तींत ठेवलें आहे या शिल्पाचा विषय काय आहे याविषयी मी अनेक तज्ज्ञांशीं चर्चा केली. कोणीं त्याला 'अहिल्योद्धार' तर कोणी त्याला 'अहिरावणवध' असें नाव दिलें. पण त्याचें बारकाईनें निरीक्षण केल्यावर तें वालिवधाचें शिल्प आहे, याविषयी माझी खात्री झाली. यासबंधी रामायणात खालील वर्णन आहे.

सीतेच्या शोधार्थ राम व लक्ष्मण हिंडत हिंडत किष्किंधेस आले. तेथे हनुमानाची व त्याची गाठ पडून त्याच्या मध्यस्थीने त्याचें सुग्रीवाशी सख्य झालें सुग्रीवाची पत्नी रुमा हिला त्याचा भाऊ वाली याने पळविली असल्याने तोहि दुःखी होता. त्याने सीतेचा शोध करण्यात मदत करण्याचें वचन देऊन वालीचें पारिपत्य करण्यात रामाची मदत मागितली. रामाने ती देण्याचें कबूल केल्यावर सुग्रीवाने वालीला युद्धाचें आव्हान दिलें त्याच्या युद्धात सुग्रीवाला पाडाव होत आहे असें पाहताच रामाने वृक्षाआडून बाण मारून वालीला घायाळ केलें वाली जमिनीवर पडला तेव्हा त्याला पाहण्यास राम व लक्ष्मण आले त्याना पाहून वालीने रामाची पुष्कळ निर्भर्त्सना केली तो म्हणाला—

> हत्वा बाणेन काकुत्स्थ मामिहानपराधिनम् ।
> किं वक्ष्यसि सतां मध्ये कर्म कृत्वा जुगुप्सितम् ॥
> शठो नैकृतिकः क्षुद्रो मिथ्याप्रश्रितमानसः ।
> कथं दशरथेन त्वं जातः पापो महात्मना ॥*

'निरपराधी अशा मला बाणाने ठार मारून निन्द्य कर्म केल्यावर सज्जनाच्या सभेंत तू याचा काय जबाब देशील ? महात्मा दशरथाला तू असा लबाड, हिंसक, क्षुद्र, ढोंगी व पापी मुलगा कसा झालास ?' त्यावर रामाने खालील उत्तर दिलें—

> इक्ष्वाकूणामियं भूमिः सशैलवनकानना ।
> मृगपक्षिमनुष्याणां निग्रहानुग्रहेष्वपि ॥

---

* रामायण, किष्किन्धा काड, सर्ग १७, श्लो ३५, ४३.

तां पालयति धर्मात्मा भरतः सत्यवाग्नृजुः ।
धर्मकामार्थतत्त्वज्ञो निग्रहानुग्रहे रतः ॥

. . . . . . . . . . .

तस्य धर्मकृतादेशा वयमन्ये च पार्थिवाः ।
चरामो वसुधां कृत्स्नां धर्मसन्तानमिच्छवः ॥

. . . . . . . . . . .

तदेतत्कारणं पश्य यदर्थं त्वं मया हतः ।
भ्रातुर्वर्तसि भार्यायां त्यक्त्वा धर्मं सनातनम् ॥
न हि लोकविरुद्धस्य लोकवृत्तादपेयुषः ।
दण्डादन्यत्र पश्यामि निग्रहं हरियूथप ॥*

'ही सर्व भूमि इक्ष्वाकूंची आहे. मृग, पक्षि, मनुष्य यांचा निग्रह किंवा अनुग्रह करण्याचा अधिकार त्यांचा आहे. या भूमीवर धर्मात्मा, ऋजुस्वभावी व सत्यशील असा भरत राज्य करीत आहे. तो निग्रहानुग्रह करीत असतो. त्याच्या आज्ञेने मी व इतर राजे धर्मपालनार्थ हिंडत असतो. तुला मारण्याचें कारण हें की तूं आपल्या भावाच्या पत्नीशीं व्यभिचार करीत असतोस. असें लोकविरुद्ध आचरण करणाऱ्यास दण्डाशिवाय इतर शासन मला माहीत नाहीं.'

वालिवधाचा हा प्रसंग प्रस्तुत शिल्पांत दाखविला आहे. वाली जमिनीवर पडला आहे. रामाच्या बाणाने घायाळ झाल्यामुळे रक्तस्रावाने तो व्याकुळ झाला होता. तथापि डाव्या हातावर भार टाकून तो अर्धवट उठून बसला आहे व उजव्या हाताने मान सावरून रामाकडे पाहत आहे. राम 'प्रत्यालीढ' स्थानात उभा आहे. त्याचा डावा पाय पुढे असून वाकला आहे. उजवा पाय मागे ताठ आहे. डावा हात मांडीवर ठेवला आहे. उजव्या हातात कांहीं वस्तु आहे. रामाच्या मुद्रेवर तिरस्कार-युक्त अभिमान आहे. त्याचें शरीर सौष्ठवयुक्त आहे. त्याच्या उभे राहण्याच्या ढबीमुळे उजव्या छातीजवळचा भाग फुगीर झाल्याचें दाखविलें आहे. यांत शिल्पकाराची निरीक्षणशक्ति, शरीरशास्त्रज्ञान व

* रामायण, किष्किन्धा कांड, सर्ग १८, श्लो. ६, ७, ९, १८, २१.

शिल्पकौशल्य स्पष्टपणे दिसून येतात. रामाच्या गळयात एक साधा हार व कमरेला कटिबंध दाखविला आहे. त्याच्या मागील बाजूस लक्ष्मण व सुग्रीव उभे आहेत. जवळच मोठया आकाराची फुलें कोरून त्यायोगें त्या वृक्षामागून रामाने बाण मारला तेही दाखविले आहेत. वृक्ष दाखविण्याची ही प्राचीन पद्धत गुप्तकालीन शिल्पात आढळते. झाशी जिल्ह्यात देवगड येथे गुप्तकालीन 'दशावतार' देवळाला लावलेलें अहिल्योद्धाराचें शिल्प आहे. त्यात अरण्यातील वृक्ष असेच दाखविले आहेत. साधेपणा, स्वाभाविकता, संयम, धार्मिकता हे गुप्तकालीन शिल्पाचे विशेष मानण्यात येतात. ते सर्व या दोन्ही शिल्पात आढळतात म्हणून तीं निःसंशय गुप्तकालीन होत.

या दोन सुंदर शिल्पावरून पवनार येथे श्री विनोबाजींचा आश्रम आहे त्याजवळच धाम नदीच्या काठीं इ. स. च्या चौथ्या-पाचव्या शतकात श्रीरामचंद्राचें सुंदर देवालय होतें हें स्पष्ट दिसतें. हीं शिल्पें त्या देवालयाच्या भिंतींना भूषित करण्याकरिता लाविलीं असावीं. वर उल्लेखिलेल्या देवगड येथील गुप्तकालीन देवालयाला अशीं शिल्पें लावलेली अद्यापि विद्यमान आहेत.

हें देवालय कोणी बांधलें असावें याचा विचार करता एक कल्पना सहजच सुचते. इ. स. च्या चौथ्या पाचव्या शतकात—ज्या कालातील हीं शिल्पें आहेत त्या कालात—वाकाटकाचें विदर्भावर मुख्यत्वें असें राज्य होतें. त्यांच्या आरंभीच्या राजधान्या पुरिका व चनका या पुराणात उल्लेखिल्या आहेत.* तथापि वाकाटकाचे आरंभीचे कोरीव लेख प्राप्त न झाल्यामुळे त्यांचा उल्लेख इतरत्र कोठे आढळत नाही. वाकाटकसम्राट् प्रथम प्रवरसेन याच्या निधनानंतर त्याच्या चार मुलांत साम्राज्याची वाटणी झाली. त्यांपैकी थोरल्या पातीने नागपूर जवळचें नन्दिवर्धन ( सध्याचें रामटेकजवळचें नन्दरधन किंवा नगरधन ) येथे आपली राज-

* पार्जिटरकृत कलियुगातील राजवंश, पृ ५० येथील मूळचा पाठ 'पुरिकां चनकां च वै' हें डॉ जयस्वालांचे मत येथे स्वीकारले आहे.

धानी स्थापिली. वाकाटकांचे सर्वांत प्राचीन असे चार ताम्रपट नन्दिवर्धनाहून दिलेले आहेत. त्यांतील पहिला ताम्रपट वाकाटकराज्ञी प्रभावतीगुप्ता हिचा होय.* हा तिने आपला अल्पवयस्क मुलगा दिवाकरसेन याच्या नावाने राज्य करीत असता दिला होता. त्यानंतरचे तीन ताम्रपट तिचा दुसरा मुलगा द्वितीय प्रवरसेन याच्या काळचे आहेत.† ते त्याच्या कारकीर्दीच्या आरंभीचे म्हणजे राज्यारंभापासून दुसऱ्या व तेराव्या वर्षी दिलेले आहेत. त्यानंतरचे ताम्रपट मात्र द्वितीय प्रवरसेनाने प्रवरपुराहून दिले आहेत.‡ या नगराचें नाव त्याच्याच ताम्रपटात प्रथम येत असल्याने त्याने तें नगर आपल्या नावाने स्थापून तेथे आपली राजधानी नेली असावी असें दिसतें.

या प्रवरपुराचा शोध अद्यापि लागला नाही. पवनारच्या गुप्तकालीन अवशेषांवरून तेंच प्राचीन प्रवरपुर असावें असें वाटतें. भाषाशास्त्राच्या नियमाप्रमाणे 'प्रवरनगर' नें कालान्तराने 'पवनार' असें रूप होणें अगदी शक्य आहे.§ पवनार येथे या शिल्पाखेरीज अनेक भग्न मूर्तींचे अवशेष सापडले आहेत. शिवाय तेथे धाम नदीच्या दोन्ही तीरावर दूरपर्यंत मोठ्या आकाराच्या प्राचीन विटा सापडतात असें श्री विनोबांनी आम्हांस सांगितलें, त्यावरून या नगराच्या विस्ताराची कल्पना करता येते.

मागे सांगितल्याप्रमाणे पवनार येथे गुप्तकाळीं श्रीरामचंद्राचें सुंदर देवालय होतें. पवनार हें प्राचीन प्रवरपुर (किंवा प्रवरनगर) मानल्यास हें देवालय गुप्तवाकाटककाळीं येथे का असावें याचीहि उपपत्ति लावता येते. वाकाटक राजे सामान्यतः शिवोपासक होते ते

---

* एपिग्राफिया इंडिका, पु. १५, पृ. ३९. इ.

† ए. इं. पु. २६, पृ. १५५; पु. २४, पृ. २६०.

‡ गुप्तकालीन कोरीव लेख (स. फ्लीट), पृ. २३५ व २४३.

§ प्रवरनगर-पवअनअर-पवनार अशी व्युत्पत्ति लावता येते. कालान्तराने प्रवरसेनाची विस्मृति झाल्यावर पवनारच्या लोककथांमध्ये पवनराजाशी संबंध जोडण्यात आला असावा.

आपणास ‘ परममाहेश्वर ’ ( श्रीशंकराचे परमोपासक ) म्हणवीत. याला फक्त दोनच अपवाद माहीत आहेत. ते म्हणजे प्रभावतीगुप्तेचा पति द्वितीय रुद्रसेन व त्याचा पणतू द्वितीय पृथिवीषेण हे होत. हे दोन वाकाटक नृपति विष्णूपासक होते. द्वितीय पृथिवीषेणाच्या काळाविषयी आपणास फारशी माहिती नाही, पण द्वितीय रुद्रसेन विष्णूपासक कसा झाला हें सांगणें कठीण नाही. या राजाची पत्नी प्रभावतीगुप्ता ही सुप्रसिद्ध गुप्तसम्राट् द्वितीय चंद्रगुप्त-विक्रमादित्य याची कन्या होती.* गुप्तसम्राट् विष्णूपासक असत. द्वितीय चन्द्रगुप्त हा आपणास ‘ परम-भागवत ’ म्हणवी. प्रभावतीगुप्ता ही अपल्या पित्याप्रमाणे विष्णूपासक होती. हिच्याच वर्चस्यामुळे द्वितीय रुद्रसेन हा विष्णूपासक बनला असें मानण्यास हरकत नाही.

विवाहानंतर लौकरच प्रभावतीगुप्तेवर वैधव्याचा प्रसंग आला, तरी धैर्य खचू न देता तिने आपल्या अल्पवयस्क मुलांच्या नांवें अनेक वर्षें राज्य केलें. ती अत्यंत धर्मशील होती. तिचे दोन ताम्रपट सापडले आहेत. ते दोन्ही कार्तिक शुक्ल द्वादशीस ब्राह्मणास दिले असून त्यात तिच्या ग्रामदानाचा निर्देश आहे. कार्तिकी एकादशीस प्रबोधिनी एकादशी म्हणतात. कारण या दिवशीं भगवान् विष्णु चातुर्मासानंतर आपल्या भुजगशय्येवरून उठतात असें मानण्यात येतें. या पवित्र दिवशीं उपवास करून द्वादशीस पारण्याच्या प्रसंगीं हे ताम्रपट दिलेले दिसतात. द्वितीय प्रवरसेनाने इतरहि कांही ताम्रपट याच तिथीस दिले आहेत. तो स्वतः परममाहेश्वर होता. तेव्हा या इतर ताम्रपटांत प्रभावतीगुप्तेचा साक्षात् उल्लेख नसला तरी ते त्याने आपल्या मातेच्या इच्छेवरूनच दिले होते असें अनुमान करण्यास हरकत नाही.

प्रभावतीगुप्ता केवळ विष्णूपासक नसून रामभक्त होती. ऋद्धपूरला सापडलेला तिचा ताम्रपट रामगिरिस्वामीच्या म्हणजे रामगिरीवरील श्रीरामचंद्राच्या पादुकांजवळ दिला होता असा त्यात स्पष्ट निर्देश

* भा इ स म. त्रैमासिक, वर्ष ३, पृ. ८९, ए इं., पु. १५, पृ. ४१.

आहे.* रामगिरीवर श्रीरामचंद्राच्या पादुकांची पूजा होत असे हें कालिदासाच्या मेघदूतावरून दिसतें.† हा रामगिरि म्हणजे नागपूर-जवळचें रामटेक होय हें आम्ही इतरत्र सिद्ध केलें आहे.‡ रामटेक-जवळचें नगरधन (किंवा नन्दरधन) हें वाकाटकांची राजधानी नन्दिवर्धन होय हेंहि आता निश्चित झालें आहे.

प्रभावतीगुप्तेचा मुलगा द्वितीय प्रवरसेन हा स्वतः शिवोपासक होता, तरी त्यानें सेतुबन्ध हें उत्कृष्ट प्राकृत काव्य रामचरितावर रचलें, तेंहि प्रभावतीगुप्तेच्या इच्छेवरूनच असावें या काव्याची प्रशंसा बाण, दण्डी, आनंदवर्धन इत्यादि अनेक संस्कृत ग्रंथकारांनी केली आहे.

वाकाटकांची राजधानी नन्दिवर्धनास होती तोंपर्यंत जवळच असलेल्या रामगिरीस जाऊन प्रभावतीगुप्तेला आपल्या इष्टदेवतेचें दर्शन घेता येत असे. पण द्वितीय प्रवरसेनानें प्रवरपुर स्थापून तेथे राजधानी नेल्यावर प्रभावतीगुप्तेला श्रीरामप्रभूच्या दर्शनाकरिता तेथे देवालयाची जरूरी भासली असावी व तिच्याच आज्ञेवरून प्रवरपुरात (सध्याच्या पवनारात) श्रीरामचंद्राचें उत्तुंग देवालय बांधलें गेलें असावें. या देवालयाच्या भिंतींना भूषित करण्याकरिता हीं दोन शिल्पें लावलीं असावीं. या देवालयातील मुख्य मूर्ति अद्यापि सापडली नाही. त्या जागीं उत्खनन केल्यास ती कदाचित् सापडेलहि. या शिल्पावरून तिच्या सौन्दर्याची कल्पना करता येईल.

गुप्त–वाकाटक काळाला प्राचीन भारतीय इतिहासाचें सुवर्णयुग मानण्यात येतें. या काळात संस्कृत व प्राकृत वाङ्मय व विविध कला यांची अत्यंत भरभराट झाली. याच काळात अजठ्याचीं सोळा, सतरा व एकोणीस नंबरचीं लेणीं कोरविलीं गेलीं. हीं शिल्पकला व चित्रकला

---

* 'रामगिरिस्वामिनः पादमूलात् ।' भा इ. स म. त्रै., वर्ष २, पृ. ९३.

† वन्द्यैः पुंसां रघुपतिपदैरङ्कितं मेखलासु । मेघदूत, श्लो. १२.

‡ मागें, पृ. ५३–६४ (वा वि मि).

या दोन्ही दृष्टींनी अप्रतिम आहेत. दुर्दैवाने फारच थोडी वाकाटक-गुप्तकालीन शिल्पें अद्यापि अस्तित्वात आहेत. त्या काळीं विदर्भात अनेक ठिकाणीं देवालयें बांधली गेली असावीं. ज्यांचा निर्देश तत्कालीन ताम्रपटांत आढळतो.* तथापि विदर्भात अद्यापि कोठेंहि उत्खनन झालें नसल्यामुळे गुप्तवाकाटककालीन शिल्पें अत्यंत दुर्लभ आहेत. प्रस्तुत शिलाशिरोज असें एकच शिल्प आमच्या माहात आहे, तें रामटेकवरील त्रिविक्रमाचें होय. यामुळे येथे यदृच्छेने सापडलेल्या या दोन शिल्पांचें महत्त्व अधिकच वाटतें.

वाकाटककालानंतर प्रवरपुर ही विदर्भाची राजधानी राहिली नाही. तथापि त्याचें महत्त्व नाहींसें झालें नव्हतें असें दिसतें. कारण त्यानंतरचीं मध्ययुगीन दोन शिल्पें पवनार येथे सापडलीं आहेत. त्यांपैकी एक धाम नदीच्या तीरावर एका देवळात ठेवलें आहे. हें शिल्प मोठ्या आकाराचें आहे. यात शेषशायी विष्णूची भव्य मूर्ति आहे. भगवान् विष्णु शेषावर निजले असून त्यांच्या नाभीतून निघालेल्या कमलावर बसलेला ब्रह्मदेव दाखविला आहे. ब्रह्मदेवाचीं चार तोंडें चिमटीने मातीच्या गोळ्याला आकार देऊन बनवावीं त्या प्रकारचीं दिसतात. त्याच्या दोन्ही बाजूंस इतर देव दिसतात. विष्णूच्या पायांजवळ लक्ष्मी बसली असून ती ते चुरीत असल्याचें दाखविलें आहे. एकंदरीत या मूर्तीचें काम अगदी सामान्य प्रतीचें असून ती भारतीय शिल्पकलेच्या निकृष्टावस्थेच्या काळात बनविलेली दिसते.

याच्या उलट, उत्कृष्ट काम केलेली दुसरी एक मूर्ति पवनारासच सापडली होती. ती सध्या श्री. जमनालाल बजाज यांनी स्थापिलेल्या संग्रहालयात ठेविली आहे. ही मूर्ति विष्णूची असून ती काळ्या पाषाणाची बनविली आहे. विष्णूच्या चार हातात शंख, चक्र, गदा व अक्षमाला आहेत. त्याच्या डाव्या बाजूस लक्ष्मी व उजव्या बाजूस

* प्रस्तुत लेखकाने अलीकडे संपादलेल्या द्वितीय प्रवरसेनाच्या पट्टन येथील ताम्रपटात विष्णूच्या पादुकांच्या देवळाचा उल्लेख आहे- ए इं., पु २३, पृ ८६ पाहा.

गरुड आहे विष्णूच्या मस्तकावरचा किरीट, गळ्यातले हार, श्रीवत्स व अधोवस्त्र हीं उत्कृष्ट रीतीने कोरलीं आहेत. मूर्तीमागची प्रभावळहि सुंदर असून तीवर बुद्धासहित दशावतार दाखविले आहेत त्यामध्ये रामानंतर परशुराम व कृष्णाबद्दल बलराम घातले आहेत * मूर्तीचें बारीक काम, दागिन्यांची रेलचेल, व या दशावताराच्या मूर्ति यावरून ही मूर्ति बरीच नंतरची म्हणजे मध्ययुगीन कालातील ( इ. स. १०–११ व्या शतकातील ) दिसते

पवनारचें महत्त्व मुसलमानी अमलापर्यंत टिकून होतें या ठिकाणीं दिल्लीच्या मुसलमान बादशहाचा फौजदार राहत असून देवगड व चांदा येथील गोंड राजाकडून बादशहाची खंडणी वसूल करीत असे मराठ्यांच्या अमदानींत पवनार हें परगण्याचें मुख्य ठिकाण झालें. येथे एक कमाविसदार राहत असे. येथे एक जुना किल्ला असून त्यावर एक देवनागरी लिपींत लिहिलेला लेख आहे असें समजतें.

मागे सांगितल्याप्रमाणे पवनारला प्राचीन अवशेष विपुल आहेत. या लेखात वर्णिलेल्या शिल्पावरून वाकाटक कालात हें नगर महत्त्वाचें होतें व येथे श्रीरामचंद्राचे सुंदर देवालय होतें असें स्पष्ट दिसतें. पवनार हें नाव प्रवरनगराचें अपभ्रष्ट रूप आहे यात संशय नाही. या सर्व उपलब्ध प्रमाणावरून सध्याचें पवनार हें एका काळीं वाकाटकांची सुसमृद्ध राजधानी असलेलें प्रवरनगर किंवा प्रवरपुर असावें असा तर्क होतो. याविषयीं निश्चित पुरावा या जागेची सूक्ष्म पाहणी करून उत्खनन केल्यास मिळण्याचा संभव आहे तेव्हा या स्थलाकडे भारत सरकारच्या पुराणवस्तुसंशोधन खात्याचें लक्ष वेधून हा लांबलेला लेख पुरा करतो

---

* या तऱ्हेच्या दशावताराच्या मूर्ति विष्णूच्या प्रभावळीवर इतरत्रहि आढळतात इंडियन म्यूझियमधील एका शिल्पात हे दशावतार उजवीकडून डावीकडे याच क्रमाने दाखविले आहेत राखालदास बॅनर्जींचे ईस्टर्न अॅन्ड इंडियन स्कूल ऑफ मेडिव्हल स्कल्प्चर, पृ १०२.

# विद्धशालभञ्जिकेंतील राजकारणाचें प्रतिबिंब*

## नाटिका त्रिपुरी येथे रंगभूमीवर आली

संस्कृत साहित्यांत जीं थोडीं ऐतिहासिक पार्श्वभूमि असलेलीं नाटकें आहेत, त्यांमध्ये राजशेखराच्या विद्धशालभंजिकेची गणना होते. या नाटिकेंतील नायक कर्पूरवर्ष हा त्रिपुरीचा कलचुरि राजा पहिला युवराजदेव ऊर्फ केयूरवर्ष असून हें नाटक त्रिपुरी येथे प्रथम रंगभूमीवर आलें, हें डॉ. हुल्श या जर्मन विद्वानाने सन १९०५ मध्येच दाखविलें होतें. त्या नाटकांतील इतर ऐतिहासिक घटनांचा शोध मात्र त्याला लागला नव्हता. कलचुरि लेखांचा अभ्यास करतांना प्रस्तुत लेखकाला त्याविषयी एक कल्पना सुचली. तत्कालीन ऐतिहासिक साधनांचा अभ्यास करून या विषयावर त्याने भांडारकर संशोधन मंडळाच्या त्रैमासिकांत सुमारें वीस वर्षांपूर्वी एक लेख लिहिला होता. त्यानंतर उपलब्ध झालेल्या सामग्रीवरून विद्धशालभंजिकेंतील ऐतिहासिक घटनेवर जास्त प्रकाश पडला आहे. त्याविषयी माहिती प्रस्तुत लेखांत देण्याचा प्रयत्न केला आहे.

## वत्सगुल्म– राजशेखराचें मूळ निवासस्थान

विद्धशालभंजिकेचा कर्ता राजशेखर याच्या विषयी इतर संस्कृत कवींच्या मानाने बरीच माहिती उपलब्ध आहे. हा स्वतःला व आपल्या पूर्वजांना ‘ महाराष्ट्रचूडामणि ’ असें विशेषण लावतो, त्यावरून त्याचा महाराष्ट्राविषयी अभिमान व्यक्त होतो. आपल्या ‘काव्यमीमांसा’ नामक ग्रंथात विदर्भांतील वत्सगुल्म हें नगर भगवान् मदनाचें क्रीडास्थान आहे

* ‘तरुणभारत’, नागपूर, दिवाळी विशेषांक, १९५०.

व तेथे काव्यपुरुषाचा साहित्यविद्यावधूशीं विवाह झाला, असें आलंकारिक वर्णन त्याने केलें आहे. कर्पूरमंजरी नामक दुसऱ्या ग्रंथातहि वत्सगुल्माचा उल्लेख आला आहे. प्राचीन साहित्यग्रंथांत वैदर्भी रीतीला सर्वोत्कृष्ट म्हटलें आहे. राजशेखर आपल्या कर्पूरमंजरी या प्राकृत नाटकात वैदर्भीचा ' वच्छोमी ' असा पर्याय देतो. तो ' वात्सगुल्मी ' या शब्दाचा अपभ्रंश आहे. पण तो इतरत्र रूढ झालेला दिसत नाही. या सर्वांवरून राजशेखराचें वत्सगुल्माविषयीचें प्रेम व्यक्त होतें. वत्सगुल्म म्हणजे अकोला जिल्ह्यातील वाशीम हें वाकाटकांच्या एका शाखेचें राजधानीचें शहर असल्याने इ. स. च्या चौथ्या-पाचव्या शतकात तें अत्यंत भरभराटींत होतें. पण त्यानंतरच्या राजवटींत तेथून राजधानी हलविल्यामुळे त्याचें महत्त्व पुष्कळच कमी झालें असावें. असें असताहि वाकाटकांच्या काळानंतर चारशें वर्षांनी झालेला राजशेखर त्या नगराचा इतक्या गौरवाने निर्देश करतो, त्यावरून तो तेथील मूळचा रहिवासी असावा, असें अनुमान करण्यास हरकत नाही. तेव्हा भवभूतीप्रमाणे राजशेखरहि वैदर्भ कवि होता असें म्हणता येते.

### राजशेखराचें चरित्र

राजशेखर हा यायावर कुळात जन्मला होता. त्याचे पूर्वज अकालजलद, सुरानंद व तरल हे हि-आपल्या कवित्वाने प्रसिद्धीस आले होते. यांचीं कांही सुभाषितें प्राचीन सुभाषितसंग्रहात घेतलीं आहेत. याना त्रिपुरी ( जबलपूरजवळचें सध्याचें तेवर ) येथील कलचुरि राजाचा आश्रय होता. राजशेखर हा अकालजलदाचा पणतू. याच्या पित्याचें नाव दुर्दुक व मातेचें शीलवती. राजशेखर स्वतः ब्राह्मण होता, तरी त्याने चाहुआन किंवा चव्हाण नामक क्षत्रियकुळातील अवन्तिसुन्दरी या स्त्रीशीं विवाह केला होता. प्राचीन काळीं असे अनुलोम विवाह स्मृतिसंमत होते. अवन्तिसुन्दरी ही मोठी विदुषी होती. हिचीं अलंकारविषयक कांही मतें राजशेखराने आपल्या काव्यमीमांसेंत उल्लेखिलीं आहेत.

राजशेखर लहानपणापासून कवित्वाबद्दल प्रसिद्ध होता. त्यामुळे त्याला ' बालकवि ' अशी सार्थ पदवी मिळाली होती. पुढे त्याला कनोजचा सम्राट् महेन्द्रपाल याचा आश्रय मिळाला. या प्रतीहारवंशी राजाचें साम्राज्य इ. स. च्या दहाव्या शतकाच्या आरंभीं उत्तर हिंदुस्थानच्या बऱ्याचशा भागावर पसरलें होतें असा बलाढ्य सम्राट् आपणास गुरु मानतो, याचा साभिमान उल्लेख राजशेखराने आपल्या नाटकांत केला आहे. कनोजला असतांना राजशेखरला 'कविराज' ही पदवी मिळाली. महेन्द्रपाल व त्याचा मुलगा महीपाल यांच्या दरबारीं असतांना राजशेखराने बालरामायण, बालभारत व कर्पूरमंजरी हीं संस्कृत व प्राकृत नाटकें लिहिलीं. इ स. ९१८ च्या सुमारास राष्ट्रकूटनृपति तृतीय इन्द्र याने कनोजवर स्वारी करून तें नगर उध्वस्त केलें. तेव्हापासून प्रतीहाराच्या साम्राज्याला उतरती कळा लागली म्हणून राजशेखर त्रिपुरी येथे कलचुरि राजाच्या आश्रयास आला. तेथे त्याने विद्धशालभंजिका ही नाटिका व काव्यमीमांसा हा साहित्यशास्त्रावरचा अपूर्ण ग्रंथ हे लिहिले.

## विद्धशालभंजिकेचें कथानक

विद्धशालभंजिकेच्या प्रस्तावनेंतील व इतर उल्लेखावरून ती नाटिका त्रिपुरी येथे युवराजदेव ऊर्फ केयूरवर्ष या कलचुरि नृपतीच्या विजयोत्सवाच्या प्रसंगीं प्रथम रंगभूमीवर आली असें स्पष्ट दिसतें. या नाटिकेचें संविधानक पुढीलप्रमाणें आहे—

त्रिपुरीचा राजा युवराजदेव ऊर्फ कर्पूरवर्ष याच्या दरबारीं कुन्तलदेशचा वीरपाल साहाय्यार्थ येतो त्याची मुलगी कुवलयमाला हिच्यावर कर्पूरवर्षाचें प्रेम बसतें कर्पूरवर्षाच्या राणीचा मामा लाट किंवा गुजराथ देशाचा राजा चन्द्रवर्मा याला मुलगा नसल्यामुळे त्याने आपल्या मृगांकावलि नामक मुलीलाच मुलगा म्हणून वाढविलें होतें, व त्यानें मृगांकवर्मा असें नाव ठेवलें होतें मृगांकावलीचें ज्याच्याशीं लग्न होईल, तो चक्रवर्ती राजा होईल असें ज्योतिष्यांनी भविष्य केलें

होतें. तें कर्पूरवर्मांचा मन्त्री भागुरायण याला माहीत असल्याने त्याने तिला मृगांकवर्मारूपाने त्रिपुरीस आणलें. त्याचें कन्यासदृश रूप पाहून राणी मौजेने त्याला कधी कधी स्त्रीवेष देत असे. या वेषात मृगांकावलि राजाच्या दृष्टीस पडते व त्याचें तिच्यावर प्रेम बसतें. तिचेंहि प्रेम राजावर बसतें. पुढे अनेक प्रसंगीं परस्परास दर्शन होऊन त्यांचें परस्परावरचें प्रेम वाढत जातें. राणीला राजाचें कुवलयमाला या कुन्तलराजकन्येवर बसलेलें प्रेम माहीत झाल्यावर ती राजाच्या तावडींत सापडूं नये म्हणून ती तिचें लग्न आपला मामेभाऊ मृगांकवर्मा याच्याशीं लावून देते; व नित्य नव्या नव्या तरुणींवर आसक्त होणाऱ्या आपल्या पतीची फजिती करण्याच्या हेतूने ती त्याला निरोप पाठविते की 'माझ्या मामाने मृगांकवर्म्याची बहीण मृगांकावलि हिला माझ्याकडे पाठविली आहे व कोणी योग्य वर पाहून त्याला ती देण्याविषयीं सांगितलें आहे. तिचा विवाह ज्याच्याशीं होईल तो चक्रवर्ती राजा होईल असें भविष्य आहे. म्हणून मी तुमच्याशीं तिचा विवाह लावून देणार आहे. आपण विवाहास तयार असावें.' राणीच्या कारस्थानाची बातमी विदूषकाला कळते व तो राजाला विवाहाला तयार राहण्यास सांगतो. ठरल्याप्रमाणे राजा व मृगांकावलि यांचा विवाह होऊन लाजाहोमहि होतो. राणीला वाटतें की आपण राजाचा विवाह एका तरुणाशी लावून त्याची फजिती करीत आहों. पण तिचें कारस्थान तिच्याच गळयात येतें. कारण तितक्यात तिचा मामा चन्द्रवर्मा याचा संदेश येतो की, 'मला नुकताच मुलगा झाला आहे. तेव्हा जिला मी मुलगा म्हणून वाढविलें होतें, ती मृगांकावलि कोणा योग्य वरास द्यावी.' हें ऐकताच आपण करावयाला गेलों एक आणि झालें भलतेंच हें राणीला समजतें. तथापि, झालें तें ठीकच झालें असें म्हणून ती त्या विवाहाला संमति देते. इतक्यात विदूषक म्हणतो, "अहो या कुवलयमालेचा मृगांकवर्म्याशीं विवाह झाला होता. मृगांकवर्मा तर मृगांकावलि होऊन आमच्या राजेसाहेबांची भार्या झाला आहे. 'भार्या पुत्रश्च दासश्च त्रय एवाधनाः स्मृताः। यत्ते समधिगच्छन्ति यस्य ते तस्य तद् धनम्॥' असें स्मृतिवचन आहे. भार्येच्या मिळकतीवर पतीचें

स्वामित्व असतें. तेव्हां कुवलयमालादि आमच्या महाराजांची झाली. तिच्याशींहि त्याचें लग्न याच विवाहकंकणानें होऊं द्या!" राणीला याहि विवाहाला संमति देणें भाग पडतें. इतक्यात एक दूत येऊन श्रीवत्स सेनापतीचा खलिता राजाला सादर करतो. त्यात श्रीवत्स कळवितो की, राज्यापासून भ्रष्ट झालेला कुन्तलाधिपति वीरपाल आपल्या आश्रयास आला होता त्याला पुढे करून आम्ही पयोष्णीच्या तीरावर आपल्या सैन्याचा तळ दिला. तेथे घनघोर युद्ध होऊन कर्णाटाच्या सैन्याचा पराजय झाला. नंतर आम्ही वीरपालाला त्याच्या गादीवर बसविलें. हा खलिता वाचल्यावर भागुरायण मंत्री जाहीर करतो की, पूर्वी आमच्या करचुलि महाराजानी पूर्व, पश्चिम व उत्तर दिशांच्या राजाना जिंकलें होतें. आता दक्षिण दिशेच्या राजाना जिंकून ते सर्व पृथ्वीचें चक्रवर्ती झाले आहेत. नंतर भरतवाक्यानें नाटिका समाप्त होते.

## नाटिकेचें ऐतिहासिक महत्त्व

विद्धशालभंजिकेचें कथानक कालिदासाच्या मालविकाग्निमित्राच्या धर्तीवर रचलें आहे. नायिकेशीं जो विवाह करील त्याला चक्रवर्तिपद प्राप्त होईल, या भविष्याची कल्पना हर्षाच्या रत्नावली नाटकात प्रथम आढळते. तसेंच भासाच्या स्वप्नवासवदत्ता नाटकांत ऐतिहासिक पार्श्वभूमीचा उपयोग प्रथम केलेला दिसतो. पण एकंदरीत राजशेखराच्या या नाटकात भासकालिदासांचें संविधानकचातुर्य दिसत नाही. नाटकातील ऐतिहासिक प्रसंगहि संविधानकाशीं एकजीव झालेला दिसत नाही. याप्रमाणें नाटक या दृष्टीनें विद्धशालभंजिका यशस्वी झाली नसली, तरी ऐतिहासिक दृष्टीनें तिला महत्त्व आहे कारण तिच्यांत एका ऐतिहासिक घटनेचा उल्लेख आहे. त्याकडे आता आपण वळू.

## नाटिकेंतील तत्कालीन राजकारणाचें प्रतिबिंब

प्रस्तुत नाटकात ऐतिहासिक व्यक्तींचीं नांवें बदललीं आहेत. 'कलचुरि' वंशाचें 'करचुलि' असें नांव दिलें आहे. कलचुरि नृपति

युवराजदेव याला 'केयूरवर्ष' असें बिरुद होतें. तें प्रस्तुत नाटकात 'कर्पूरवर्ष' झालें आहे. युवराजदेवाचा मंत्री भाकमिश्र या नावाचा होता हें तत्कालीन शिलालेखावरून कळतें. तो व प्रस्तुत नाटकातील भागुरायण एकच होत यात संशय नाही. या विशेषनामांच्या समीकरणा-वरून युवराजदेवाच्या आश्रयास आलेला कुन्तलाधिपति वीरपाल हीहि एक ऐतिहासिक व्यक्ति असावी असें सहजच वाटतें; व तत्कालीन कोरीव लेखाचा अभ्यास केल्यास तें अनुमान खरें ठरतें. कृष्णानदीच्या खोऱ्यातील दक्षिण महाराष्ट्र व जवळचे कानडी जिल्हे याना 'कुन्तल' अशी संज्ञा होती. या देशावर तत्कालीं राष्ट्रकूट राजाचें राज्य होतें, व त्या काळीं त्यांची मातृभाषा कानडी झाली होती, म्हणून त्याना 'कुन्तलाधिपति' व 'कार्णाट' असें प्रस्तुत नाटकात म्हटलें आहे. त्या वेळीं राष्ट्रकूटाची राजधानी हैदराबाद संस्थानातील मान्यखेट (सध्याचें मालखेड) येथें होती. राष्ट्रकूटाचें साम्राज्य नर्मदेच्या दक्षिणेस महाराष्ट्र, कर्णाटक व आन्ध्र या प्रांतावर पसरलें होतें. त्या काळीं मालखेड येथें चतुर्थ गोविंद हा राष्ट्रकूटनृपति राज्य करीत होता. हा सदैव ख्यालीखुशालींत मग्न असल्याने त्याच्या विरुद्ध त्याच्या राज्यात कारस्थानें रचण्यात आलीं व त्याला पदच्युत करून त्याचा चुलता बद्दिग–अमोघवर्ष यास गादी द्यावी असा काही सामंतांनी कट रचला. तो सिद्धीस गेल्यास राष्ट्रकूटाच्या दरबारीं आपलें महत्त्व वाढेल असें वाटून कलचुरि नृपति युवराजदेव याने त्या कारस्थानाला प्रोत्साहन दिलें. शिवाय ज्याच्या करिता हा कट रचला होता, तो बद्दिग–अमोघवर्ष युवराजदेवाचा जावई होता. युवराजदेवाची कन्या कन्दकदेवी ही त्याला दिली होती. अमोघवर्ष हा स्वतः त्रिपुरीस काही काळ राहत होता; व तेथे त्याने आपल्या कन्येचा विवाहहि थाटाने साजरा केला, हें कदंब येथील ताम्रपटावरून माहीत झालें आहे. तेव्हा कुन्तलराज्यावर हक्क सांगणारा व त्रिपुरी येथें युवराजदेवाच्या आश्रयास आलेला विद्धशालभञ्जिकेंतील वीरपाल हा बद्दिग–अमोघवर्षच होय यांत संशय नाही.

वीरपालाचा पक्ष घेऊन युवराजदेवाच्या सेनापतीने पयोष्णीच्या तीरावर कर्णाटाच्या सैन्याशीं घनघोर लढाई केली, अशी माहिती विद्धशालभंजिकेवरून आपणांस मिळते. ती कितपत खरी आहे, तें आता आपण पाहूं.

## अचलपुरचा राजा कर्कर

चतुर्थ गोविंदाला पदच्युत करण्याच्या कटांत राष्ट्रकूटांचे पुष्कळसे सामंत सामील झाले होते. तरी इतर काही सामंत राजनिष्ठ राहून त्याच्याकरिता लढले, हें तत्कालीन कोरीव लेखांवरून दिसतें. या राजनिष्ठ सामंतामध्ये उत्तरकर्नाटक प्रांतावर राज्य करणारा बप्पुव व त्याचा भाऊ अचलपुर येथे राज्य करणारा कर्कर हे प्रमुख होते. बप्पुवानें मोठा पराक्रम करून दक्षिणेंत बडव्वोर सामंताचा प्रथम मोड केला होता पण पुढे बद्दिगाच्या पक्ष घेणाऱ्या अरिकेसरी नामक एका चालुक्यवंशी सामंताने त्याचा पराजय करून मान्यखेटावर चाल केली, व बद्दिगाला त्याचें सिंहासन मिळवून दिलें असें तत्कालीन कर्नाटक कवि पंप याच्या 'विक्रमार्जुनविजया'त म्हटलें आहे. अलीकडे कोंकणांत मुरुडजंजिरा येथे शिलाहार नृपति अपराजित याचे दोन ताम्रपट सापडले आहेत त्यामध्ये बद्दिग-अमोघवर्षाच्या वर्णनांत पुढील श्लोक आला आहे—

> श्रीमत्कर्करराष्ट्रकूटकटकेऽलब्धप्रसर्पत्तो
> रौद्रद्रोहदवप्रतापशमनं निस्त्रिंशधाराजलैः ।
> येनाकारि समुद्धृतेन्द्रधनुषा भूपारमभिर्विद्युता
> भाति श्रीमदमोघवर्षसुघनोऽसद्धूलिविध्वंसनात् ॥

(भावार्थ—ज्याप्रमाणे अरण्यामध्ये वेळूंच्या संघर्षामुळे उत्पन्न झालेल्या दावानलाला इन्द्रधनुष्य उभारून विजेने युक्त असा मेघ जलधारांनी शान्त करतो व भूमीवरची धूळ बसवून टाकतो, त्याप्रमाणे श्रीमान् अमोघवर्षानें राष्ट्रकूट (सामंत) कर्कर याच्या राजधानींत आपल्या तरवारीच्या धारेने व आपला मुलगा (तृतीय) इन्द्र याच्या

मनुष्याच्या सहाय्याने दुष्टाच्या संघर्षानें उत्पन्न झालेल्या भयंकर बंडाचा मोड केला व दुष्टाचा समूळ नाश केला. )

**पूर्णेच्या काठीं झालेलें घनघोर युद्ध**

या वर्णनावरून राष्ट्रकूट सामन्त कर्कर याच्या राजधानीजवळ भयंकर युद्ध होऊन त्यात अमोघवर्षांचा विजय झाला, असें स्पष्ट दिसतें. कर्कर हा अमरावती जिल्ह्यातील अचलपुर येथे राज्य करीत होता, हें इतर कोरीव लेखावरून ज्ञात झालें आहे.

वरील श्लोकात उल्लेखिलेलें युद्ध व विद्धशालभंजिकेंत वर्णिलेलें पयोष्णीच्या काठचें युद्ध हीं एकच असावीत; कारण पयोष्णी ऊर्फ पूर्णा ही नदी अचलपुरापासून जवळच १० मैलावर वाहते. हीं दोन वर्णनें एकत्र केलीं असता अचलपुरानजीक पूर्णा नदीच्या काठीं कलचुरींच्या सैन्याची मदत असलेला वद्दिग-अमोघवर्ष आणि चौथ्या गोविंदाच्या पक्षाचे कर्कर आदिकरून इतर सामन्त याच्यामध्ये भयंकर लढाई होऊन तींत अमोघवर्षांचा विजय झाला, असें स्पष्ट दिसतें. या विजयोत्सवाच्या प्रसंगीं त्रिपुरी येथे कलचुरिनृपति युवराजदेव याच्या आश्रयाखाली राजशेखराचें विद्धशालभंजिका नाटक प्रथम रंगभूमीवर आलें, असें दिसतें

**नाटिकेंतील कथानकाचें महत्त्व**

याप्रमाणे या नाटकावरून कलचुरि व राष्ट्रकूट या दोन राजघराण्याच्या प्राचीन इतिहासातील एका घटनेवर बराच महत्त्वाचा प्रकाश पडत आहे; व यातच त्या नाटकाचें महत्त्व आहे.

# Abbreviations

The following abbreviations have been used in the attached list of journals. The figures in the brackets indicate the year of publication. The first number following the *name of a periodical denotes the volume*, and the second the intial page.

*A. B. N. U. H. S.*—Annual Bulletin of the Nagpur University Historical Society.

*A. B. O. R. I.*—Annals of the Bhandarkar Oriental Research Institute.

*E. I.*—Epigraphia Indica.

*H. A. S.*—Hyderabad Archaeological Series.

*I. A.*—Indian Antiquary.

*I. H. Q.*—Indian Historical Quarterly.

*J. G. J. R. I.*—Journal of the Gaṅganath Jha Research Institute.

*J. K. H. R. R. S.*—Journal of the Kalinga Historical Research Society.

*J. M. S. G. U.*—Journal of the Maharaja Sayajirao Gaikwad University.

*J. N. S. I.*—Journal of the Numismatic Society of India.

*J.O.H.R.S.*—Journal of the Orissa Historical Research Society.

*N. I. A.*—*New Indian Antiquary.*

*N. U. J.*—Nagpur University Journal.

*P. I. H. C.*—Proceedings of the Indian History Congress.

*P. T. A. I. O. C.*—Proceedings and Transactions of the All-India Oriental Conference.

## परिशिष्ट

# प्रा. वा. वि. मिराशी यांचे संशोधनपर ग्रंथ व लेख

## इंग्रजी

### Work

Inscriptions of the Kalachuri-Chedi Era (Corpus Inscriptionum Indicarum, Vol. IV) (In the Press)

### Articles

1 The Traditional Author of the Vedânta Sūtras—Badarayana or Krishna Dvaipāyana? (1923), *P. T. A. I. O. C.*, 463 f.*

2 Yuvarājadeva I of Tripurī, (1930), *A. B. O. R. I.*, XI, 361 f.

3 Two Inscriptions from Berar, (1931), *E. I.*, XXI, 127 f.

4 Notes on the Bilhari Stone Inscription of the Rulers of Chedi, (1932), *Mahakoshal Historical Society's Papers*, Vol. I, 11, f.

5 Did Tailapa II defeat a Chedi King?, (1933), *I. H. Q.*, IX, 132 f.

6 Historical Data in Rājaśekhara's Viddhaśālabhañjikā, (1933), *I. A.*, LXII, 35 f.

7 Historical Data in Padmagupta's Navasāhasāṅkacharita, (1933), *I. A.*, LXXII, 101 f.

8 Further Light on Rāmagupta, (1933), *I. A.*, LXII, 201 f.

---

* For explanation of abbreviations see the preceding page.

9 Thakurdiya Plates of Mahā-Pravararāja, (1933), *E. I.*, XXII, 15
10 Khamkhed Plates of the Time of Pratāpasila, (1933), *E. I.*, XXII, 93 f.
11 Chandragupta II–Vikramāditya and Govinda IV, (1934), *I. H. Q.*, X, 48 f.
12 The Chronological Order of Rājaśekhara's Works, (1934), *K. B. Pathak Commemoration Volume*, 359 f.
13 Sarkhon Plates of Ratnadeva II, (1934), *E. I.*, XXII, 159 f.
14 Tirodi Plates of Pravarasena II, (1934), *E. I.*, XXII, 167 f.
15 An Unfinished Vākāṭaka Plate from Drug, (1934), *E. I.*, XXII, 207 f.
16 The Birth-Place of Bhavabhūti, (1935), *I. H. Q.*, XI, 287, f.
17 Epigraphic Notes I, (1935), *N. U. J.*, I, 1 f.
18 Pendrabandh Plates of Pratāpmalla, (1935), *E. I.*, XXIII, 1 f.
19 Anjanavati Plates of Govinda III* (1935), *E. I.*, XXIII, 8 f.
20 Pattan Plates of Pravarasena II, (1935), *E. I.*, XXIII, 81 f.
21 Mallar Plates of Mahāśivagupta,† (1935), *E. I.*, XXIII, 113 f.
22 Epigraphic Notes II, (1936), *N. U. J.*, II, 48 f.
23 A Note on the Dates of Uchchakalpa Kings, (1936), *E. I.*, XXIII, 171 f.
24 Two Copper-plate Inscriptions from Berar, (1936), *E. I.*, XXIII, 204 f.

* In collaboration with Mr. L. R. Kulkarni.
† In collaboration with Pandit L. P. Pandeya.

25 Karitalai Stone Inscription of Lakshmanarāja, (1936), *E I*, XXIII, 255 f

26 A Further Note on the Date of the Manne Plates of Stambha, (1936), *E I*, XXIII, 295 f

27 Pauni Stone Inscription of the Bhāra King Bhagadatta, (1937) *E I*, XXIV, 11 f

28 The Date of Tīvaradeva, (1937), *Ganganath Jha Volume*, 223 f.

29 An Odd Copper plate of Pravarasena II, (1937), *N. U J*, III, 20 f

30 Epigraphic Notes III, (1937), *N U J*, III, 29 f.

31 New Light on Deotek Inscriptions, (1938), *P. T. A. I O C*, VIII, 613 f.

32 Rewah Stone Inscription of the Time of Karna, (1938), *E I*, XXIV, 101 f

33 Epoch of the Kalachuri Chedi Era, (1938), *E I*, XXIV, 116 f

34 A Note on the Prince of Wales Museum Plates of Jayabhata, (1939), *E I*, XXIV, 176 f

35 Two Incomplete Grants of Pravarasena II, (1939), *E I*, XXIV, 260 f

36 Kaman Stone Inscription, (1939), *E I*, XXIV, 329

37 Vamadeva An Early Kalachuri King, (1939), *F W. Thomas Volume*, 152 f

38 Gold Coins of Three Kings of the Nala Dynasty, (1939), *J N. S I*, I, 29 f

39 An Ancient Dynasty of Mahakosala, (1939), *P I H. C*, III, 319 f

40 An Incomplete Grant of Sinda Ādityavarman,* (1940), *E I*, XXV, 164

* In collaboration with Dr. M. G Dikshit

41 New Light on the Mediaeval History of Gujarat, (1940), *D R Bhandarkar Volume*, 58 f.

42 Tarhala Hoard of Sātavāhana Coins, (1940), *J. N S. I*, II, 83 f

43 Ramtek Stone Inscription of the Time of Rāmachandra,* (1940) *E I*, XXV, 7 f

44 Purushottampuri Plates of Rāmachandra, (1940), *E I*, XXV, 199 f

45 A Note on the India Office Plate of Devasena, (1940), *N I A*, II, 721 f.

46 Some Kalachuri Dates, (1940), Woolner Commemoration Volume, 165 f

47 The Capitals of the Vākāṭakas, (1940), *P T A I O C*, X, 455 f

48 Bargaon Temple Inscription of Śabara, (1940) *E I*, XXV, 278

49 Jubbulpur Stone Inscription of Vimalaśiva, (1940), *E I* XXV, 309 f

50 Vatsagulma Branch of the Vākāṭaka Dynasty,† (1940), *P I H C*, IV, 79 f

51 Rajim Stone Inscription of Vilāsatunga, (1941), *E I*, XXVI 49 f

52 Ratanpur Stone Inscription of Prithvīdeva II, (1941), *E I*, XXVI, 255 f

53 Kothuraka Grant of Pravarasena II, (1941) *E I*, XXVI, 155 f

54 Dongargaon Stone Inscription of Jagaddeva, (1941), *E I*, 177 f

55 The Coins of the Kalachuris (1941) *J N S* I III, 21 f

* In collaboration with Mr L B Kulkarni

† In collaboration with Mr D B Mahajan,

56 A Ship-type Coin of Yajña Sātakarni, (1941), *J. N. S. I.*, III, 43

57 Was Berar the Home Province of the Sātavāhanas? (1941), *J. N. S. I.*, III, 37 f.; 88 f.

58 "Tritasaurya" (1941), Kane Festschrift, 290 f.

59 A Gold Coin of Prānanarāyana, (1941), *J. N. S. I.*, III, 93 f.

60 Some Seal-stamps from the Central Provinces, (1941), *J. N. S. I.*, III, 99 f.

61 Vākātaka Inscription in Ajanta Cave XVI, (1941), *H. A. S.*, XIV, 1 ff.

62 Gāngeyadeva of Tīrabhukti, (1942) *A. B. O. R. I.*, Silver Jubilee Volume, 291 f.

63 Some Old Coins re-discussed, (1942) *I. H. Q.*, XVIII, 71 f.

64 Presidential Address, Archaeology Section, Eleventh All-India Oriental Conference, Hyderabad, (1941), *P. T. A. I. O. C.* XI.

65 Date of the Mathura Pedestal Inscription of Kanishka, (1942), *E. I.*, XXVI, 293 f.

66 Basim Plates of Vindhyasakti*, (1942), *E. I.*, XXVI, 139 f.

67 A Copper-plate Grant of Chhadvaidevaț (1942), *E. I.*, XXVI, 282 f.

68 Dates of some Early Kings of Kausambi, (1942), *E. I.*, XXVI, 297 f.

69 Epoch of the Gānga Era, (1942), *E. I.*, XXVI, 327 f.

70 Gunji Rock Inscription of Kumaravaradatta, (1943), *E. I.*, XXVII, 48 f

* In collaboration with Mr D. B. Mahajan
† In collaboration with Dr M. G. Dikshit.

71 Wadgaon Plates of Pravarasena II, (1943), *E I*, XXVII, 74 f

72 Saugor Stone Inscription of Śankaragana, (1943), *E I.*, XXVII, 163 f

73 Chhoti Deori Stone Pillar Inscription of Sankaragana, (194 3), *E I*, XXVII, 170 f

74 Koni Stone Inscription of Prithvideva II, (1943), *E I*, XXVII, 276 f

75 Location of Rāmagiri, (1943), *N. U J*, IX, 9 f

76 A Note on the Mānkani Plate of Taralasvamin (1943), *J G J R I*, I 3879

77 The Legend on Valabhi Coins, (1944), *J N S I*, VI, 14 f

78 A Coin of King Dimabhaga, (1944), *J N S I*, VI, 9 f.

79 The Rashtrakutas of Manapura, (1944), *A B O R I*, XXV, 25 f

80 A Note on 'padānudhyata', (1944), *I.H Q*, XX, 288 f.

81 An Ancient Dynasty of Khandesh, (1944), *A B O. R I*, XXV, 36 f

82 A Note on Vajrata, (1944), *I H Q*, XX, 353 f

83 A Note on Kumaragadyanaka, (1944), *J N S I*, VI, 20 f

84 Did Vākātaka rule become extinct after Vindhyaśakti? (1945), *Indian Culture*, XI, 232 f

85 Mahoba Stone Inscription of Paramardin, (1945), *Bharata Kaumudi*, I, 433 f

86 The Varunaśarmaka Grant of Chāmundarāja, (1945), *Bharatiya Vidyā*, May 1945, 90 f.

87 The Age of the Bagh Caves, (1945) *I H Q*, XXI, 79 f.

88 Some Royal Poets of the Vākāṭaka Age, (1945), *I H. Q*, XXI, 193 f

89 Historical Data in Dandin's Daśakumāracharita, (1945), *A B O R I*, XXVI, 20 f
90 A Coin of King Sebaka, (1945) *J N S I*, VII, 94
91 A Coin of King Satavahana, (1945), *J N S I* VII 1 f
92 An Ancient Śaka Dynasty of Māhishmatī, (1945), *I H Q*, XXII, 34 f
93 Presidential Address of Ancient Indian History, Section II, (1944), *P I H C*, VII, 153 f
94 The Kalachuri Chedi Era, (1946) *A B O R I*, XXVII, 1 f
95 The Date of the Dadhimatī Mātā Inscription (1946), *J G J R I*, III, 109 f
96 The Vakataka Dynasty of the Central Provinces and Berar, (1946), *A B N U H S*, I 8 f
97 A New Coin of Satakarni (1946), *J N S I*, VIII, 18 f
98 The Seal stamp of of Brahmadeva (1946) *J N S I*, VIII, 79 f
99 A New Satavahana Coin (1946), *J N S I*, VIII, 22 f
100 A Coin of Prakāśaśiva Sebaka (1946), *J N S I*, VIII, 107 f
101 A Coin of Kauśikīputra Satakarni, (1946), *J N S I*, VIII, 116
102 Were the Vākatakas the rulers of Aśmaka ? (1946), *I, H Q*, XXII, 308 f
103 Were the Mahārajas of Khandesh the feudatories of the Guptas ? (1946), *I H Q* XXII, 156 f
104 Identification of Kuntala and Asmaka Countries, (1946) *I H Q*, XXII, 321 f
105 Vidarbha and Mahakosala (1947) *J K H R S*, II, 1 f.

106 The Date of the Gāthāsaptasatī, (1948), *I. H. Q.*, *XXIII*, 300 f.

107 Three Ancient Dynasties of Mahakosala, *Bulletin of the Deccan College Research Institute*, VIII, 47 f.

108 Vakātaka Chronology, (1948), *I H Q*, *XXIV* 148 f.

109 Nandgaon Stone Inscription of Yadava Krishna, (1948), *E. I.*, XXVII, 9 f.

110 A Further Note on the Epoch of the Gānga Era, (1948), *E. I.*, XXVII, 112 f.

111 Koni Stone Inscription of Prithvideva II, (1948), *E. I.*, XXVII, 276 f.

112 New Light on the Ancient History of Maharashtra, (1948) *P. I. H. C.*, XI, 49 f.

113 Kalidasa as seen in his Works,* (1948), *Vikrama Volume*, 303 f.

114 Khanapur Plates of Madhavavarman,† (1949), *E. I.*, XXVII, 312 f.

115 Some More Coins of the Mahisha Dynasty, (1949), *J. N. S. I.*, XI, 1 f.

116 A Lead Coin of Satavahana, (1949), *J. N. S. I.*, XI, 5 f.

117 A Lead Coin from Kondapur, (1949), *J. N. S. I.*, XI, 86 f.

118 A Note on the Khairtal Hoard of the Coins of Mahendraditya, (1949), *J. N. S. I.*, XI, 108 f.

119 New Light on the Epoch of the Kalachuri Era, (1949), *I. H. Q.*, XXV, 81 f.

120 A Note on the Tivarkhed Plates of Nannarāja, (1949), *I. H. Q.*, XXV, 139 f.

---

* In collaboration with Prof. N. B. Navalekar

† In collaboration with Mr. Y. R. Gupte.

121 Inscription in Cave XVII at Ajanta, (1949), *H A S*, XV.
122 Nagardhan Plates of Svamiraja, (1950), *E I*, XXVIII, 1 f
123 A Coin of Mana Chutuka, (1950) *J N S I*, XII, 87 f
124 The Apratigha Coins, (1950) *J N S I*, XII, 68 f
125 Some More Coins from Kondapur, (1950), *J N S I*, XII, 90
126 The Spread of the Saka Era in South India, (I), (1950), *I H Q*, XXVI, 216 f.
127 Pravarapura, the Ancient Capital of the Vākatakas, (1950), *B N. U H S*, IV, 7 f
128 Epigraphic Notes, (1950), *J. G J R I*, VIII, 77 f
129 The Date of the Ellora Plates of Dantidurga, (1950), *J. B B R A S*, XXVI, 163
130 A Note on the Ponnuturu Plates of Sāmantavarman, (1950), *E I*, XXVIII, 171 f
131 A Note on the Kesaribeda Plates of Arthapati, (1950) *I H. Q*, XXVI, 142 f
132 The Saiva Ācharyas of the Mattamayura Clan (1950) *I H. Q* XXVI, 1 f
133 Some Ancient Prakrit Poets (1950), *Bharatiya Vidya*, X (K M Munshi Volume, II) 42 f
134 Dantidurga, the Founder of the Rashtrakuta Imperial Power, (1951), *J M S G. U*, I 31 f
135 The Spread of the Saka Era in South India (II), (1951), *I. H Q*, XXVII, 341 f
136 Presidential Address, Numismatic Society of India, (1951), *J N. S I* XIII, 113 f
137 Some More Coins from Hyderabad (1951), *J. N S I*, XIII 17 f

138 Eran Stone Pillar Inscription of Śrīdharavarman, (1951) *P. I H C*, XIV, 23

139 The Home of the Vakatakas, (1951), *A B. O. R. I*, XXXII, 1 f.

140 Himālaya as described by Kalidasa, (1952), *Himalaya*, I, 80

141 The Ghatotkacha Cave Inscription, (1952), *H A S*, XVI

142 A Note on the Lodhia Plates of Mahasivagupta, (1952), *J. O H R S*, I, 63 f

143 Mundakhede Plates of Jayasakti, (1952), (to be published in *E I*)

144 Identification of Kings Satavāhana and Satakarni of the Coins, (1952), *J N S I*, XIV, 26 f

145 The Harsha and Bhatika Eras, (1953), *I H. Q.*, XXIX, 191 f.

146 Two More Coins from Kondapur, (1953), *J. N S. I.*, XV, 115 f

147 Coins of Sivala Mahisha, (1953), *J N S. I*, XV, 120.

148 The Coins of the Kalachuris of South Kosala, (1953), *J. N S I*, XV, 208 f

149 Musunika Grant of Devendravarman, (1953), (to be published in *E I.*)

150 Dhulev Plate of Mahārāja Bhetti (1953), (to be published in *E I*)

151 The Pāndava Dynasty of Mekalā, (1954), *Indica*, 268 f

---

# मराठी

## ग्रंथ

कालिदास ( नवभारत ग्रंथमाला, नागपूर ) (१९३४*).

## लेख

§१ कालिदास आणि विदर्भ, (डॉ केतकर यास उत्तर) (लेखांक १-६). 'महाराष्ट्र', (डिसेंबर १९२८ ते जानेवारी १९२९)

२ कालिदास आणि विदर्भ, (डॉ केतकर यास प्रत्युत्तर) 'महाराष्ट्र', ( ३१-३-१९२९ )

३ डॉ केतकर आणि भवभूतीचे उपनाव 'महाराष्ट्र' (२४-२-१९२९)

§४ रामगुप्ताच्या चरित्रावर नवीन प्रकाश, (१९३३) 'शारदाश्रम वार्षिक', २१

५ धारधीश सिन्धुराजाच्या चरित्रातील एक प्रसंग, (१९३३) भा इ स म त्रै.,† पु १३, पृ. ३३

६ वाकाटकांचा अंतिम काळ (लेखांक १-२), (१९३३) 'वागीश्वरी', पु ४, पृ ४०७ व ४८६.

७ वाकाटकांचा दुर्ग येथील अपूर्ण ताम्रपट, (१९३४) द. म इ सा.‡ भा. ३, पृ १४

८ कालिदास व ऋतुसंहार, (श्री. दु आ तिवारी यास उत्तर), 'विहंगम' (फेब्रुवारी–मार्च, १९३४)

---

* यासारखे कंसातील अंक प्रकाशनवर्षाचे आहेत

§ या चिन्हाने अंकित लेख प्रस्तुत पुस्तकात घेतले आहेत

† भा इ स म त्रै = भारत इतिहास संशोधक मंडळ त्रैमासिक.

‡ द. म इ. सा = दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने

